







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

# नवी क्षितिजे



## आर्थर कोस्सलर आणि डार्कनेस ॲट नून

– विश्वास पाटील

वर्ष-११
अंक-४२

अंक ४२ वा	किंमत : रु. ७५

अनुक्रमणिका



# नवी क्षितिजे

## अनुक्रमणिका

**संपादक**
नाना जोशी
विश्वास पाटील

**रचना**
अनघा निगवेकर

**पत्रव्यवहाराचा पत्ता**
४ अ. सोमणनगर
क्रांतीवीर भाई बाल मुकुंद मार्ग,
मुंबई ४०० ०१२.

**मालक, मुद्रक, प्रकाशक**
नाना जोशी
४ अ. सोमणनगर
क्रांतीवीर भाई बाल मुकुंद मार्ग,
मुंबई ४०० ०१२.

**मुद्रणस्थळ**
सर्कल प्रेस,
जुना आग्रारोड,
नासिक २.



---

या अंकाची किंमत रु. ७५

---

वार्षिक वर्गणी रु. १०१

अंक ४२

अनुक्रमणिका

नवी क्षितिजेचा हा बेचाळीसावा अंक. हा संपूर्ण अंक 'आर्थर कोस्सलर' यांच्यावर आहे. कोस्सलर हे हंगेरियन-ब्रिटिश लेखक आणि तत्त्ववेत्ते. त्यांचा जन्म बुडापेस्टचा. पूर्वीच्या ऑस्ट्रिया–हंगेरी या साम्राज्यात. आता हंगेरीत. कोस्सलर मूळचे हंगेरियन नागरिक. पुढे त्यानी ब्रिटिश नागरिकत्व स्वीकारले (१९४६). त्यांचा जन्म ६-९-१९०५ चा आणि मृत्यू ३-३-१९८३ तला. ब्रिटनमधे.

या अंकासाठी आम्ही त्यांची 'डार्कनेस ॲट नून' ही कादंबरी निवडली आहे. ही एक राजकीय कादंबरी असून राजकीय कादंबऱ्यांमधे तिचा क्रमांक बराच वरचा लागतो.

'डार्कनेस ॲट नून' ही राजकीय कादंबरी आम्ही दोन कारणांसाठी निवडली. राजकारण हा जरी मराठी लोकांच्या अत्यंत आवडीचा विषय असला तरी मराठीत चांगली राजकीय कादंबरी नाही. ही कादंबरी भाषांतराच्या रूपात मराठीत उपलब्ध आहे. तेव्हा डार्कनेस ॲट नूनच्या निमित्ताने एका चांगल्या राजकीय कादंबरीचा परिचय करून द्यावा हा एक हेतू. दुसरा हेतू असा की, या निमित्ताने राजकीय कादंबरीच्या स्वरूपाबद्दलही काही माहिती द्यावी.

पूर्वीच्या काळी म्हणजे अगदी शंभर एक वर्षांमागेसुद्धा फारच थोड्या सर्वसामान्य लोकांचा संबंध प्रत्यक्ष राजकारणाशी येत असे. बहुतेक राजेरजवाडे आणि त्यांचे बगलबच्चे, मंत्री वगैरे यांचाच संबंध तेव्हा राजकारणाशी असे. अलीकडे हे सर्व बदलले आहे. या ना त्या निमित्ताने आता प्रत्येकालाच राजकारणाशी संबंध ठेवावा लागतो. प्रत्यक्ष लोकप्रतिनिधीच्या भूमिकेत नसेल तर निदान त्याला निवडून देणारा मतदार म्हणून तरी प्रत्येक प्रौढ व्यक्तीचा संबंध राजकारणाशी येतो.



अनुक्रमणिका

दुसरी गोष्ट, पूर्वीच्या काळी राजकारण आतासारखे गुंतागुंतीचे नव्हते. त्याकाळी ते साधे, सरळ आणि सुटसुटीत, राजेमहाराजांच्या आपापसातल्या लढाया, तह, बंडखोरी, एक राजा जाऊन त्याच्या जागी दुसरा राजा येणे अशासारखे फुटकळ घटनांच्या स्वरूपातील असे. आता विधानसभा, लोकसभा, राजकीय पक्ष, त्या पक्षांच्या राजकीय मतप्रणाली (आयडिऑलॉजीज) इत्यादी हजारो गोष्टी राजकारणात असतात. या प्रत्येक गोष्टीशी नागरिकाचा काही ना काही संबंध येत असल्याने राजकारणाकडे पाठ फिरवून जसे पूर्वीच्या लोकांचे चालत असे तसे आता चालत नाही. राजकारणातून उपस्थित होणाऱ्या प्रश्नांवर अलीकडच्या माणसाला ठाम आणि निश्चित पवित्रा घ्यावा लागतो. असा पवित्रा आपल्याकडे बरेचजण घेत नाहीत हा दुर्दैवाचा भाग. परंतु त्याचे कारण आधुनिक राजकारणामधे जे तात्त्विक प्रश्न गुंतलेले असतात त्याची आमच्याकडच्या लोकांना बरोबर जाण नसते हे आहे. ही जाण जर का आली तर बरेच लोक राजकारणामधे आस्था दाखवतील असे वाटते. ही जाण वाढविण्याचे राजकीय कादंबऱ्या हे एक साधन होईलही. राजकारणावरच्या शुष्क चर्चेपेक्षा कादंबरी अधिक आवडीने वाचली जाते. जीवनविषयक आकलन समृद्ध करणे हे तर सर्वच कलांचे महत्त्वाचे कार्य आहे. राजकीय कादंबऱ्या त्या दृष्टीने खूप उपयुक्त ठरतात. या बाबतीत मानसशास्त्रीय कादंबऱ्यांशी राजकीय कादंबऱ्यांची तुलना करता येईल. मानसशास्त्रीय कादंबरी भावना चित्रित करतात. भावनांचा खेळ उलगडून दाखवितात. त्यांचा अर्थ लावतात. विस्कळीत अनुभवातून नेमके महत्त्वाचे अनुभव उचलून त्यांच्यामधे शिस्त व क्रम आणतात. त्याना सुंदर आकार देतात आणि अर्थपूर्ण बनवितात. तीच गोष्ट राजकीय कादंबऱ्या ही करतात. मानसशास्त्रीय कादंबऱ्या सर्वसाधारणपणे पात्रांच्या खाजगी अनुभवाबद्दल, वैयक्तिक आयुष्याबद्दल बोलतात. राजकीय कादंबऱ्या खाजगी आयुष्याऐवजी सामाजिक आयुष्याबद्दल बोलतात हा या दोघातला एकमेव फरक. वाचकाला मागल्या काळातल्या घटनांमधे काही अधिक वाचायचे असेल, राजकीय पुरुषांबद्दल (आणि अर्थात स्त्रियांबद्दलही) काही अधिक समजून घ्यायचे असेल, त्यांच्या अंतःकरणात डोकावून पाहायचे असेल, अमुक एका प्रसंगी त्यानी केले होते तेच वर्तन त्यानी तसे का केले हे त्या प्रसंगात शिरून जाणून घ्यायचे असेल आणि पुढे येणाऱ्या भावी काळात काय घडू शकेल याचा अंदाजही बांधायचा असेल तर राजकीय कादंबऱ्यांच्या वाचनासारखे अन्य दुसरे सुटसुटीत साधन नाही.

राजकीय कादंबऱ्यांमुळे दोन गोष्टी घडतात. राजकीय कादंबऱ्या या शेवटी कादंबऱ्या असल्याने, म्हणजेच मन रमविणाऱ्या कथा असल्याने वाचकाचे मन त्या रमवितात. शुष्क वर्तमानपत्री चर्चेपेक्षा वा संपादकांच्या अग्रलेखांपेक्षा वाचकाला त्यातील माहिती जवळची वाटते. दुसरी गोष्ट, राजकीय कादंबऱ्या राजकीय घडामोडींबद्दल,



अनुक्रमणिका

विशेषतः राजकीय कृतींबद्दल बोलतात. अशा कृतींचे विश्लेषण करतात. साहजिकच या कादंबऱ्यांच्या वाचनाने वाचकाची राजकीय बुद्धी समृद्ध होते. आधुनिक समाज अनेक प्रकारे गुंतागुंतीचा बनला आहे. या स्थितीत तो जितक्या बाजूंनी व साधनांनी समजून घेता येईल तितक्या बाजूंनी व साधनांनी तो समजून घ्यावयास हवा. ज्या टप्प्यावर समाज आहे त्या टप्प्यावर तो कसा आला याची माहिती करून घ्यावयास हवी. राजकीय कादंबऱ्या या बाबतीत फार उपयोगी पडतात.

## राजकीय कादंबऱ्यांचे स्वरूप :

राजकीय कादंबरीची व्याख्या करता येईल असे वाटत नाही. मात्र राजकीय कादंबरीची ठळक लक्षणे सांगता येतील. राजकीय कादंबरी हा कादंबरी लेखनाचा एक मिश्र प्रकार आहे. राजकीय कादंबरीत इतिहास येतो. सामाजिक चित्रणही येते. परंतु राजकीय कादंबरी ही ऐतिहासिक कादंबरी नाही वा सामाजिक कादंबरीसुद्धा नाही. तिचा स्वतंत्र साचा आहे. तसेच ऐतिहासिक वा सामाजिक कादंबऱ्यापेक्षा हा साचा भिन्न आहे. अनेकजणांची अशी कल्पना आहे की एकच कादंबरी काल सामाजिक असते, उद्या ऐतिहासिक बनते वा राजकीय ठरते. ("आजची एखादी सामाजिक कादंबरी उद्या ऐतिहासिक ठरेल किंवा राजकीयही म्हणता येईल. कारण 'राजकारण म्हणजे तात्पुरते अर्थकारण आणि अर्थकारण म्हणजे दीर्घदृष्टीचे राजकारण' (महाराष्ट्र टाइम्समधील पत्रलेखकाचे विधान). एखादे महान सत्य सांगितल्याचा आव आणून जरी वरील विधान करण्यात आले असले तरी त्या विधानाला वस्तुस्थितीचा अजिबात आधार नाही. अर्थकारणावर आधारित कादंबऱ्या असतात पण, त्यांचा आर्थिक - इकॉनॉमिक - कादंबऱ्या असा वेगळा प्रकार आहे. अशा कादंबऱ्यातून आर्थिक कृतींचे चित्रण येते. वस्तुतः वरील विधान उथळ विधानात देखिल पडणार नाही. विधान उथळ ठरण्यासाठी निदान काही किमान खोली आवश्यक असते, तेवढी देखिल खोली वरील विधानात नाही. राजकीय कादंबरीच्या स्वरूपाबद्दल आपल्याकडे किती बौद्धिक गोंधळ आहे हे दर्शवण्यासाठी सदर विधानाचा निर्देश केला एवढेच. राजकीय कादंबऱ्यांचा स्वतःचा विशिष्ट साचा आहे आणि त्या साच्यावरून पुढ्यातली कादंबरी ऐतिहासिक की राजकीय की श्रमजीवी (प्रॉलिटेरिअन) हे सांगता येते.

राजकीय कादंबरीची नेमकी व्याख्या करता येत नाही ही गोष्ट खरी. परंतु त्याचा अर्थ असा नाही की एखादी कादंबरी राजकीय आहे की अन्य दुसऱ्या प्रकारची आहे हे ओळखताच येणार नाही. थोड्याशा बौद्धिक प्रयत्नाने राजकीय कादंबरी ओळखता येते. कारण या कादंबरीतील मुख्य सामग्री राजकीय कृतींशी—पोलीटिकल ॲक्टस्‌शी—

संबंधित असते. ज्या कादंबरीत मुख्य भर राजकीय कृतींवर आहे ती कादंबरी राजकीय होय असे आपण सहज म्हणू शकतो.

तथापी राजकीय कृती म्हणजे फक्त विधानसभा अथवा लोकसभेतल्या कृती नव्हेत. लोकसभेतल्या चर्चा, बिले पास करणे, सार्वजनिकदृष्या महत्त्वाच्या प्रश्नावर वाद घालणे, निर्णय घेणे ही सगळी कृत्ये जरी राजकीय कृत्यांमधे मोडतात, तरी राजकीय कादंबरी या कृत्यांशी जखडून ठेवणे म्हणजे एखाद्या इमारतीच्या फक्त वरच्या मजल्यांची दखल घेणे आणि ती इमारत ज्या चौथऱ्यावर उभी असते तो चौथरा दुर्लक्षित करणे होय. इमारतीला वरचे मजले असतात तसेच पाया असतो आणि तळघरही असते. इमारत पाहायची म्हणजे या सर्व गोष्टींची दखल घ्यायची. राजकीय कादंबरीतील पात्रे तळागाळातली असतील आणि वरच्या वर्गातील व थेट लोकप्रतिनिधी वगैरे ज्यांचा प्रत्यक्ष राजकारणाशी संबंध आहे अशीही असतील. मुख्य गोष्ट ही की राजकीय कादंबरीतील राजकीय घटक हा समाजशास्त्रीय वा अर्थशास्त्रीय घटकापेक्षा तुलनेने अधिक प्रभावी हवा, अधिक भक्कम हवा. तरच ती कादंबरी राजकीय या विशेषणाला पात्र ठरेल. राजकीय ठरण्यासाठी तिच्यातली पात्रे तळागाळातली किंवा शेतकरी कामकरी वर्गातली असून भागणार नाही, मग भले त्यांच्यावर सामाजिक व आर्थिक अत्याचारही झालेले असो. पात्रे शोषित आहेत म्हणून त्यांच्यावर आधारीत कादंबरी राजकीय ठरत नाही. अशी कादंबरी कदाचित श्रमजीवी–प्रोलिटॅरिअन–कादंबरी ठरेल. राजकीय नाही. अशी कादंबरी राजकीय ठरण्यासाठी पात्रांची कृत्ये राजकीय स्वरूपाची असावी लागतील किंवा ती राजकीय वातावरणात वावरताना दाखवावी लागतील. ज्या कादंबरीतील पात्रे राजकीय वातावरणात जगतात, राजकीय स्वरूपाच्या कृती करतात, ती कादंबरी राजकीय म्हणता येते असे आपण म्हटले याचाच अर्थ राजकीय विषयावरच्या दृष्टांतकथा वा प्रतीककथा राजकीय कादंबऱ्यांमधे पडणार नाहीत असा आहे. ज्या पुस्तकांमधे राजकीय प्रसंग चित्रित केलेला असतो किंवा अशा प्रसंगांचे विश्लेषण करून तात्पर्य काढण्याचा प्रयत्न असतो त्या कादंबऱ्यांना राजकीय म्हणता येईल. थोडक्यात सांगायचे झाल्यास कादंबरीतल्या पात्रांची कृत्ये राजकीय आहेत वा नाहीत याच्यावर ती कादंबरी राजकीय आहे वा नाही हे ठरते. कादंबरीतील पात्रे शेतकरी-कामकरी वर्गातील आहेत परंतु त्यांची कृत्ये राजकीय नाहीत तर पात्रे राजकीय वर्गातील असूनसुद्धा कादंबरी राजकीय ठरणार नाही.

राजकीय कादंबऱ्याची मुख्य भिस्त राजकारणी लोकांवर असते. अशा कादंबरीतील मुख्य पात्रे सक्रिय राजकारणी असावी लागतात. राजकारण्यांच्या प्रचार मोहिमा, राजकारणात सत्तेवर येण्यासाठी त्यानी केलेले वैध आणि अवैध प्रयत्न, त्याना मदत करणारे कारखानदार, गुंडांचे म्होरके, त्या राजकारण्याचे आईवडील, त्याची पत्नी,

त्याला झुकांडी देणारी त्याची प्रेयसी. थोडक्यात ज्या ज्या लोकानी त्याच्या आयुष्यावर परिणाम केलेला आहे ते सर्व लोक त्या कादंबरीत स्थान मिळवतात.

राजकीय कादंबऱ्यात राजकीय कृत्यांचे चित्रण येते. ते अशा प्रकारे येत की त्यामुळे ती कृत्ये हा त्या कादंबरीतला मुख्य किंवा निदान महत्त्वाचा कल्पनाबंध ठरतो. विधानसभेत बसून कायदेकानू करणे हे राजकारणातले एक कृत्य आहे. पण सर्वच राजकीय कृत्ये इतक्या उघड स्वरूपाची नसतात. एखाद्या कादंबरीत कोणी एक हातभट्टीवाला दादा किंवा चोरट्या वस्तूंचा व्यापार करणारा इसम राजकीय चळवळीला पैशाची मदत देताना दाखविलेला असेल तर हे कृत्यसुद्धा राजकीय कृत्यच म्हणाले लागेल. कारण या कृत्याचे परिणाम राजकीय असतील. त्या दादाकडून पैसे घेतल्यामुळे त्या चळवळींचे नेते त्याला पोलीस व अन्य सरकारी संरक्षण मिळवून देतील. उत्तम नाटककार जसा कधी प्रसंगांवर लक्ष केंद्रित करून, तर कधी पात्रांवर लक्ष केंद्रित करून नाटक लिहितो तोच प्रकार राजकीय कादंबरीकारही करतो. कधी तो पात्रांवर लक्ष केंद्रित करतो म्हणजेच आपल्या जमातीच्या वतीने अथवा संपूर्ण समाजाच्या वतीने राजकीय सत्ता राबविणाऱ्या, कायदेकानू पास करणाऱ्या लोकप्रतिनिधीवर तो आपले लक्ष केंद्रित करतो. अर्थात कादंबरीतील सर्वच पात्रे लोकप्रतिनिधी असणे शक्य नाही. बरीचशी सामान्य नागरिकही असतील. परंतु या सामान्य नागरिकांची कृत्ये राजकीय स्वरूपाची असतील. राजकीय प्रश्नांवर बाजू मांडणारी, निवडणुकांच्या वेळी आपला प्रतिनिधी निवडण्यासाठी निवडणुकीचे काम करणारी, राजकारणाला कलाटणी देणारी, राज्यकर्त्याविरुद्ध बंडखोरी करणारी अशा विविध भूमिका पात्रे वठवितात. राजकारणात भाग घेणारी ही सामान्य माणसे आणि राजकीय पुढारी मिळून राजकारणाचे नाटक उभे राहाते. तसेच ते सर्व मिळून जे काही करतात त्याचे परिणाम राजकीय असतात. ही पात्रे जी भूमिका वठवतात, जे संवाद बोलतात, जे हेतू प्रत्यक्षात आणू पाहातात आणि त्याच्यासाठी ज्या युक्त्याप्रयुक्त्या योजतात त्याच्याशी कादंबरीकाराला कर्तव्य असते. कादंबरीकार कदाचित या पात्रांच्या आपापसातल्या देण्याघेण्यात रस घेईल किंवा ही पात्रे नि सामान्य जनतेच्या किंवा प्रेक्षकातील देवाणघेवाणीवर लक्ष पुरवील. कदाचित वैयक्तिक पात्रांना महत्त्व देण्याऐवजी कादंबरीकार संपूर्ण नाटकालाच महत्त्व देईल आणि रंगभूमीवर म्हणजे ज्या देशातले ते नाटक असेल त्या देशावर, त्यातील राजकीय वातावरणावर लक्ष केंद्रित करील. कादंबरीकार जेव्हा पात्रांऐवजी संपूर्ण नाट्यकृतीवर लक्ष केंद्रित करतो तेव्हा राजकीय घटना, प्रमुख पात्रांचे राजकीय निर्णय, त्या देशातल्या राजकीय परंपरा वगैरेंना महत्त्व येते. म्हणजे राजकीय चौकटीला महत्त्व येते आणि पात्रांचे वैयक्तिक पराक्रम मागे टाकण्यात येतात.

राजकीय कादंबऱ्या राजकीय कृत्यांचे चित्रण करतात. तसेच ही कृत्ये स्थानिक स्वरूपाची असतात तशीच ती राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्वरूपाचीही असतात. थोडक्यात या कृत्यांना अनेक स्तर असतात. उदा. कार्ल फॉं क्लासवित्स (१७८०–१८३१) हा प्रशियन सेनापती आणि लष्करी तत्त्ववेत्ता On War या अपूर्ण पण अभिजात ग्रंथात म्हणतो की, 'युद्ध आणि राजकारण यात फ़रक नाही. युद्ध हे केवळ राजकीय कृत्य नव्हे, युद्ध हे त्याचवेळी राजकीय हत्यार सुद्धा आहे. युद्धाच्या निमित्ताने राजकीय संबंध पुढे चालू असतात. फक्त साधने तेवढी वेगळी. नाहीतर युद्ध म्हणजे वेगळ्या साधनांनी जारी ठेवलेले राजकारणच.' फॉं क्लॉसवित्सचे हे मत मान्य केले की राजकीय कादंबऱ्यांमधे युद्ध हाही विषय येईल हे मान्य करण्यासारखे आहे. राजकीय कादंबरीत क्रांतीचे राजकारण आणि वैधानिक राजकारण दोन्ही प्रकारचे राजकारण येईल. राजकीय व्यवहाराला खूप वेगळ्या बाजू आहेत. त्यापैकी कोठल्याही बाजूवर कादंबरी तयार होईल.

सामाजिक, ऐतिहासिक वा अन्य प्रकारच्या कादंबऱ्यांची सखोलता ज्याप्रमाणे त्या त्या लेखकाच्या सखोलतेवर ठरते तसेच येथेही घडते. ज्या राजकीय कादंबरीकाराला विविध प्रकारचा राजकीय अनुभव आहे, उत्तम तात्त्विक बैठक आहे, विविध राजकीय मतप्रणालींशी आणि तत्त्वज्ञानाशी ज्याचा चांगला परिचय आहे, अशा मतप्रणालींमधे आणि सिद्धांतांमधे ज्याला आस्था आहे, व्यक्ती एखाद्या विशिष्टच प्रकारे का वागतात, अशा वेळी त्यांचे हेतू, त्यांची सुप्त उद्दिष्टे कोणती असू शकतील याबद्दल जो बऱ्यापैकी अंदाज करील त्याची कादंबरी सरस निपजणार यात शंका नाही. पानिपतच्या युद्धावर कादंबरी लिहिणाराला जर का इस्लामी धार्मिक तत्त्वज्ञानाबद्दल काहीच माहिती नसेल आणि पानिपत येथील हिंदु–मुसलमान युद्धांमधे मुसलमानांच्या कट्टर धार्मिक विचारसरणीने कोणती कामगिरी बजावली याचा त्याला जर काहीच अंदाज नसेल, तर त्या कादंबरीत जरी ऐतिहासिक नावाची पात्रे असली तरी खऱ्या अर्थाने ती ऐतिहासिक कादंबरी नसते आणि राजकीय कादंबरीही नसते. एवंच राजकारण्यांच्या खाजगी कुलंगड्यांचे चविष्ट वर्णन वा त्यांच्या भ्रष्टाचारांच्या हकिकती म्हणजे राजकीय कादंबरी नव्हे.

ही झाली राजकीय कादंबऱ्यांची काही ठळक वैशिष्ट्ये. या वैशिष्ट्यांबरोबरच या कादंबऱ्या वाचून वाचक त्यांच्यापासून आणखी काय मिळवील हे देखिल सांगता येते. थोडक्यात या प्रकारच्या कादंबऱ्यांचा उपयोग काय हेही सांगता येते. एक म्हणजे या कादंबऱ्या राजकीय हत्यारासारख्या वापरल्या जातील. एखादा लेखक विचार करून आणि ठरवून एखाद्या राजकीय पक्षाची बाजू मांडील. म्हणजेच कादंबरीच्या माध्यमातून तो राजकीय विचारसरणीचा प्रचार करील. गंमत म्हणजे राजकारण हा एक असा विषय आहे की लेखक आणि वाचक दोघेही स्वतःच्या नकळत तेथे राजकीय भूमिका घेतात. अशावेळी

एखादा लेखक ठामपणे सांगेल की आपण निष्पक्षपाती भूमिकेतून जसे घडले तसे सांगत आहोत. परंतु त्याच्या लिखाणाचा प्रत्यक्ष परिणाम विचारात घेता त्याचे लिखाण शंभर टक्के निष्पक्षपाती नव्हते असेच दृष्टोत्पत्तीस येते. कारण प्रत्येक मनुष्याचे काही ना काही पूर्वग्रह असतात आणि त्याच्या स्वतःच्याही नकळत ते त्याच्या लेखनात उतरण्याची शक्यता असते. त्यामुळे लेखक जरी म्हणाला की मी पूर्वग्रहविरहित दृष्टीने लेखन केले आहे, तरी टीकाकारांना त्याच्या लिखाणातून खरे वा काल्पनिक पूर्वग्रह शोधून दाखविता येतील. काही लेखकांची त्यांच्या लेखनाविषयातील आस्था वरवरची असते. तर काही एखाद्या विशिष्ट राजकीय भूमिकेने वेडेच बनलेले असतात. ज्या उत्कटतेने लेखक त्यांचे लेखन करतात त्याच्या अनेक परी आहेत. राजकीय विषयाबद्दल माणसे आग्रही असतात नि हेच आग्रह लेखनात उतरतात. कधी हे आग्रह आवाहनाचे रूप घेतात नि लेखक एखाद्या विशिष्ट मतप्रणालीच्या बाजूने वाचकांचे मन वळविताना दिसतो. काही वेळा तर वाचकाचा हात धरून लेखक त्याला विशिष्ट मतप्रणालीच्या वा पक्षाच्या दावणीला बांधू पाहत आहे असेही दृश्य दिसते. राजकीय कादंबऱ्यांच्या बाबतीत सांगण्यासारखी महत्त्वाची गोष्ट ही की या कादंबऱ्या वाचकाची राजकीय मते घडवितातही. या कादंबऱ्यांमधे अनेकदा राजकीय मतप्रणालींची चर्चा असते. ही चर्चा अतिशय आकर्षक पद्धतीने केलेली असते. वाचक तिने भारावून जाऊ शकतो. अशावेळी ती कादंबर वाचून त्याचे मूळ दुराग्रह दृढ होतात किंवा त्याचे राजकीय मतांतरही घडून येऊ शकते. वर आपण म्हटलेच की या कादंबऱ्या राजकीय हत्यारासारख्या असतात. त्याचाच हा पुरावा होय. कादंबरीचे हत्यार वापरून लेखक वाचकाचे मन वळवील किंवा एखाद्या विशिष्ट राजकीय वर्तनाबद्दल त्याच्या मनात घृणा उत्पन्न करील किंवा स्वतःची मते पुन्हा पारखून घ्यावयासही त्याला तो प्रवृत्त करील.

## डार्कनेस ॲट नून — बोल्शेविकांचा न्यायनिवाडा :

प्रस्तुत लेखात राजकीय कादंबरीच्या विवेचनासाठी आम्ही 'डार्कनेस ॲट नून' ही कादंबरी घेतली आहे. ललित साहित्यकृती राजकीय हत्यारासारखी वापरली जाते ती कशी याचे ही कादंबरी हा एक उत्कृष्ट वस्तुपाठ आहे. ही कादंबरी कोस्सलर यानी ज्या शैलीत लिहिली आहे, त्या शैलीमुळे वाचकांमधे ती उत्कट, भावनात्मक आणि बौद्धिक प्रतिक्रिया जागृत करण्याची शक्यता आहे.

'डार्कनेस ॲट नून' (१९४१) ही निकोलस रुबाशॉव्ह या एकेकाळच्या खंद्या, बुजुर्ग बोल्शेविकाच्या राजकीय आयुष्याची कथा आहे. रुबाशॉव्ह हा एकेकाळचा पक्षातला वरच्या स्तरावरचा पदाधिकारी. नंबर एकच्या खालोखाल मान असणारा.

क्रांतीपर्वातील हा एकेकाळचा हीरो आज मात्र तुरुंगातल्या एकांत कोठडीत येऊन पडला आहे. सार्वजनिक चौकशी कधी होणार याची वाट पाहात. देशद्रोह आणि पक्षद्रोहाच्या आरोपावरून. सार्वजनिक खटल्याच्या प्रसंगी अपराधाचा त्याला कबुलीजबाब द्यावा लागतो. एवढेच नव्हे तर हातून घडलेल्या अपराधासाठी जनता आणि कोर्टातील उपस्थितांची तो जाहीर क्षमासुद्धा मागतो. कोस्लर यानी फ्लॅशबॅक पद्धतीने कथा सांगितली आहे. कम्युनिझमवरच्या कादंबरीला आवश्यक असणारे एकूणएक घटक येथे हजर आहेत. पक्षावर अव्याभिचारी निष्ठा असणे, थंड डोक्याने सहकाऱ्यांचा विश्वासघात करणे, डोळे झाकून पक्षाने दिलेल्या आज्ञा पाळणे; कम्युनिस्ट पक्षामधे जगभर जे दिसते ते सर्व येथे आहे. रुबाशॉव्हची सुनावणी प्रथम ऐव्हानॉव्ह आणि मागाहून ग्लेटकिन अशा दोन अधिकाऱ्यांसमोर होते. ऐव्हानॉव्ह हा रुबाशॉव्हचा एकेकाळचा क्रांतीकार्यातला सहकारी. त्याला रुबाशॉव्हबद्दल मनातून सहानुभूती वाटत असते. पण पक्षाने म्हणजे नंबर एक ने रुबाशॉव्हची वासलात लावण्याचे ठरविले आहे. म्हणून ऐव्हानॉव्हला सरकारी कामात हयगय केली म्हणून देहान्तशासन दिले जाते. रुबाशॉव्ह एकांत कोठडीत स्वतःच्या गतजीवनाचा विचार करू लागतो आणि बालपणापासून ते तुरुंगाच्या कोठडीत आणि मृत्यूच्या दारात पोहोचेपर्यंत जे प्रश्न त्याने दडपून ठेवले होते ते आता जोर करून वर येतात. रूबाशॉव्ह त्यांचे उत्तर शोधण्यासाठी पुढे धडपडू लागतो. येथे त्याचा पूर्वायुष्याबद्दल संपूर्ण भ्रमनिरास घडून येतो. एवढेच नव्हे. राजकीय मतभेद क्षम्यच नव्हेत तर देशाच्या निरोगी राज्यकारभारासाठी ते आवश्यक असतात; म्हणून मतभेदासाठी मतभेद दर्शविणाराची वासलात लावण्याचे तत्त्वज्ञान घृणास्पद आहे या निष्कर्षाप्रत रुबाशॉव्ह येतो. त्याच्या मनात असाही विचार येतो की, "देशाच्या राजकारणाचे गलबत हाकताना आम्ही आमच्याजवळचे सगळे नैतिक भरवाण गलबताबाहेर समुद्रात फेकून दिले ही आमची मोठीच चूक होती." खटला संपतो. रुबाशॉव्हला देहान्तशिक्षा देण्याचे ठरते नि तुरुंगाच्या कॉरीडॉरमधून त्याला खालच्या तळघरात नेण्यात येते. रुबाशॉव्हला जुन्या करारातील मोझेस आणि परमेश्वराने मोझेसला आश्वासन दिलेल्या स्वर्गाची आठवण होते नि तो स्वतःशी म्हणतो की, "आश्वासित स्वर्ग स्वतःच्या डोळ्यांनी पाहाण्याचे भाग्य मोझेसला लाभले. परंतु या निकोलस सालमानोविच रुबाशॉव्हच्या दैवात ते भाग्य नाही. मोझेसला परमेश्वर डोंगरावर घेऊन जातो नि तेथून भावी स्वर्ग दाखवतो. रुबाशॉव्हला कोणी डोंगरच्या शिखरावर नेले नाही आणि भावी स्वर्गही दाखवला नाही. जिकडे जिकडे त्याने नजर टाकली तिकडे तिकडे त्याला रुक्ष वाळवंट आणि रात्रीचा भयाण काळोख मात्र दिसला." दुसऱ्या क्षणी त्याच्या डोक्यात पाठीमागून गोळी बसते नि तो कोलमडतो. पुस्तक खाली ठेवता ठेवता वाचकाचे मन रुबाशॉव्ह आणि रुबाशॉव्हसारख्या ज्या अनेकांनी सोव्हिएट राष्ट्र घडविण्यासाठी हाडाची काडे केली होती त्या सर्वांबद्दल नि त्यांच्या भीषण

दैवाबद्दल आणि ज्या राजकीय प्रक्रियेने रुबार्शोव्ह आणि नंबर एक याना जन्म दिला होता, त्या प्रक्रियेबद्दल अशा दोन्हीबद्दल भयमिश्रित दुःखाने भरून येते.

राजकीय कादंबरी राजकीय हत्याराचे काम करते. तशाच प्रकारे ती राजकीय इतिहासाच्या इतिहासकाराचेही काम करते. कला निसर्गाची नक्कल करते असे म्हटले जाते; त्याच धर्तीवर राजकीय कादंबरी इतिहासाची नक्कल करते असे म्हणता येईल. बहुतेक सगळ्या राजकीय कादंबऱ्या काही ना काही राजकीय घटनांपासून स्फूर्ती घेऊन लिहिल्या जातात. त्यांची सुरुवात ऐतिहासिक प्रसंगांवरून असते. अर्थात हे प्रसंग लेखकाच्या जाणीवेच्या चाळणीतून बाहेर आलेले असतात. राजकीय कादंबऱ्यांना प्रत्यक्ष व खऱ्याखुऱ्या घटनांचा आधार लागत असल्याने कल्पनेचा वारू मोकळा सोडून त्या लिहिल्या जात नाहीत. या कथा प्रत्यक्ष घटनांवर आधारित असतात. एवढेच नव्हे तर थोड्याफार बौद्धिक प्रयत्नांनी या घटना कोणत्या हे हुडकूनही दाखविता येते. मात्र खऱ्याखुऱ्या घटनांवरून जरी या कादंबरी लिहिल्या जात असल्या तरी शेवटी त्यांच्यात कादंबरीकाराचा राजकारणाबद्दलचा वैयक्तिक दृष्टीकोन उतरल्यावाचून राहात नाही हेही तितकेच खरे आहे. कादंबरीकार हा प्रतिपरमेश्वर असल्याने त्याच्या कादंबरीतील पात्रे ही त्याची वैयक्तिक निर्मिती असते. तो त्यांच्या अंतःकरणात डोकावतो. त्यांच्या आत्म्यात पाहातो. त्यांच्या महत्त्वाकांक्षा उलगडून दाखवितो. त्यांचे संदेह, त्यांच्या भीती शोधून दाखवतो. इतिहासकाराला हे शक्य नसते. ह्या प्रकारचे स्वातंत्र्य त्याला घेणे शक्य नसते.

राजकीय कादंबऱ्या त्यांच्या पात्रांचा राष्ट्रीय स्वभाव उलगडून दाखवितात आणि हा या कादंबऱ्यांचा तिसरा उपयोग होय. राजकीय कादंबरीकार कोठल्या ना कोठल्या राष्ट्रीय समुदायातून आपली पात्रे निवडतो. कधी हा समुदाय भारतीयांचा असेल, कधी ब्रिटिशांचा, कधी रशियनांचा वगैरे. ज्या राष्ट्रीय समुदायांमधून कादंबरीकाराने आपली पात्रे निवडलेली असतात त्या पात्रांबद्दलचा त्याचा दृष्टीकोन आपोआप त्या कादंबरीतून व्यक्त होतो. कधी कधी पात्रांचे राजकीय आचारविचार चित्रित करून त्याच्यावरून राष्ट्रीय व्यक्तिरेखा (पोर्ट्रेट) रेखाटण्याचा प्रयत्न कादंबरीकार करतात. अशा वेळी त्या विशिष्ट समुदायाच्या त्याच्या दृष्टीतील व्यवच्छेदक लक्षणांवर तो भर देतो आणि ती व्यक्तिरेखा साकार करतो. त्या व्यक्तिरेखेचा अभ्यास करून वाचकाला तिच्या राष्ट्रीय स्वभावाचा अंदाज बांधता येतो. समजा कादंबरीकाराने त्याच्या कादंबऱ्यांतून एखाद्या देशातील लोकांच्या राजकीय आचारविचारांचे चित्रण करताना गुप्त कट, क्रान्त्या, भूमिगत चळवळी इत्यादींवर भर दिला असेल, तर तेथील लोक राजकारणाकडे खूप गांभिर्याने पाहातात आणि ते अत्यंत भावविवश स्वभावाचे लोक आहेत असा तर्क वाचक करील. उलट दुसऱ्या एखाद्या देशातील राजकीय कादंबरीत वैधानिक राजकारणाचाच उल्लेख येत

असेल तर तेथील लोक राजकीयदृष्ट्या बऱ्याच प्रमाणात प्रगल्भ आहेत असाही तर्क तो काढील. महत्त्वाचा मुद्दा राजकीय कादंबऱ्या वाचून राष्ट्रीय स्वभावाबद्दल कल्पना मिळणे शक्य आहे हा आहे.

राजकीय कादंबऱ्यांमधे राजकीय भूमिका येतात आणि अशा प्रकारे राजकीय कादंबरी ही राजकीय हत्यार बनते. राजकीय कादंबऱ्या राजकीय इतिहासाचे चित्रण करतात. राजकीय कादंबऱ्या राष्ट्रीय स्वभाव रेखाटतात. राजकीय कादंबऱ्यांमधे जसे हे तीन विषय चित्रित होतात तशाच प्रकारे समाजातील निरनिराळ्या राजकीय वर्गांच्या वागणुकीचे चित्रसुद्धा या कादंबऱ्यांतून मिळते. समाजामधे नेहमीच भिन्न भिन्न गट वावरत असतात आणि या गटांचा आपापसात काही वेळा संघर्ष असतो. निदान या गटांची आपापसात स्पर्धा तरी निश्चितच असते. संघर्ष आणि स्पर्धा या दोघांनाही राजकीय रंग येणे शक्य आहे. राजकीय कादंबरीकार या संघर्ष आणि स्पर्धेवर आधारित कादंबरी रचू शकतो. समाजामधे आढळणाऱ्या वर्गाचे दोन ठळक प्रकार आहेत. एक आर्थिक वर्ग आणि दुसरा राजकीय वर्ग. आर्थिक वर्ग आर्थिक कारणांवर ठरतात, तर राजकीय वर्ग राजकीय भूमिकांवर. भुकेकंगाल (लुंपेन प्रोलिटॅरिअन्स) शेतकरी, कुशल कामगार, सामान्य अकुशल कामगार (प्रोलिटॅरिअट) मध्यम वर्ग, श्रीमंत आणि उच्च घराण्यातील मंडळी हे काही आर्थिक वर्ग. पैकी मध्यमवर्ग हा एक सैल वर्ग आहे. मध्यम वर्गामधे बुद्धिजीवी नावाचा आणखी एक उपवर्ग दिसून येतो. आर्थिक वर्गाची राजकीय वागणूक आनुषंगिक असते. राजकीय कारणासाठी ते राजकीय भूमिका वठवित नाहीत तर अन्य कसल्या ना कसल्या निमित्ताने जेव्हा हे वर्ग काही कृती करतात तेव्हा कधी कधी ती कृती राजकीय रंगरूप घेते. आर्थिक वर्गांप्रमाणेच समाजामधे निखळ राजकीय विचारांसाठी म्हणूनही काही वर्ग अस्तित्वात येतात. उदा. अधिकाराच्या स्थानावर असणाऱ्या राजकारण्यांचा वर्ग. ही मंडळी वर्षानुवर्षे आणि पिढ्यानपिढ्या अशी राजकीय पदे या ना त्या प्रकाराने बळकावून बसलेली असतात. आवश्यक त्या सर्व खटपटी, लटपटीही करतात. आमदार-खासदार मेला की त्याचा मुलगा, नातू, त्याची बायको, सून त्या पदाचा कब्जा घेताना आपण नेहमी पाहातोच. तर हा वर्ग अशा वृत्तीच्या लोकांचा असतो. प्रत्येक देशात राजकीय पक्ष असतात आणि या पक्षांचे सभासदही असतात. या प्रत्येक पक्षाची विशिष्ट विचारसरणी असल्याने पक्षाच्या सभासदांचे वर्तनसुद्धा नेहमी काही एका ठराविक प्रकारेच घडून येते.

राजकीय सत्ता हस्तगत करण्याची आणि एकदा हाती आलेली सत्ता कायम स्वतःच्याच हाती ठेवण्यासाठी कोणत्या हिकमती लढवायच्या याचे आता तंत्र बनले आहे. या तंत्रातील कौशल्य हे जसे धंदेवाईक राजकारणपटूंचे वैशिष्ट्य आहे, तशाचप्रकारे वरच्या, मधल्या व खालच्या आर्थिक आणि सामाजिक वर्गामधे आढळून येणारे बेसिक

किंवा मूलभूत राजकीय दृष्टिकोन हे त्या वर्गांचे वैशिष्ठ्य झाले आहे. कादंबरीकार या गटवैशिष्ट्यांचा उपयोग करून आपली कादंबरी रंगविलही.

राजकीय कादंबरीकार वैयक्तिक पात्रांच्या राजकीय वर्तनाचा वापर करूनही आप्ली कादंदरी रचिल. तशाचप्रकारे मानवी गटांच्या राजकीय वर्तनाचा वापर करूनही कादंबरी रचिल. कारण यातील प्रत्येकजण काही मूलभूत राजकीय मतांसाठी एकत्रित आलेला असतो. माणसांच्या गटांच्या राजकारणावर जशा कादंबऱ्या लिहिल्या जाणे शक्य आहे, तशाच प्रकारे mass phenomenon किंवा झुंडीच्या कृत्यांवरसुद्धा कादंबऱ्या लिहिल्या जाणे शक्य आहे. म्हणजेच धार्मिक झेंडे, जातीय झेंडे, ऐतिहासिक झेंडे खांद्यावर घेऊन जी राजकीय कृत्ये केली जातात त्याच्यावरही कादंबऱ्या लिहिता येतात. हे झेंडे खांद्यावर घेणाऱ्या अनुयायांचे मानसशास्त्र जसे येथे उपयोगी पडते, तसेच अनुयायांच्या खांद्यावर झेंडे देण्यासाठी सर्व प्रकारच्या बऱ्यावाईट, नैतिकअनैतिक, सूक्ष्मासूक्ष्म हिकमती लढविणाऱ्या झुंडीच्या पुढाऱ्यांचे मानसशास्त्रसुद्धा त्या कामी उपयोगी पडते. कारण डावपेच लढवूनच अनुयायांच्या खांद्यावर हे झेंडे दिलेले असतात. हे सर्व राजकारण कादंबरीच्या माध्यमातून उत्तम प्रकारे चित्रित होईल. या सगळ्या प्रकारचे अतिशय सखोल विश्लेषण या कादंबऱ्या करतील.

राजकीय कादंबऱ्यांमधे आणखी जो एक विषय येतो तो म्हणजे आंतरराष्ट्रीय कम्युनिझमचा. राजकीय कादंबरीच्या संदर्भात सामुदायिक, राजकीय आचारविचाराची (ग्रुप पोलिटिकल विहेव्हियर) चर्चा करताना आंतरराष्ट्रीय कम्युनिझमचा उल्लेख टाळताच येणार नाही. किंबहुना खाली राजकीय कादंबरीच्या चर्चेसाठी कोस्सलर यांची जी 'डार्कनेस ॲट नून' ही कादंवरी आम्ही घेतली आहे तिचा अर्धा गाभा तर आंतरराष्ट्रीय कम्युनिझमशीच प्रत्यक्षपणे संबंधित आहे. तेव्हा आंतरराष्ट्रीय कम्युनिझम हाही राजकीय कादंबऱ्यांचा एक महत्त्वाचा विषय आहे.

'आंतरराष्ट्रीय कम्युनिझम' हा एक तसा गोंधळात टाकणारा विषय आहे. त्याचबरोबर कादंबरीत त्यातील स्टॅलिनच्या नावाशी संबंधित असलेला 'आंतरराष्ट्रीय कम्युनिझम' प्रामुख्याने परावर्तित होताना दिसतो. मुळात देशोदेशी कम्युनिस्ट चळवळ केली, ती कामगारांना स्वतंत्र करण्यासाठी व कामगारांचे जागतिक राज्य स्थापण्याच्या ध्येयाने. पण स्टॅलिन सत्तेवर येताच या ध्येयाला मुरड घातली गेली. म्हणजे साधारण एकोणिसशेपंचवीसच्या आगेमागे. पूर्वी देशोदेशीचे कम्युनिस्ट पक्ष रशियाकडून पैशाची मदत घेऊन आपापल्या देशाचे राजकारण करीत. स्टॅलिनने ते थांबविले. 'मार्क्सवादाचा पुर्नविचार' या भारदस्त नावाखाली स्टॅलिनने असा फतवा काढला की, रशिया हा कम्युनिझमचा बालेकिल्ला आहे. सध्या सर्वांनी हा बालेकिल्ला सांभाळण्यासाठी झटायचे.



अनुक्रमणिका

पुढे कम्युनिझमला बरे दिवस आले की जागतिक राज्यासाठी प्रयत्न करायचे. या नव्या तत्त्वाखाली देशोदेशींच्या घटक पक्षांनी करायच्या कामाची नवी वाटणी अंमलात आली. या नव्या वाटणीप्रमाणे कम्युनिझमचा अर्थ लावण्याचे काम क्रेमलिनपाशी राहिले तर क्रेमलिनने दिलेले आदेश पाळण्याचे काम घटक पक्षांकडे आले. थोडक्यात घटक पक्षानी किती मर्यादेपर्यंत स्वतंत्र विचार करायचा याची हद्द क्रेमलिनने ठरवून दिली.

देशोदेशीच्या कम्युनिस्ट पक्षांना क्रेमलिनचे आदेश अंमलात आणणाऱ्या संघटना एवढेच अस्तित्व उरले. या नव्या योजनेखाली कम्युनिझम ही आंतरराष्ट्रीय स्वरूपाची चळवळ आहे हा जुना देखावा तसाच चालू ठेवला गेला. पण आतून मात्र रशियाला राजकीय मदत होईल अशाच धोरणाने चळवळ सुरू ठेवण्यात आली. देशोदेशी गिरणीकामगारांचे, खाणकामगारांचे संप घडविले गेले. पण मालक–कामगार यांच्यातील स्थानिक तंट्याचा भाग म्हणून नव्हे, तर वर्गयुद्धाचे प्रात्यक्षिक त्या त्या देशातील जनतेला दाखवावे म्हणून किंवा कम्युनिझमच्या नावाने जनता कशी प्राणार्पण करते हे सिद्ध करावे म्हणून. पक्षाला उपयोगी पडणाऱ्या हुतात्म्यांची जंत्री मिळावी म्हणून.

'डार्कनेस ॲट नून' ह्या कादंबरीचा अर्धा भाग याच स्टॅलिनप्रणीत नव्या कम्युनिस्ट योजनेच्या चित्रणावर खर्च केला गेला आहे. रुबाशॉव्ह आणि ग्लेटकिनच्या संवादांमधे हा भाग आला आहे. 'जागतिक क्रांती' हे कम्युनिझमचे जाहीर उद्दिष्ट. पण रशियाच्या फायद्याच्या नावाने स्टॅलिन ते उद्दिष्ट बदलून टाकतो. स्टॅलिन म्हणतो की, रशियन क्रांतीच्या पाठोपाठ जागतिक क्रांती घडून आली नाही याचा अर्थ अशा क्रांतीला दिवस सोयीचे नाहीत. पक्ष मग ठराव पास करतो, अर्थात स्टॅलिनच्या दडपणाखाली, की रशियन क्रांतीच्या रूपात पक्षाने जे कमावले आहे तेच सध्या सांभाळून ठेवणे आणि योग्य वेळ येताच जागतिक क्रांतीसाठी उठाव करणे. 'कम्युनिस्ट तत्त्वज्ञान आणि कम्युनिस्ट व्यवहार' यांच्यातील अंतर्विरोधावर कितीतरी राजकीय कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत.

राजकीय कादंबरीमधे राजकीय जनता चळवळी, राजकीय गट आणि त्यांची राजकीय वागणूक व त्या वागणुकीचे विश्लेषण येते. तशाचप्रकारे व्यक्तीच्या राजकीय वागणुकीचेही विश्लेषण येणे शक्य आहे.

व्यक्तीची राजकीय वागणूक आणि एखाद्या गटाची तसलीच सामुदायिक वागणूक या दोहोतील सीमारेषा फार पातळ आहे. त्यामुळे व्यक्तीकेंद्रित आणि वर्गकेंद्रित राजकीय कादंबऱ्यांमधे फरक दाखविताना अडचणीचे होते. व्यक्ती राजकीय शक्तींच्या हातातील बाहुले असेल किंवा तिच्या मध्यस्थीने राजकीय वास्तव प्रतिबिंबित होत असेल किंवा कदाचित ती एवढी प्रभावी असेल की ती स्वतः राजकारणाला वळण देणारी असेल.



अनुक्रमणिका

परंतु काही झाले तरी ज्याला आपण ज्यास प्रेरणा—मोटिव्हेशन म्हणतो ती शेवट वैयक्तिक असल्याने व्यक्तीकेंद्रित कादंबऱ्यांमधे याच प्रेरणा मोटिव्हेशन किंवा हेतुपरंपरेच्या मुद्याला महत्त्व असते. ज्या राजकीय कादंबऱ्यांमधे नायकाला महत्त्व दिले जाते तेथे हेतुपरंपरेवर लक्ष केंद्रित करून कथा रचण्यात येते. अशा वेळी नायकाची वैयक्तिक राजकीय महत्त्वाकांक्षा किंवा त्याचा भ्रष्टाचार वगैरे हा एक कल्पनाबंध या कादंबऱ्या वापरतात. काळाबरोबर बदलत गेलेली राजकीय नीती हा सुद्धा एक कल्पनाबंध या कादंबऱ्या वापरतात. प्रमुख पात्रामधे घडून आलेली नैतिक स्थित्यंतरे हे त्याचेच आणखी एक अंग. नायक आणि प्रतिनायक यांच्यातील संबंध रंगविताना आपोआपच नेता आणि त्याचे अनुयायी यांच्यातील आपापसातील संबंधावरही खूप लिहिले गेले आहे.

येथे राजकीय कादंबरीतील एकेकट्या पात्राबद्दल आणि त्याच्या राजकीय वागणुकीबद्दल आपण बोलत आहोत. पण ही राजकीय पात्रे मानसिकदृष्ट्या निरोगी असतील किंवा रोगग्रस्तही असतील. या कादंबऱ्याना पात्र निरोगी आहे की रोगग्रस्त आहे याचे वावडे नसते. मानसिकदृष्ट्या आजारी पात्र घेऊन या कादंबऱ्या उभ्या राहतील. अर्थात निरोगीपण आणि आजारपण यातील सीमारेषा अत्यंत अस्पष्ट आहे. डोस्टोव्हस्की या रशियन कादंबरीकाराच्या राजकीय कादंबऱ्यांमधे मनाने आजारी असणारी अनेक पात्रे आढळतात. तथापी रोगग्रस्तता आणि मनाचा निरोगीपणा यातील फरक जरी चेहरा पाहाताच सांगता येत नसला, तरी ध्येयवेडा कोण आणि मानसिक गरजेपोटी हिंसाचाराला प्रवृत्त झालेला कोण हे मात्र ती संपूर्ण कथा वाचताच सहज सांगता येते. डोस्टोव्हस्कीच्या कादंबऱ्यातील सगळे क्रांतीकारक ठार वेडे दाखविलेले आहेत. किरिलॉव्ह हे 'द पझेस्ड' कादंबरीतले पात्र म्हणते की आपणाला प्रतिपरमेश्वर व्हायचे आहे आणि आपण जर का स्वतःच्या हाताने स्वतःचा जीव घेऊ शकलो तर आपण प्रतिपरमेश्वर होऊ. तर या पात्रांबद्दल शार्टोव्ह नावाचे दुसरे एक पात्र असा उद्‌गार काढते की उद्या जर का संपूर्ण रशियाचा कायापालट घडून आला तर आपल्या आयुष्याचे आता काय करावे हेच या मंडळींना समजणार नाही. "ज्याला शिव्याशाप द्यावेत असे कुणी त्यांच्या आयुष्यात आता उरणार नाही, ज्याचा द्वेष करावा असाही कुणी उरणार नाही, ज्याच्यातील दोष काढावेत असा कुणी त्याना सापडणार नाही. रशियाबद्दलच्या तीव्र द्वेषाव्यतिरिक्त दुसरे काहीही त्यांच्या रक्तात आढळणार नाही." मुद्दा हा की राजकीय कादंबऱ्यांमधे अशा प्रकारची वेडी, मार्थफिरू, दुसऱ्यावर हुकुमत गाजविण्याची विकृत हौस बाळगणारी (म्ह. ऑथॉरिटेरिअन), लैंगिकदृष्ट्या विकृत आणि वाममार्गी, हौतात्म्याची हौस असणारी सर्व प्रकारची माणसे येऊ शकतात. असो.

राजकीय कादंबरीच्या स्वरूपाबद्दलचे विवेचन फारच लांबले. हा खरे तर स्वतंत्र

लेखाचा विषय आहे. संपादकियाला मर्यादा असतात. त्या मर्यादा लक्षात घेऊन हे विवेचन अगदी मोजक्या शब्दात मांडले आहे.

राजकीयदृष्ट्या लोकांना शहाणे करण्याचे काम वर्तमानपत्रे नेहमी करतात असे आपण ऐकतो. परंतु वर्तमानपत्रांपेक्षासुद्धा कादंबऱ्यांकडून हे काम अधिक उत्तम प्रकारे होऊ शकते. 'डार्कनेस ॲट नून' सारख्या कादंबऱ्या किती वाचकप्रिय होतात हे आपण पाहातोच. या कादंवऱ्यांतून जेव्हा राजकीय चर्चा वाचकांपर्यंत पोहोचते तेव्हा ती अधिक परिणामकारक ठरते. 'डार्कनेस ॲट नून' सारखी एखादी चांगली कादंबरी योग्य वेळी जर का प्रसिद्ध झाली तर वाचकाच्या मनावर ती कायमचा परिणाम करून जाते. राजकीय घटनांचे वास्तव तपाशील देणाऱ्या वर्तमानपत्री रकान्यांपेक्षा, संपादकीय अग्रलेखांपेक्षा, अडीचशे, तीनशे पानांची कादंबरी अधिक राजकीय माहिती तर देईलच, पण वाचकाला त्या राजकीय प्रश्नांमधे अधिक मोठ्या प्रमाणावर गुंतवूनही ठेविल. वाटल्यास कादंबरीकार एखाद्या गिबनबरोबरही स्पर्धा करील आणि सरदेसायांना मागे टाकील. शतकांमागून शतके त्याला धुंडाळता येतील आणि शिवाजी महाराजांपासून ते थेट आजच्या माणसांपर्यंतही तो वळेल किंवा उद्याच्या माणसाबद्दलही तो बोलेल. साम्राज्यांचा उदय आणि अस्त हा जर ऐतिहासिक लेखकांच्या लिखाणाचा विषय असला तर राजकीय चळवळींची भरभराट आणि पीछेहाट हा राजकीय कादंबरीकाराच्या लिखाणाचा विषय आहे.

राजकीय कादंबरीला भविष्यसुद्धा बऱ्यापैकी आहे. कारण नागरिकाच्या जीवनावरचा राजकारणाचा पगडा कमी होण्याऐवजी दिवसानुदिवस वाढतच चालला आहे. साहजिकच राजकीय जीवनावरच्या कादंबऱ्याना दिवस भरभराटीचे आहेत यात शंकाच नाही. डोस्टेव्हस्कीने कम्युनिझमच्या उगमावर कादंबऱ्या लिहिल्या. कोस्सलरनी कम्युनिझममधल्या फुटीर चळवळींबद्दल आणि पंथीय भांडणे आणि संघर्ष याबद्दल कादंबरी लिहिली. आणखी कुणी कम्युनिझमच्या अखेरच्या पर्वाबद्दल कादंबरी लिहील.

* * * * *

'डार्कनेस ॲट नून' चा मराठी अनुवाद उपलब्ध आहे. १९५० साली वसंतराव नारगोळकर यानी तो केला असून, कोल्हापूरच्या महाराष्ट्र ग्रंथ भांडाराने 'भर दुपारच्या अंधारात' या नावाने तो प्रसिद्ध केला. **आम्ही प्रस्तुत अंकासाठी त्या अनुवादाचा उपयोग केलेला नाही.** विवेचन करताना जो मजकूर आम्हाला लागला तो आम्ही मूळ कादंबरीतून नव्याने भाषांतर करून घेतला आहे.

* * * * *



अनुक्रमणिका

संदर्भासाठी 'हेरॉन बुक्स' या कंपनीने तयार केलेली 'डार्कनेस ॲट नून' ची प्रत आम्ही वापरली आहे. तसेच कादंबरीची ओळख आणि कादंबरीवरचे भाष्य लिहिताना गोरोन्वी रीज यांचे भाष्य वापरले आहे. मात्र मासिकातील मजकूर हे त्याचे भाषांतर नाही.

'डार्कनेस ॲट नून' या कादंबरीविषयी काही नामवंत युरोपीय लेखकांची मते 'नवी क्षितिजे' च्या पुढील काही अंकातून देण्यात येतील.

* * * * *

"नवी क्षितिजे"चा हा अंक छापून पुरा होत असतानाच "नवी क्षितिजे" चे एक लेखक श्री. स. ह. मोडक यांचे निधन झाल्याचे समजले. त्यांच्या मृत्यूने "नवी क्षितिजे" ची हानी झाली आहेच, त्याजवरोबर "नवी क्षितिजे" चे वाचकही एका चांगल्या लेखकाच्या अनेक चांगल्या लेखांना मुकले आहेत.

त्यांच्या स्मृतीस प्रणाम.

— संपादक

## कोस्सलर यांची काही ठळक फुटकळ टिपणे

- ज्या कुणाला मनापासून द्वेष करता येत नाही त्याला मनापासून प्रेमसुध्दा करता येत नाही.
- त्याने सत्तरी पूर्ण केली; नि आपल्या सगळ्या गत पापांना घाऊक माफी देऊन टाकली. पण असे दिसते की ही गोष्ट अबोध मनाला कळवायचे तो विसरून गेला होता.
- आमच्या शत्रूंची सगळ्यात वाईट गोष्ट ही की त्यांच्यामधे काही ना काही चांगले नि आकर्षक गुण असतात.
- म्हातारपणी म्हातारपण हाच काय तो एकमेव गंभीर प्रश्न मागे उरलेला असतो.
- हातात बडगा घेऊन खुद्द माझा भूतकाळच माझ्या विरुध्द उठला आहे.
- अतिरेक कोठेही वाईटच. संयमाचा अतिरेक देखिल.

□□



अनुक्रमणिका




# 'डार्कनेस ॲट नून' अशी लिहिली गेली

**- नांना जोशी**

'डार्कनेस ॲट नून' ही कादंबरी अनेकांच्या प्रत्यक्ष अनुभवांवर आधारीत आहे. या कादंबरीकरिता लागणारी सामुग्री कोस्सलर खूप वर्षे जमा करीत होते. त्यांच्या अनेक मित्रांचे स्वतःचे अनुभव या कादंबरीत आलेले आहेत. तरूणपणी कोस्सलर यांना जवळचे मित्र तसे मोजकेच होते. ते सर्व एकतर कम्युनिस्ट पक्षाचे पक्षसदस्य तरी होते किंवा सहप्रवासी तरी. या मित्रात ऑस्ट्रियन कम्युनिस्ट पक्षाचे सदस्य अलेक्झांडर विसबर्ग व त्यांची पत्नी इव्हा या दोघांचा क्रमांक खूप वरचा होता. विसबर्ग हे पदार्थ विज्ञान शास्त्रज्ञ तर त्यांची पत्नी इव्हा ही चित्रकार व चिनी मातीच्या भांड्यांचे आराखडे तयार करणारी होती. कोस्सलर इव्हाला बालपणापासून ओळखत असत. विसबर्ग यांच्या मानाने इव्हा खूपच देखणी होती. पुढे या पतीपत्नीने सोव्हिएट युनियनमधे नोकरी पत्करली. युक्रेनीस इन्स्टिट्यूट ऑफ फिजिक्स या संस्थेत विसबर्ग फार मोठ्या पदावर काम करू लागले. कालांतराने रशियामधे स्टॅलिनने महान पक्षसफाईचा कार्यक्रम सुरू केला आणि या कार्यक्रमाची फार मोठी झळ प्रा. विसबर्ग यांना लागली. रशियन गुप्त पोलिसांनी त्यांचा खूप छळ केला. 'डार्कनेस' मधे आलेले बरेचसे वाङमयीन साहित्य कोस्सलर यांना इव्हाने पुरविले आहे आणि ते बहुतेक खुद्द तिच्या स्वतःच्या अनुभवावर बसवलेले आहे. अलेक्झांडर विसबर्ग यांनी Conspiracy of Silence नावाचे आत्मचरित्र लिहिले आहे. त्यातल्या अनुभवांपैकी काही भाग या कादंबरीत आला आहे. जिज्ञासूनी मुळातच ते पुस्तक वाचावे. एक साहित्यकृती म्हणून तर ते उत्तम आहेच, परंतु त्यात नमूद केले गेलेले अनुभव देखिल तत्कालिन सोव्हिएट युनियनमधील परिस्थितीबद्दल खूप सांगून जातात.

महान पक्षसफाई यज्ञाच्या काळात प्रा. अलेक्झांडर विसबर्ग यांना 'जीपियु' या पोलीस संघटनेने तुरुंगात डांबले होते. वाईसबर्ग यांची तुरुंगात रवानगी होण्याचे एकमेव कारण म्हणजे बुखारीन विरुध्दचा सरकारी साक्षीदार म्हणून त्यांचा उपयोग करून घ्यायचा होता. तुरुंगात वाईसबर्ग यांना दिवस-रात्र छळण्यात आले. छळ सहन करण्याची शक्ती जेव्हा त्यांच्या अंगात उरली नाही तेव्हा त्यांनी कबुली जबाबावर सही केली. तथापि नंतर



अनुक्रमणिका

पुरेशी झोप आणि विश्रांती मिळताच त्यांनी तो कबुलीजबाब मागे घेतला. कारण आपली चूक त्यांच्या ध्यानात आली होती. असे एकूण दोन वेळा झाले. तेव्हा जीपियुने त्यांचा नाद सोडला. त्यांच्या ध्यानात आले की, हा गृहस्थ 'कणखर' आहे. साक्षीदार म्हणून बुखारीनच्या विरुध्द हा उपयोगी पडण्यासारखा नाही. आयत्या वेळी बुखारीनवरच्या सार्वजनिक खटल्याच्या वेळी हा उलट फिरायचा. तेव्हा त्यांनी त्याला त्या खटल्यातून मोकळे केले. परंतु दुसऱ्या कारणाखाली तुरुंगात ठेवले. पुढे एकूण तीन वर्षे ते रशियातल्या निरनिराळ्या तुरुंगात होते. नाझी जर्मन आणि सोव्हिएट रशिया या दोघांच्या दरम्यान करार झाल्यानंतर जीपियुने वाईसबर्ग यांची रवानगी जर्मनीत केली आणि त्यांना जर्मन गुप्तपोलीस - गेस्टापोच्या हाती सोपविले. वाईसबर्ग यांच्याच बरोबर दुसऱ्या अनेक ऑस्ट्रियन व जर्मन कम्युनिस्ट, समाजवादी आणि नाझी विरोधकांनाही गेस्टापोच्या हवाली करण्यात आले होते. गेस्टापोच्या छळाला तोंड देऊनही जिवंत राहाण्याचा पराक्रम वाईसबर्ग यांनी केला होता. युध्द चालू असताना पोलंडमधील भूमिगत चळवळीत राहून त्यांनी महत्वाची कामगिरी बजावली होती. युध्द समाप्तीनंतर त्यांनी पश्चिम युरोपमधे पलायन केले. हे त्यांचे सगळे अनुभव 'कॉन्स्पिरसी ऑफ सायलेन्स' या त्यांच्या आत्मचरित्रात आले आहेत. या पुस्तकाला आर्थर कोस्सलरनी प्रस्तावना लिहिली आहे.

रशियात बंदी असताना वाईस बर्गना खारकॉव्ह (सोव्हिएट युनियनमधील एक शहर) च्या तुरुंगात होते. जर्मन (नाझी) राष्ट्राच्या वतीने हेरगिरी केल्याचा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला होता. युक्रेनमध्ये सशस्त्र बंडाची उठावणी करण्यास त्यांनी मदत केली हाही आरोप त्यांच्यावर होता. सर्वात कहर म्हणजे स्टॅलिन आणि मार्शल व्होरोशियाव्ह हे दोघे कॉकेशस पर्वतराजीत शिकारीसाठी जातील तेव्हा नाझी राष्ट्रीय समाजवादी अतिरेक्यांच्या मदतीने त्या दोघांचा खून घडवून आणण्यासाठी नाझी राष्ट्रीय समाजवाद्यांची जमवाजमव करण्यात त्यांनी पुढाकार घेतला असे त्या आरोपाचे स्वरूप होते. या सर्व आरोपांचा विचार करता वाईसबर्ग यांना फाशी होणे अटळ होते. या प्रसंगी वाईसबर्गना वाचविण्यासाठी त्यांची पत्नी इव्हा हिने कोस्सलरना विनंती केली. वाईसबर्गना वाचविण्यासाठी मी प्रयत्नांची शर्थ करीन, असे आश्वासन कोस्सलरनी तिला दिले होते. परंतु या बाबतीत काही चांगले घडेल याबद्दल कोसलर आशावादी नव्हते. त्यांनी एक शक्कल लढविली. स्वतः वाईसबर्ग हे पदार्थशास्त्रातील एक महत्वाचे संशोधक होते. या शास्त्रात त्यांचे नाव मोठे होते. तेव्हा नोबेल प्राइस मिळालेल्या पदार्थविज्ञान शास्त्रज्ञांनी स्टॅलिनला गळ घातली तर काम होईल असे कोस्सलरना वाटले. तेव्हा त्यांनी तीन फ्रेंच पदार्थविज्ञान शास्त्रज्ञांची मदत घेण्याचे ठरविले. त्यांनी फ्रेडरिश्व आणि आयरिन जोलिओ क्युरी आणि जॉं पॅरिन या तीन फ्रेंच पदार्थविज्ञान शास्त्रज्ञांकडे शब्द टाकला. ही तिघेही कम्युनिस्टांचे सहप्रवासी होते. नोबेल पारितोषिक विजेतेही होते. कोस्सलर यांनी

स्टॅलिनसाठी एक पत्र तयार केले; व ते या तिघांना भेटले. वाईसबर्ग यांच्यावरचा खटला बनावट आहे, पुरावा खोटा आहे हे कोस्सलर यांचे म्हणणे क्युरी पती-पत्नीने मान्य केले. जाँ पारिन यांनीही ते मान्य केले. प्रथम क्युरी पती-पत्नीने सही केली. मागाहून जाँ पारिन यांनी सही केली. आइन्स्टीन यांनी स्वतःच स्टॅलिनला लिहिले. नोबेल पारितोषिक विजेत्यांच्या या पत्राला पोच आणि उत्तर कधीच आले नाही. परंतु वाईसबर्ग यांना जीवदान मिळाले. कदाचित कोस्सलर यांच्या पत्राचाही तो परिणाम असावा.

वाईसबर्ग यांचे हे अनुभव 'डार्कनेस—' कादंबरीची पार्श्वभूमी आहेत.

## २.

'डार्कनेस—' कादंबरीचे 'डार्कनेस' हे नाव मागाहून देण्यात आले आहे. सुरवातीला हे नाव The Vicious Circle 'दुष्ट वर्तुळ' असे होते. हे झाले नावाबद्दल. तीच गोष्ट कादंबरीच्या लेखनाबद्दल. ही कादंबरी पूर्ण करून प्रकाशकाकडे पाठविली गेली नव्हती, तर तिचा फक्त स्थूल आराखडा प्रकाशकाकडे पाठविण्यात आला होता. प्रकाशकांचे नाव जोनाथन केप. संकल्पित कादंबरीचा गोषवारा म्हणून काही मजकूर कोस्सलर यांनी **जोनाथन केप** यांच्याकडे धाडला. त्यांना तो पसंत पडला नि त्यांनी होकार दिल्यावर कोस्सलरनी कादंबरी लिहून पूर्ण केली. एका सर्वंकष सत्तावादी देशातील पाच जणांच्या फाशीची हकिकत या गोषवाऱ्यात त्यांनी दिली होती. या पाचांनी देशाची एकनिष्ट सेवा केली होती. देशात क्रांती घडवून आणताना त्यांनी स्वतःच्या प्राणापासून कशाकशाकडेही पाहिलेले नव्हते. साध्य-साधनविवेकाला तिलांजली दिलेली असते. नीती-अनितीची चाड बाळगलेली नसते. प्रस्थापित रूढ नितीचे सगळे संकेत पायदळी तुडविलेले असतात. कोठल्याही प्रकारच्या नैतिक प्रश्नाला किंमत दिलेली नसते. हे सर्व करताना त्यांनी फक्त एक ध्येय पुढे ठेवलेले असते. मनुष्याची भावी पिढी सुखी झाली पाहिजे. भावी पिढीच्या नावाने चालू पिढी खर्ची पडली तरी हरकत नाही, अशा भावनेने ते वागलेले असतात. आजच्या मानवजातीपेक्षा उद्या येणारी मानवजात त्यांना महत्वाची वाटत असल्याने उदात्त ध्येय साध्य करताना अत्यंत नीच असे मार्ग वापरावे लागले तरी ते वापरावेत, तसे करणे क्षम्यच नव्हे तर स्तुत्य आहे ही त्यांची धारणा असते. नि त्या धारणे बरहुकूम ते आजवर वागलेले असतात. आता लाभ होत असेल तर नैतिकतेचा बळी देण्यात काहीच वावगे नाही. या गृहित श्रध्देवर त्यांचे सगळे तत्वज्ञान आधारलेले असते आणि तेच त्यांच्या वागण्याचे अंतिम समर्थनसुध्दा असते. आता असे घडते की, ज्या उज्वल भवितव्यासाठी त्यांनी आजवर अनेकानेकांचा बळी दिलेला असतो त्याच उज्वल

भवितव्याच्या परिपूर्तीसाठी खुद्द त्यांचा बळी देण्याचा प्रसंग उद्‌भवतो. त्यांच्या बळी जाण्याने ते उदात्त साध्य जवळ येणार असते. आता काय होणार ? सोव्हिएत रशियाच्या संबंधातला आणि एकूणच क्रांतीच्या तत्वज्ञानात खोलवर दडून असणारा हा नैतिक प्रश्न घेऊन कोस्सलरांना कादंबरी लिहायची होती. सुरवातीला वर म्हटले त्याप्रमाणे एकूण फक्त ५।६ पात्रे त्यांच्या नजरेसमोर होती.

१९३८-३९ च्या दरम्यान स्टॅलीनने आपल्या जुन्या सहकाऱ्यांचा बळी घेण्यासाठी दिखाऊ खटल्यांचे नाटक उभे केले होते. हे सहकारी डोईजड होतील अशी भीती त्याला वाटत होती. तसेच सर्व सत्ता एकट्याच्या हाती एकत्रित करून पुढे राजकीय चळवळ करावयास मुक्त संस्था शिल्लकच ठेवायची नाही असा त्याचा बेत असल्याने ज्यांनी ज्यांनी त्याच्या खांद्याला खांदा लावून क्रांतीच्या चळवळीत भाग घेतला होता त्यांचा कायमचा निकाल लावून टाकल्यावाचून चालणार नाही अशी भूमिका त्याने घेतली आणि त्यातून हे चालणार नाही, अशी भूमिका त्याने घेतली आणि त्यातून हे दिखाऊ खटले उभे राहिले. या खटल्यात सर्व जुन्या बोल्शेव्हिकांनी खुषीचे कबुलीजबाब दिले नि ते पाहून सर्व जगाला बौध्दिक धक्का बसला. एका रात्रीत राष्ट्रभक्तांचे रुपांतर राष्ट्रद्रोह्यात कसे झाले हेच जगाला कळेना ! रशियातल्या त्या दिखाऊ पोलीस खटल्यावरून कोस्सलर यांनी स्फूर्ती घेऊन कादंबरी लेखन सुरू केले. पण तरीही कादंबरीचा कसलाही सुस्पष्ट आराखडा त्यांच्यासमोर नव्हता. नाही म्हणावयास कादंबरीच्या संदर्भातील फक्त एक व्यक्तीरेखा अगदी सुस्पष्टपणे त्यांच्या मनात उभी राहिली होती. कोस्सलर स्वतःच या नायकाच्या व्यक्तीत्वाबद्दल लिहितात की, ''जुन्या बोल्शेविक दिग्गजांपैकी तो एक. निकोलाय बुखारीन वरून त्याची विचार करण्याची पध्दती बेतलेली होती. त्याचे बाह्य व्यक्तिमत्व आणि चेहरपट्टी वगैरे कार्ल रॅडेक आणि लिऑं ट्राटेस्की या दोघा बोल्शेविकांच्या एकत्रिकरणातून रंगविलेले आहे.''

कादंबरीचा प्रारंभीचा भाग समजावयास अगदी सोपा आहे. रुबाशॉव्हला अटक करण्यासाठी खुद्द त्याचेच लोक आलेले असतात तेव्हा रुबाशॉव्ह गाढ झोपेत असतो नि त्याला अटकेचेच स्वप्न पडत असते. फक्त स्वप्नात तो शत्रूच्या प्रदेशात असतो नि शत्रुचे लोक त्याला पकडण्यासाठी आलेले असतात. डोळ्यावर झोप असल्याने रुबाशॉव्हच्या दोन हुकूमशहा शत्रूंपैकी नेमके कोणाचे पोलीस आले आहेत हे त्याला ठरविता येत नाही.

कोस्सलर यांनी एवढा सुरुवातीचा प्रसंग लिहून काढला नि त्यांची गाडी रुळावरून सुसाट पळत सुटली. पुढे काही त्यांना घटना, युक्तिवाद वगैरेसाठी डोकेफोड करावी लागली नाही वा थांबूनही बसावे लागले नाही. कोस्सलर स्वतःच लिहितात की, 'एकदा पहिला प्रवेश लिहून काढला नि मग आराखडा वगैरेची चिंता करावी लागली नाही.

गेली सात वर्षे हे सर्व प्रसंग नि घटना बाहेर पडण्याची वाट पाहात थांबून राहिले होते. या सर्व आठवणी आणि विचार बळेच बंद करून ठेवले असल्याने आंबून त्यांचे अगदी उत्तम रसायन तयार झाले होते. त्यामुळे बरणीचे झाकण काढताच ते अगदी फसफसून बाहेर पडले. एकदा पहिला प्रसंग लिहून होताच आता पुढे काय, आता पुढे काय याचा विचार मला करावा लागला नाही किंवा चिंताही करावी लागली नाही. कारण मनाच्या आत आधीपासून तयार असलेली सगळी सामुग्री भीती आणि उत्कंठेने बाहेर पडू पाहात होती.'

## ३.

१९३९ ते १९४० या दरम्याने ही कादंबरी लिहिली गेली. सर्वच दृष्टींनी कोस्सलर यांच्यासाठी हा काळ कठीण होता. एकतर या काळात कोस्सलर पैशाच्या फारच अडचणीत होते. भरीस एकीकडून जर्मन तर दुसरीकडून रशियन पोलीस त्यांना पकडण्यासाठी जीवाचा आटापिटा करीत होते. परिणामी या संपूर्ण काळात कोस्सलर कमालीचे भयग्रस्त बनले. ते कम्युनिस्ट व ज्यू-जमातीचे म्हणून हिटलर त्यांच्या पाठीस लागला होता, तर कम्युनिस्ट पक्षाशी त्यांनी द्रोह केला म्हणून स्टॅलिन, त्यांच्या पाठीस लागला होता. कोस्सलरना पकडून तुरुंगात पाठविण्यासाठी अशाप्रकारे हिटलर व स्टॅलिन दोघेही टपले होते. स्टॅलिन व हिटलरला झुकांड्या देत १९४० मध्ये ही कादंबरी लिहून कोस्सलरनी पुरी केली व पॅरिसहून ती १ मे १९४० या दिवशी लंडनला पाठविली गेली. मुळात ही कादंबरी जर्मन भाषेत लिहिली गेली होती. डाफ्ने हार्डी या त्या दिवसातील कोस्सलर यांच्या मैत्रिणीने तिचे इंग्रजीत भाषांतर केले. हार्डीबाई या व्यवसायाने शिल्पकार आहेत. सध्या त्या इंग्लंडमधील सफोल्क परगण्यात राहातात. कोस्सलर यांच्या खेड्यातील घरापासून अगदी जवळच त्यांचे घर आहे. गंमतीची गोष्ट अशी की, कोस्सलर यांना जगभर नाव मिळाले ते या भाषांतरीत कादंबरीमुळे.

## ४.

१९४० साली 'डार्कनेस' ची छपाई सुरू झाली होती. परंतु डार्कनेसचा खुद्द लेखक मात्र इंग्लिश तुरुंगात डांबला गेला होता. त्यांची तुरुंगातून सुटका करण्यात यावी म्हणून अनेक मोठमोठ्या लोकांनी प्रयत्न चालविले होते. न्यूज क्रॉनिकल या नियतकालिकाचे संपादक जेराल्ड बॅरी, पलेन विल्किनसन, अथोलची डचेस आणि इतर



अनुक्रमणिका



अनेक राजकीय मित्रमंडळी त्यासाठी धडपडत होती. कोस्सलरना पेन्टनव्हियच्या तुरुंगात ठेवण्यात आले होते. कोस्सलर तुरुंगात आल्यानंतर अगदी थोड्याच दिवसात इंग्लिश प्रकाशक जोनाथन केप यांनी 'डार्कनेस' ची पेज-प्रुफे तपासण्यासाठी तुरुंगात धाडून दिली. पेज-प्रुफे तपासून कोस्सलरनी ती लगेच परत धाडली. मात्र प्रुफे परत धाडताना आपल्यासाठी तातडीने सिगारेटी पाठवून द्याव्यात अशी विनंती त्यांनी प्रकाशकांकडे केली. जोनाथन केपच्या प्रकाशकांनी मागणीप्रमाणे सिगारेटी पाठवल्या. शंभर सिगारेटची एक पेटीच त्यांनी त्यांना पाठविली, परंतु सोबत चिट्ठी जोडली की, त्या सिगारेटींची किंमत त्यांना मिळणाऱ्या रॉयल्टीमधून कापून घेण्यात येईल.

कोस्सलर पेन्टनव्हियच्या तुरुंगात असतानाच 'डार्कनेस' प्रसिध्द झाली आणि कोस्सलर तुरुंगातून सुटून बाहेर येण्याच्या आधीच त्या कादंबरीवर अभिप्राय येऊ लागले. कादंबरीच्या उच्च वाङ्मयीन गुणवत्तेबद्दल सर्वांनीच लिहिले होते. परंतु मॉस्को खटले, खंद्या आणि वयोवृध्द बोल्शेव्हिकांचे मानसशास्त्र अशा तोवर जगात अज्ञान असलेल्या विषयावर त्या कादंबरीने नवा प्रकाश टाकला होता म्हणूनही कादंबरीची स्तुती केली जात होती. मॉस्को खटल्याच्या ज्या हकिकती तोवर प्रसिध्द झाल्या होत्या त्यामुळे लोकांना कुतूहल वाटत होते. कारण या बोल्शेव्हिक खंद्या पक्षकार्यकर्त्यांनी जे गुन्हे त्यांनी स्वप्नातही केले नसते अशा गुन्ह्यांचे कबुली जबाब त्या खटल्याच्या वेळी दिले होते आणि लोकांना त्याचेच नवल वाटत होते. ही कादंबरी प्रसिध्द झाली नि कोठल्या परिस्थितीत आणि कोणकोणत्या तत्वाखाली हे कबुलीजबाब दिले गेले हे लोकांच्या ध्यानात आले व अशाप्रकारे रशियन राजकारणातील त्या अघटित घटनांचा अर्थ जगाला कळला. या कादंबरीवर लिहिताना टाइम्स लिटररी सप्लिमेंट या वजनदार पत्राने म्हटले होते की, "मॉस्को खटल्याबद्दल आजवर खूप काही लिहिले गेले होते. परंतु का कादंबरीने या खटल्यांबद्दल जे सांगितले आहे ते सत्याशी जास्तीत जास्त जवळचे आहे."

या कादंबरीवर अनेकांनी लिहिले. या सर्व लिखाणात जॉर्ज आर्वेल यांचे लिखाण जास्तीत जास्त साक्षेपी म्हणता येईल. कम्युनिस्ट राजवटीचा प्रत्यक्ष अनुभव जॉर्ज ऑर्वेल यांनी स्पेनमध्ये घेतलाच होता. त्यामुळे कोस्सलर यांच्या कादंबरीवर लिहिताना ते स्वानुभवातून बोलत होते, शिवाय कम्युनिस्ट राजवटीबद्दल त्यांची स्वतःची निश्चित भूमिकासुध्दा त्या अनुभवातून तयार झालेली होती. त्यामुळे कम्युनिस्ट राजवटीपासून स्वतः दूर राहून कम्युनिस्ट राजवटीतल्या अत्याचारांचे समर्थन करणाऱ्या 'उदारमतवाद्यांच्या' आणि पाश्चिमात्य जगातील डाव्या विचारसरणीच्या मंडळींवर त्यांनी सडकून टीका केली. ऑर्वेल यांनी लिहिले होते की, 'कादंबरीत रुबाशोव्ह नंबर एकच्या चौकशी अधिकाऱ्याला शरण जातो आणि कबुलीजबाब देतो ते त्याचा जो छळ केला गेला होता त्या छळामुळे नव्हे. नाझींच्या तुरुंगात असतांना याच्यापेक्षाही जास्त छळ नाझींनी त्याचा केला होता.

परंतु त्या छळाला रुबाशॉव्हने दाद दिली नव्हती. तथापी ज्या कम्युनिस्ट पक्षासाठी त्याने आपल्या सर्व शारीरिक व मानसिक शक्ती वेचल्या होत्या तोच पक्ष जेव्हा त्याला तुरुंगात टाकून खोट्या कबुलीजबाबासाठी त्याचा अनन्वित छळ सुरू करतो तेव्हा त्याचे संपूर्ण आंतरिक जीवनच रिक्त बनते आणि जगण्यातील सगळी उमेद संपुष्टात आल्याने तो शेवटी कबुली जबाब देतो. खटला चालू असता जवळपास बुखारीनच्याच शब्दात रुबाशॉव्ह स्वतःला विचारतो की, "मी कशाकरिता लढतो आहे ?" खरोखरच कशाकरिता ? छळ, दहशतवाद, गुप्त तुरुंग, अनेकांनी ठरवून असत्याचा प्रचार करू पाहाणे आणि अशाच अन्य अनेक बाबी की, ज्यांच्याविरुध्द सत्याची चाड बाळगणाऱ्या कोणाही इसमाने आपला निषेध व्यक्त करायचा. तो निषेध व्यक्त करायचा, नैतिक अधिकारच रुबाशॉव्ह स्वतःच्या पूर्वीच्या वागण्याने घालवून बसला होता. हे सर्व आपल्याच एकेकाळच्या तात्विक भूमिकेचे व प्रत्यक्ष वागण्याचे अपरिहार्य तार्किक परिणाम आहेत हे तो ओळखतो. ग्लेटकिनबद्दल रुबाशॉव्हला एक प्रकारचे सुप्त कौतुक वाटते. (कारण ग्लेटकिन हा एक अमानुष अधिकारी आहे नि क्रांतीच्या सध्याच्या विशिष्ट टप्प्यावर फक्त असेच अमानुष लोक क्रांतीचा डोलारा टिकवून धरतात.) मॉस्को खटले हे इतिहासातील एक महाभयंकर दृश्य होते. परंतु त्यामुळे त्या खटल्यात अडकलेल्या बोल्शेव्हिकांबद्दल क्वचितच कुणाला अनुकंपा वाटेल. याचे कारण या जुन्या बोल्शेविकांचा स्वतःचा इतिहास. हा इतिहास असे सांगतो की, त्यांनी इतरांविरुध्द तलवार हाती घेतली असल्याने शेवटी त्यांना तलवारीनेच मरण येणार असते. लेनिन तसा त्याच्या तरुणपणीच मरण पावला. स्टॅलिनला लेनिनसारखा तरुणपणी मृत्यू आला नाही तर त्यालाही तलवारीलाच बळी जावे लागेल.

"एक कादंबरी म्हणून आणि तुरुंग-वाङमयाच्या नमुना म्हणून ही कादंबरी खरोखरच दर्जेदार आहे. परंतु त्यापेक्षाही वेगळ्याच कारणासाठी या कादंबरीला महत्व आहे. ही कादंबरी सर्वंकष सत्तावादी राजवटीबद्दल आहे. ज्याला अशा राजवटीचे अंतर्बाह्य ज्ञान आहे, अगदी पूर्ण ज्ञान आहे अशा व्यक्तिने मॉस्को "कबुलीजबाबांचा" अन्वयार्थ येथे लावला आहे. या 'अन्वयार्थासाठी'' ही कादंबरी हा वाङमयाच्या इतिहासातील महत्वाचा दस्तऐवज ठरतो. हे खटले येथे चालवले गेले ही खटल्यांच्या बाबतीतली भयप्रद गोष्ट नव्हती. सर्वंकष सत्तावादी राजवटींमधे एकाधिकारशहाला सत्ता स्वतःच्या हाती टिकवून ठेवण्यासाठी अशा प्रकारचे खटले मुद्दाम घडवून आणावेच लागतात. या खटल्यांच्या बाबतीतील खरी भयप्रद गोष्ट ही होती की, पाश्चिमात्य जगातील विचारवंत काय घडत आहे, जे घडत आहे त्याचा अर्थ काय याचा विचार न करता अतिशय घाईने आणि बेदिक्कतपणे या खटल्यांची भलावण करीत होते, त्यांचे नैतिक समर्थन करीत होते. चिंतेची बाब, भीतीची बाब ही होती. हे कैदी अनेक वर्षे एकांत कोठड्यात ठेवले गेले. अंधार कोठड्यातून त्यांना एकएकटे डांबून ठेवले होते नि आता

त्यांना बाहेर काढून त्यांच्यावर जाहीर खटले घालण्यात येऊन त्यांचे स्वेच्छापूर्वक कबुलीजबाब मिळविण्यात आले. तर अशा परिस्थितीत उदारमतवादी वृत्तपत्रांच्या वार्ताहरांनी जाहीर करून टाकले की, हे 'कबुलीजबाब' वाचून आपले त्यांच्या गुन्ह्यांबद्दल 'पूर्ण' समाधान झाले आहे. एका नामवंत वकिल महाशयांनी या प्रकरणासंबंधी तर एक नवा सिध्दांतच मांडला. वकिल महाशयांच्या मते मॉस्को खटल्यात ज्या कोणावर खटले भरले गेले होते त्यांना त्या खटल्याविरुध्द वा शिक्षेविरुध्द अपिल करण्याचा हक्कच नव्हता. ही गोष्ट आरोपींच्या खरोखर हिताची होती. याच धर्तीचे खटले स्पेनमधेसुध्दा भरण्यात आले होते आणि आरोपींवर मॉस्को खटल्यातील आरोपांसारखेच आरोप ठेवण्यात आले होते. परंतु स्पेनमधल्या खटल्यातील आरोपींनी "कबुलीजबाब" दिले नव्हते. 'डाव्या' विचारसरणीच्या सर्व वृत्तपत्रांनी स्पेनमधल्या खटल्यांची हकिकत प्रयत्नपूर्वक बाहेरच्या जगापासून दडवून ठेवली. हे करताना कधीकधी चक्क खोटे सुध्दा लिहिले. रशियात खटल्यातील आरोपींचा छळ करण्यात आला किंवा तुमचा छळ करण्यात येईल, अशी धमकी त्यांना देण्यात आली यात शंकाच नाही. परंतु केवळ छळ झाला वा तशी धमकी दिली म्हणून त्यांनी कबुलीजबाब दिला असे वाटत नाही. कबुलीजबाबासाठी आणखी काहीतरी कारण झाले होते. कोस्सलर यांच्या मते 'पक्षाच्या हिताकरिता आपण अंतिम त्याग करू या' या कल्पनेच्या प्रभावाखाली हे कबुलीजबाब दिले गेले असावेत. सुव्हारिन यांनी Caucheman en U. S. S. R. (Nightmare in Soviet Russia) (सोव्हिएट रशियातली दुःस्वप्ने) नावाची एक पुस्तिका लिहिली आहे. त्यात ते म्हणतात 'पक्षाच्या हितासाठी' तुम्ही कबुलीजबाब दिले पाहिजेत. हा युक्तिवाद शेवटी प्रभावी ठरला असावा. कोस्सलर यांची कादंबरी म्हणजे त्याच पुस्तिकेचा अत्यंत सृजनशीलतेने केलेला विकास आहे. या साहित्यकृतीने कोस्सलर यांच्या आधीच्या साहित्यकृतींना निश्चितच मागे टाकले आहे."

## ५.

१९४१ साली प्रख्यात ब्रिटीश विचारवंत जॉन स्ट्रॅची यांची कोस्सलरशी भेट झाली तेव्हा त्यांनी कोस्सलरना प्रश्न केला की, 'डार्कनेस ॲट नून' या शीर्षकातून त्यांना काय सूचित करायचे आहे ? कादंबरीच्या नावाचा अर्थ काय ?' जॉन स्ट्रॅची लिहितात की, ही कादंबरी वाचल्यावर "माझे मन बधिर झाले, मी सुन्न झालो. 'डार्कनेस ॲट नून' या नावाचा साधा व सरळ अर्थ मानवी बुध्दी पूर्णत्वाला जाण्याच्याच नेमक्या वेळी — ज्ञानयुगाचा अंतिम विकास होण्याच्याच नेमक्या क्षणी — त्या बुध्दीला ग्रहण लागणे हा होता. पण तो अर्थ माझ्या ध्यानात आला नाही. बुध्दिप्रामाण्यवादावर आखून आणि

आधीपासून हिशेब मांडून उभारलेले जगातले पहिले सरकार सत्तेवर आल्यानंतर त्याच मानवी बुध्दी व तर्काला ग्रहण लागणे हा त्या नावाचा साधा व सरळ अर्थ. परंतु मनाच्या त्या अवस्थेत त्या अर्थाने मला गुंगारा दिला होता. गंमत अशी की, खुद्द कोस्सलर यांना सुध्दा 'डार्कनेस ॲट न्यून' या नावाचा अर्थ काय होता हे माहित नव्हते. त्यांना सुध्दा त्या नावाने चकविले होते. कोस्सलर मला म्हणाले की, हे नाव डाफ्ने हार्डी या त्यांच्या मैत्रिणीला खरे तर सुचले होते. त्या नावाचा नेमका अर्थ काय हे त्यांना स्वतःला माहित नव्हते. परंतु ते नाव अगदी समर्पक आणि योग्य आहे असे त्यातून ध्वनित होते हे नक्की असे कोस्सलर यांना वाटत होते.''

६.

'डार्कनेस ॲट नून' या कादंबरीमुळे आर्थर कोस्सलर यांना भरपूर प्रसिध्दी मिळाल्याने ते जिथे जात तिथे पत्रकार त्यांची मुलाखत घेण्यासाठी गर्दी करीत. १९४८ साली त्यांनी अमेरिकेचा दौरा काढला होता. त्यावेळी युरोपातील विशिष्ट राजकीय प्रश्नांवर चर्चा करावयास त्यांनी नकार दिला होता. कम्युनिस्ट संकट या एका प्रश्नाबद्दल चर्चा करावयास ते तयार होते. मुलाखत देताना कोस्सलर म्हणाले की, ''मी एक तत्वज्ञ आणि ललित लेखक आहे. मी राजकारणपटू नाही.'' दुसऱ्या एका पत्रकाराला ते म्हणाले की, ''युरोपमधल्या वाङमयीन चळवळीचे केंद्र सध्या फ्रान्समधे आहे. इटाली आणि इंग्लंड या दोन देशात जे काही बौध्दिक प्रबोधन आढळून येण्यासारखे होते त्याच्यापेक्षा जास्त प्रबोधन फ्रान्समध्ये चालू आहे. इंग्लंडबरोबरच बेताच्या प्रबोधनाचा देश म्हणून त्यांनी अमेरिकेचाही उल्लेख केला होता. परंतु त्याचबरोबर पुढे ते असेही म्हणाले की, ''हेमिंग्वे हा विद्यमान लेखकांपैकी अत्यंत श्रेष्ठ लेखक आहे.'' म्हणून हेमिंग्वेला कमी लेखू नये. गेल्या अनेक दशकातील वाङमयीन क्षेत्रातील महत्वाची नावे म्हणून त्यांनी माल्रो, सार्त्र आणि काम्यू या तिघांचा उल्लेख केला नि पुढे म्हटले की या तिघात काम्यूचा क्रमांक सर्वात वरचा लागेल. La Peste- प्लेग ही त्याची कलाकृती तर एक सर्वश्रेष्ठ कलाकृती आहे. त्यांना अस्तित्ववादाबद्दल विचारले असता ते म्हणाले की, 'अस्तित्ववाद, ज्वलंत वाङमयीन चळवळ म्हणून ती कधीच अस्तित्वात नव्हती. कॉफी हाऊसपुरतीच ती मर्यादित होती. परंतु त्या चळवळीतील तत्वज्ञ व एक लेखक या स्वरूपात साक्षात ज्वालामुखी आहेत. हार्वे ब्राइट या पत्रकाराने त्याना पुढील प्रश्न विचारला. तो म्हणाला की, कोस्सलर यांची 'डार्कनेस ॲट न्यून', आंद्रे माल्रो यांची 'मॅन्स् फेट' (मानवाचे भवितव्य) आणि सिलोन (Silone, Ignazio इटालियन कादंबरीकार आणि राजकीय चळवळ्या १९०० ते १९७८. सिलोन समाजवादी विचारसरणीचा होता. पण त्याचा खिस्ती धर्माच्या उपयुक्ततेवरही विश्वास होता म्हणून त्याच्या कादंबऱ्यांमधे समाजवाद आणि खिस्तीधर्म,

राजकीय वास्तववाद आणि नैतिक आदर्शवाद, प्रभावी सामाजिक वारे आणि प्रभावी ऐतिहासिक वारे अशा परस्परविरुध्द भूमिकांचा समन्वय आढळतो. सगळ्या सामाजिक दुःखावर आणि अन्यायांवर कम्युनिझम हा रामबाण इलाज असून कम्युनिझमचा आश्रय केल्यास नवी समाजव्यवस्था प्रस्थापित करता येईल या जागतिक कम्युनिस्ट कल्पिताचे बिंग त्याने आपल्या लिखाणातून पूर्णपणे फोडले होते.) या लेखकाची 'ब्रेड अँड वाईन' या तीन या काळातील श्रेष्ठ कादंबऱ्या होत असे अनेक विचारवंत म्हणतात. तर त्याबद्दल तुमचे मत काय ? उत्तर देताना कोस्सलरनी त्याला सांगितले की, 'कलात्मकतेच्या बाबतीत मी या दोघांची कधीच बरोबरी करू शकणार नाही आणि मी हे खोट्या विनयाने सांगत नाही. मात्र राजकीय विश्लेषणाच्या बाबतीत मी त्यांच्यापेक्षा वरचढ आहे. त्यांच्यापेक्षा माझे भाष्य अधिक भेदक आहे' याच संदर्भात ते पुढे असे म्हणाले की, इंग्लंडमधे माल्रो आणि सिलोन यांच्याबरोबर त्यांचे नाव घेणे हे पाप मानले जाते. त्यावर ब्राइट त्यांना म्हणाला की, 'इंग्लंडमध्ये तुम्ही एवढे नावडते का ?' तेव्हा कोस्सलर म्हणाले की, 'राजकीय कादंबरीचे ब्रिटीशांना वावडे आहे. इंग्लंडचे वाङ्मयीन कर्तृत्व फार मोठे आहे यात शंका नाही. ब्रिटिश लिखाण सुरेख असते. जुन्या खानदानी आचारविचारांचा सुगंध त्याला येतो. परंतु आजही ते एखाद्या जुन्या संवेदनाशील वृध्देगत आहे. ह्या वृध्देचे वय झाले असले तरी तिची संवेदनक्षमना यत्किंचितही कमी झालेली नाही. पण म्हणूनच राजकीय वस्तुस्थितीवर बोलायचे ती कटाक्षाने टाळते......' ब्रिटीश प्रतिक्रियेच्या अगदी विरुध्द प्रतिक्रिया अमेरिका व फ्रान्स या दोन देशांनी दाखविल्या होत्या. अमेरिकेत 'डार्कनेस'च्या पाच लाख प्रती संपल्या, तर फ्रान्समध्ये तोवर तिच्या चार आवृत्या निघाल्या. (इंग्लंडमधे मात्र हा आकडा दहा हजाराच्या पलीकडे गेला नाही.)

## ७.

'डार्कनेस ॲट नून' या कादंबरीचे पुढे नाटकात रूपांतर झाले. या नाटकाच्या रॉयल्टीने सर्व उत्पन्न कोस्सलर यांनी Fund for Intellectual Freedom –मानवी स्वातंत्र्याच्या रक्षणार्थ निधी -- या निधीस देणगीदाखल देऊन टाकले. सोव्हिएट युनियन आणि सोव्हिएट साम्राज्यातून देशोधडीस लागलेल्या लेखकांना मदत करणे हे या निधीचे उद्दिष्ट होते. पाश्चात्य देशातील यशस्वी लेखकांनी या निधीला हातभार लावावा अशी कोस्सलर यांची विनंती होती व त्या विनंतीस मान देऊन अनेकांनी आपली मदत दिली होती. ब्रॉडवे येथे 'डार्कनेस ॲट नून' हे नाटक सलग अठरा महिने चालले. बौद्धिक स्वातंत्र्य निधीस या नाटकाने ५२ लाख रुपये मिळवून दिले.

८.

जॉन स्ट्रॅची या ब्रिटीश लेखकाच्या `The Strangled Cry ' या पुस्तकात कोस्सलर यांच्या काही आठवणी आल्या आहेत. या दोघांचीही भेट युध्दकाळात १९४१ साली झाली. या पहिल्या भेटीचे विनोदी वर्णन वरील पुस्तकात स्ट्रॅची यांनी केले आहे. स्ट्रॅची लिहितात की, "१९४१ च्या वसंत ऋतूत मी अॅडजुटंट म्हणून काम करीत होतो. रॉयल एअर फोर्सच्या ८७ व्या लढाऊ तुकडीची देखभाल करण्यासाठी आवश्यक त्या बारीकसारीक कामांची देखभाल करणारा हुद्देदार हा माझा तेव्हाचा हुद्दा होता. ८७ व्या तुकडीचा तळ बार्थ या गावाजवळ होता. एके दिवशी मी जेवण घेत असताना एका वैमानिकाने माझ्या खोलीचे दार उघडले नि अगदी शुष्क आवाजात मला सांगितले की, "अॅडजुटंटना भेटावयास कोणी एक आले आहेत." दरवाजातून चुरगळलेला लष्करी गणवेष चढविलेली आर्थर कोस्सलर यांची आकृती आत शिरली. कोस्सलर तेव्हा 'पायोनियर कोअर' मधे काम करीत होते. या तुकडीकडे मुताऱ्या खोदण्याचे काम होते. ब्रिटिश मुताऱ्या खोदण्यासाठी त्यांच्याइतका लोकविलक्षण इसम कदाचित कधीच मिळाला नसेल. डार्कनेसची चर्चा करताना स्ट्रॅचीनी लिहिले आहे की, 'ही कादंबरी जेव्हा प्रसिध्द झाली ..... मित्रामित्रांमध्ये वितुष्ट आले. पतीपत्नीमध्ये तंटे झाले.' हा उल्लेख स्ट्रॅची यांच्या स्वतःबद्दलचा होता. ह्यूज थॉमस यांनी जॉन स्ट्रॅची यांचे चरित्र लिहिले आहे. त्यात या उल्लेखाचे स्पष्टीकरण आहे. स्ट्रॅचीना ही कादंबरी आवडली म्हणून त्यांनी ती आपल्या पत्नीला वाचण्यासाठी पाठविली. स्ट्रॅची यांच्या पत्नीचे नाव सेबिया. सेबियाबाईंनी कादंबरीचे वाचन सुरू केले पण त्यांना ते सहन झाले नाही. १९४१ च्या वसंत ऋतूत त्यांना फार मोठा मानसिक धक्का बसला नि त्या मनोरुग्ण झाल्या. त्यांच्यावर साम्यवादी तत्वज्ञानाचा फार मोठा प्रभाव होता. परंतु ही कादंबरी त्यांनी वाचली नि या प्रभावाला आव्हान मिळाले व त्या साम्यवादाच्या प्रभावातून 'निसटल्या'. तथापि शेवटपर्यंत त्या साम्यवादाच्या विरोधक बनल्या नव्हत्या. अंतर्मनात त्यांना साम्यवादाबद्दल प्रेमच वाटत राहिले. परिणामी साम्यवादाच्या विषयावर जॉन स्ट्रॅची यांच्या नव्या जुन्या मित्रांबरोबर त्यांचे नेहमीच तंटे होत, वाद घडत. स्ट्रॅची यांच्या नव्या मित्रांमधे कोस्सलर यांचा समावेश होता. एअर मिनिस्ट्री–वायुदल मंत्रालयातील काम आटोपले की, घरी परतताना स्ट्रॅची वाटेत कोस्सलर यांच्याकडे मुक्काम करीत. मग मद्यपानाचा व गप्पांचा कार्यक्रम आटपून फुरसतीने घरी जात. एके रात्री त्यांनी कोस्सलरना फोन करून व्यवहारी आवाजात सांगितले की, 'मला वाईट वाटते. पण तुझ्याकडचे माझे रात्रीचे येणे बंद करावे लागणार. सिबियाला तुझ्या नावाचे वावडे आहे. तुझे नावसुध्दा कानावर पडलेले तिला सहन होत नाही. एक तुला तरी निवडले पाहिजे नाहीतर तिला, असा प्रसंग आज माझ्यावर आला

आहे आणि मला तिचीच निवड करावी लागेल. तू हे सर्व समजून घेशील याची मला खात्री आहे.' अर्थात स्ट्रॅचीं यानी कोस्सलरना भेटायचे पूर्णपणे थांबविले होते असे नाही. नंतरही ते कोस्सलरना भेटत असत. परंतु बायकोच्या नकळत. चोरून. कोस्सलर यांच्या मनाला ते लागत असे.

## ९.

फ्रान्समधे 'डार्कनेस अॅट नून' या कादंबरीने सगळे उच्चांक मोडले. जनरल द गॉल यानी ही कादंबरी एका बैठकीत वाचून संपविली. ही एक श्रेष्ठ दर्जाची कादंबरी आहे असे त्यानी जाहीरपणे सांगितले. डार्कनेसने खपाचे उच्चांक मोडले. उच्चांक मोडण्यात फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाने या कादंबरीला खास मदत केली. ही कादंबरी जेव्हा फ्रान्समधे प्रसिध्द झाली तेव्हा कम्युनिस्ट पक्षाने आपल्या सगळ्या शाखाना गुप्त आदेश काढून सांगितले की, बाजारात जितक्या प्रती येतील तितक्या खरेदी करा आणि नष्ट करा. पक्ष-सदस्यांनी अर्थात हा आदेश तंतोतंत पाळला. धार्मिक निष्ठेने पाळला. त्यानी डार्कनेसच्या मिळतील त्या प्रती खरेदी करून टाकायचा सपाटा लावला. परंतु सामान्य वाचक आणि एकूणच फ्रेंच जनतेने त्याना हरविले नि त्यांच्या कम्युनिझमच्या धर्मावरच्या निष्ठेचा पूर्ण पराभव केला. इतकी मागणी या पुस्तकाला वाचकानी केली. शिवाय कम्युनिस्टानी प्रकाशकांसाठी जे आव्हान पुढे केले होते त्यालाही प्रकाशक पुरे पडले. कादंबरीचा मागणीप्रमाणे पुरवठा होत राहिला. पुरवठ्यात एकदाही खंड पडला नाही. थोडक्यात एका आठवड्याच्या अवधीत फ्रान्समध्ये या कादंबरीच्या दोन लाख प्रती संपल्या.

### "आम्ही कोस्सलरना विसरतो तेव्हा"

कोस्सलर यानी राजकीय विषयावर खूपच लिखाण केले आहे. अप्रतिम आणि विचारप्रवर्तक लिखाण केले आहे. 'गॉड दॅट फेल्ड' (हे पुस्तक अनेकानी मिळून लिहिलेले आहे. त्या अनेकात एक कोस्सलर आहेत.) 'द योगी अँड द कमिसार', 'डार्कनेस अॅट नून' ही त्यांची राजकारणावरची काही पुस्तके. परंतु कोस्सलर यांच्या राजकीय विषयावरच्या पुस्तकानी एका विचित्र प्रकारे हे दाखवून दिले आहे की राजकीय विषयावरची पुस्तके परिणामाच्या दृष्टीने अंतिमतः अगदी निरर्थक आणि व्यर्थ असतात. उदा. माझी १९६० ची जर्मन पिढी घ्या. एकोणिसशे साठीत आम्ही सर्व तरूण लोक जर्मन समाजवादी पक्षाच्या तत्त्वज्ञानाने भारलो गेलो होतो नि त्या पक्षाला आम्ही बांधून घेतले होते. आता आमच्यापैकी असा एकहीजण नव्हता की ज्याने कोस्सलर यांचे राजकीय विषयावरचे एखाद दुसरे महत्वाचे पुस्तक पूर्वी वाचले नव्हते. एकोणिसशे चाळीसनंतर कोस्सलर सतत कम्युनिझमबद्दल धोक्याचा इशारा देत होते आणि तरीसुध्दा आमच्यापैकी प्रत्येकाने कम्युनिझमच्या सापळ्यात मोठ्या उत्साहाने उडी घेतली. जे हे सापळे काय आहेत नि ते कसे आहेत याचे स्वयंभूत वर्णन कोस्सलर यानी त्यांच्या पुस्तकातून केलेले आहे नि आमच्यापैकी प्रत्येकाने ते मन लावून वाचलेलेही होते नि तरी आम्ही त्या सापळ्यात अडकलो होतो. माझ्या स्वतःबद्दल विचाराल तर आम्ही शाळेत असताना मी 'डार्कनेस अॅट नून' ही कादंबरी वाचली होती. 'द योगी अँड द कमिसार' मधील निबंध तर माझ्या अत्यंत आवडीचे. आणि एवढे असूनसुध्दा १९७० साली मार्क्सवादी लेनिनवादी क्रांतीकारी गटात सामिल होऊन मी मोठ्या उत्साहाने पक्षकार्य करीत होतो. त्या दिवसांची आज जेव्हा मला आठवण होते तेव्हा माझ्या अंगावर काटा उभा रहातो. - आर्नो विडमान



## व्यक्ती आणि विचार

### आर्थर कोस्सलर आणि डार्कनेस ॲट नून




— विश्वास पाटील


## १. कादंबरीची ओळख

छापील ग्रंथांना स्वतःचा कर्ता असतो पण कधी कधी हा कर्ता बाजूला पडतो नि तो छापिल ग्रंथ स्वतःच्याच नावाने जगू लागतो अशा अर्थाचे एक सुप्रसिध्द वचन आहे. छापिल ग्रंथांना ग्रंथकर्त्याव्यतिरिक्त स्वतःचे स्वतंत्र भविष्य असू शकते हे वचन एका अर्थाने कदाचित सर्वच छापिल ग्रंथांना सारख्या प्रमाणात लागू पडेल; परंतु आर्थर कोस्सलर यांच्या 'डार्कनेस ॲट नून' या ग्रंथाला ते दुप्पट लागू आहे. एवढे मात्र खरे.

स्वतःचे भवितव्य स्वतःबरोबर घेऊन जन्माला येणारे हे ग्रंथ ज्या कालखंडात जन्माला येतात त्या कालखंडाचा महिमा म्हणा की ज्या सामाजिक - ऐतिहासिक परिस्थितीत त्यांचा जन्म झालेला असतो त्या परिस्थितीचा परिणाम म्हणा पण हे ग्रंथ प्रसिध्द होताच त्यांचा आणि त्यांच्या कर्त्याचा संबंध जणू संपुष्टात येतो आणि ते स्वतःच्या नावावर स्वतंत्र आयुष्य जगू लागतात. तेथून पुढे जग त्यांना स्वतःच्या हाती घेऊन स्वतःच्या मर्जीप्रमाणे जिकडे न्यायचे तिकडे घेऊन जाते. थोडक्यात मूळ कर्त्याच्या इच्छेला आणि अपेक्षांना डावलून त्यांचा जीवन प्रवास सुरू होतो.

रॉबर्ट लुई स्टीव्हन्सचे 'ट्रेझर आयलंड' हे पुस्तक घ्या किंवा मार्क ट्वेनचे 'हकलबरी फिन' हे पुस्तक घ्या. ही दोन्ही पुस्तके वाचताना ही पुस्तके कोणी लिहिली आहेत वा ती कोणत्या साली वा शतकात लिहिली गेली इत्यादी प्रश्नांचा विचार न करताच वाचक




अनुक्रमणिका

ती पुस्तके वाचून संपवितात आणि ही पुस्तके लिहिली गेल्यापासून आजतागायत हे चालू आहे. लक्षावधी आबालवृध्द वाचकांनी ही पुस्तके आजवर वाचली आहेत. एकदा नव्हे, दोनदा नव्हे, अनेकदा वाचली आहेत. प्रत्येक वेळी जणू हे नवेच पुस्तक आहे अशा थाटात वाचली आहेत. तीच गोष्ट 'पिलग्रिम्स प्रोग्रेस', 'गलिव्हर्स ट्राव्हेल्स' किंवा 'रॉबिन्सन क्रुसो' याही पुस्तकांची व त्यांच्या कर्त्यांची आहे. पैकी शेवटच्या पुस्तकाने तर सगळे उच्चांक मोडले आहेत. कारण 'रॉबिन्सन' एवढा शब्द जरी लोकांच्या कानावर पडला तरी खुद्द कादंबरीकारालाही कादंबरी लिहिताना ज्या कल्पना सुचल्या नसतील वा जे अर्थ नि संकेत त्याच्या डोक्यात आले नव्हते त्या कल्पना नि ते अर्थ व संकेत, तो शब्द ऐकणाराच्या डोक्यात चमकून जातात.

ही पुस्तके जगभरच्या सर्व देशात आणि सर्व प्रकारच्या थरात वाचली जातात. ही पुस्तके लहान मुले वाचतात तशीच तरुण माणसे आणि वृध्दही वाचतात. सगळ्या कालखंडातल्या वाचकांमध्ये ती लोकप्रिय आहेत. या पुस्तकातून सांगितलेल्या कथा भिन्न भिन्न प्रकारच्या आहेत आणि तरीसुध्दा ही पुस्तके अत्यंत लोकप्रिय आहेत. मात्र एवढ्यावरून कोणत्या समान लक्षणांसाठी ही पुस्तके जगाचे लक्ष स्वतःकडे वेधून घेतात याचा उलगडा करायचे म्हटले तर ते शक्य होईलसे वाटत नाही, असो. कोणत्या समान गुणांमुळे ही पुस्तके इतकी लोकप्रिय असतात याचा उलगडा करता येणार नाही हे तर स्पष्टच आहे; तरीसुध्दा या प्रकारच्या पुस्तकांची काही ठळक वैशिष्ट्ये मांडून दाखविता येण्यासारखी आहेत. चालू चर्चेच्या संदर्भात सांगण्यासारखी गोष्ट ही की यातील प्रत्येक वैशिष्ट्य 'डार्कनेस ॲट नून' मध्ये पाहावयास सापडते.

या प्रकारच्या पुस्तकांचे पहिले वैशिष्ट्य हे की ही पुस्तके सकृद्दर्शनी विरोधाभासात्मक वाटतात. म्हणजे असे की, ज्या खऱ्याखुऱ्या ऐतिहासिक परिस्थितीवर वा एखाददुसऱ्या प्रसंगावर ही पुस्तके बेतलेली असतात ती परिस्थिती वा तो प्रसंग जगाच्या स्मरणातून केव्हाच लुप्त झालेला असतो आणि तरीसुध्दा जणू काही हे सर्व कालपरवाच घडले आहे अशा प्रकारे ही पुस्तके वाचली जातात, स्वीकारली जातात. एका शब्दात ही पुस्तके वा त्यातील कथा जरी विशिष्ट स्थळकाळाशी संबंधित असतात तरी खुद्द ही पुस्तके मात्र त्यांचा संबंध जणू कुठल्याच विशिष्ट व निश्चित स्थळकाळाशी नाही अशा प्रकारे जगत असतात. अशा पुस्तकांचे उदाहरण म्हणून 'पिलग्रिम्स प्रोग्रेस', 'गलिव्हर्स ट्राव्हेल्स' किंवा 'रॉबिन्सन क्रुसो' यापैकी कोठलेही पुस्तक डोळयासमोर आणा. **बनियन जोनाथन स्विफ्ट, डॅनिअल डिफो** हे अनुक्रमे या पुस्तकांचे लेखक. हे लेखक इंग्लंडचे. त्यामुळे या पुस्तकात आलेले वाद, चर्चा, संदर्भ, बौध्दिक कल्पना सर्वांचा संबंध इंग्लिश लोकजीवनाशी



अनुक्रमणिका

नि इंग्लंडच्या त्या विशिष्ट कालखंडाशी. तेव्हाच्या इंग्लंडातील हे संदर्भ, वाद, चर्चा वगैरे माहित असल्याविना या पुस्तकांचा व्यवस्थित थांग लागणे प्रायः अशक्य. परंतु असे असताना सुध्दा ही पुस्तके लिहून इतकी वर्षे उलटून गेली आहेत तरी वाचक ती पूर्वीच्याच आवडीने वाचत आहेत. ज्या कालखंडाबद्दल आणि सामाजिक, ऐतिहासिक वातावरणाबद्दल ही पुस्तके आहेत ते वातावरण अजिबात परिचित नसताना सुध्दा वाचत आहेत. हे एक मोठे आश्चर्यच नव्हे काय ?

या पुस्तकांचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे अर्थ-स्तर. हे स्तर अनेक असतात. त्यामुळे अनेक भिन्नभिन्न पातळ्यांवर ही पुस्तके अनुभविता येतात व त्यांचा अर्थ शोधता येतो. प्रत्येक नवे वाचन त्यांची गोडी कमी करण्याऐवजी वाढवित जाते. जसा वाचक तसा आशय असे या पुस्तकांच्या बाबतीत घडते. ही पुस्तके वाचताना छोटे मोठे सर्वच वाचक ती गुंगून व देहभान विसरून वाचतात. जसा वाचक तसा आशय या शब्दांचा अर्थ असा की एकाच वेळी ही पुस्तके या परिकथा असतात आणि त्याचवेळी सार्वजनिकदृष्ट्या महत्वाच्या विषयावरचे ते वादही असतात किंवा सामाजिक प्रश्नांवरील त्या उपहासात्मक कथा सुध्दा असतात किंवा सामाजिक स्थितीचे ते मूलगामी विश्लेषणही असते आणि समाज स्थितीवरचे मार्मिक भाष्य म्हणूनही ही पुस्तके वाचली जाऊ शकतात किंवा हे सर्व असून आणखी सुध्दा बरेच काही स्वतःमध्ये वागविणारी ती नवी मिथ्यके आहेत असेही त्यांच्याबद्दल म्हणता येते किंवा मानवाच्या भवितव्यावर, त्याच्या जीवनशैलीवर प्रकाश टाकणाऱ्या बोधकथा म्हणूनही वाचक त्यांच्या आस्वाद घेऊ शकतो. नवी मिथ्यके तर ही पुस्तके निश्चितच आहेत. मिथ्यकांचा कर्ता अज्ञात असतो. यांचा कर्ता अर्थात तसा अज्ञात नसतो. तो ज्ञात असतो. परंतु प्रथमच म्हटले त्याप्रमाणे कर्त्याबरोबर त्यांचा संबंध केव्हाच संपुष्टात आलेला असतो नि स्वतःच्या नावाने ही पुस्तके जगत असतात. ज्यांना जगण्यासाठी कर्त्यांच्या नावाची गरज नाही या अर्थाने या पुस्तकांना नवी मिथ्यके म्हणता येते. असो, तर ही पुस्तके एकाच वेळी अनेक कारणांसाठी व गोष्टींसाठी तुमचे मन स्वतःकडे आकर्षित करून घेतात.

आता थोडेसे या पुस्तकांच्या ठेवणीबद्दल किंवा ढाच्याबद्दल. ही पुस्तके सामान्यतः सर्वसाधारण मानवी स्थितीवर भाष्य करू पाहतात. साहजिकच त्यांचा सगळा भर एका प्रमुख पात्रावर असतो. या प्रमुख पात्राचे जीवनचरित्र आणि साहसी कृत्ये त्या पुस्तकात वर्णिलेली असतात. मात्र दुय्यम पात्रे या पुस्तकांमधे नसतातच असा याचा अर्थ करायचा नाही. तशी दुय्यम पात्रे याही पुस्तकांमध्ये असतात. परंतु त्यांचा उपयोग मुख्य पात्राची ढाल किंवा त्याला उठाव देणारी पार्श्वभूमी असा असतो किंवा मुख्य पात्राच्या व्यक्तित्वाची उलट बाजू सूचित करण्यासाठी असतो किंवा मुख्य पात्राच्या मतप्रणालीची



अनुक्रमणिका

दुसरी बाजू मांडण्यासाठी हे पात्र येते. एका अत्यंत तरल अर्थाने ही सर्व दुय्यम पात्रे म्हणजे मुख्य पात्राचीच छोटी छोटी भावंडे किंवा संभाव्य रूपे असल्याने किंवा नायक शेवट त्यांच्याशी कसे जमवून घेतो, म्हणजेच स्वतःच्या खऱ्या आत्म्याशी तो तडजोड कशी करतो हा प्रश्न हाच या पुस्तकातील खरा महत्वाचा पेच असतो. हे वैशिष्ट्य सर्वकालिक व सार्वत्रिक असल्याने प्रत्येक वाचक मग तो कोणत्याही देशातला असो वा कालखंडातील असो अगदी सहजगत्या नायकाच्या व्यक्तित्वाशी एकरूप बनतो. नायकाचे प्रश्न त्याच्या व्यथा, त्याच्या चिंता, नि काळज्या त्याला त्याच्या स्वतःच्या वाटू लागतात. थोडक्यात ही पुस्तके वाचताना बऱ्याचदा वाचकाला आपण आपलेच अंतःचरित्र वाचत आहोत असे वाटत राहाते. पुस्तकातील भाष्ये, चर्चा, त्याला ओळखीच्या वाटतात. शिवाय या पुस्तकातल्या कथा इतक्या साध्या, सरळ, बिनगुंतागुंतीच्या आणि जगाच्या पाठीवर कोठल्याही देशात व काळात घडू शकणाऱ्या असतात की, वाचताक्षणी त्या खऱ्या वाटून जातात. त्यांच्या खरेपणाबद्दल शंका उत्पन्न होत नाहीत. साहजिकच त्यांचे आकर्षणही त्यामुळे दुप्पट बनते. अर्थात कथा साध्या, सरळ, एकमार्गी असल्या तरी या पुस्तकांचे नायकसुध्दा तसे असतात असे नव्हे. कधी हे नायक एकमार्गी असतातही. परंतु कधी कधी ते अत्यंत बेरकीसुध्दा असतात. परंतु त्यामुळे पुस्तकातल्या चित्रणाला उणेपणा येत नाही, उलट वाचकांच्या दृष्टीला ते अधिकच विलोभनीय मनापासून प्रेम करण्याजोगे बनतात.

'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी वरील कादंबऱ्यांच्या वर्गात पडते. परंतु असे म्हटल्याने तिच्या वाङ्मयीन गुणांबद्दल आम्ही घाईघाईने प्रशस्तीपत्र देत आहोत असे मानण्याचे कारण नाही. कारण शेवटी कोठल्याही ललितकृतीची वाङ्मयीन गुणवत्ता काळाच्या कसोटीवरून जोखली जाते नि या पुस्तकाच्या बाबतीतही ती तशीच जोखली जाणार आहे. परंतु मुद्दा हा की या कादंबरीची वाङ्मयीन महत्तता जोखायची झाल्यास ती वर उल्लेखिलेल्या पुस्तकांच्या तुलनेतच जोखावी लागते. ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे हे येथे नोंदून ठेवावे लागेल आणि याचे कारण हे आहे की, या पुस्तकाचा सर्वसाधारण ढाचा वा आराखडा वरील पुस्तकांसारखाच असून मुख्य वैशिष्ट्यांच्या बाबतीत तर हे पुस्तक व वरील अन्य पुस्तके या दोघात अजिबात फरक नाही. मुख्य म्हणजे 'रॉबिनसन क्रुसो' किंवा 'गलिव्हर्स ट्राव्हेल्स' ही पुस्तके जशी ती प्रसिध्द होऊन इतकी वर्षे उलटली तरी पहिल्यासारखी टवटवित वाटतात आणि नव्या वाचकांकडून नवी म्हणून वाचली जातात तोच प्रकार 'भर मध्यान्हीचा अंधार' च्या बाबतीत घडला आहे. ही कादंबरी प्रसिध्द होऊन आता पन्नासवर वर्षे उलटली. परंतु तरीही तिचे आकर्षण संपलेले नाही. या कादंबरीच्या बाबतीतील हे सर्व मुद्दे जर का आपण विचारात घेतले

तर 'भर मध्यान्हीचा अंधार' हे आजच्या परिस्थितीला लागू पडणारे नवे मिथ्यक आहे हे कोणीही कवूल करील.

'भर मध्यान्हीचा अंधार' ही कोस्सलर यांची दुसरी कादंबरी. पहिली 'द ग्लॅडिएटर्स' ही. 'भर मध्यान्हीचा अंधार' ही एक ऐतिहासिक कादंबरी आहे. तसेच ती आध्यात्मिक आणि वैचारिक कादंबरीसुध्दा आहे. ही कादंबरी ऐतिहसिक आहे, कारण तिच्यात वर्णिलेले प्रसंग ऐतिहासिक किंवा प्रत्यक्ष घडलेले आहेत. या प्रसंगांना ऐतिहासिक स्थळकाळाचा संदर्भ आहे, 'भर मध्यान्हीचा अंधार' ह्या कादंबरीतील मुख्य मुख्य सर्व प्रसंग स्टॅलिनच्या रशियातले आहेत. विशेषतः १९३६ ते १९३८ या सालच्या रशियातले आहेत. या काळात स्टॅलिनने कम्युनिस्ट पक्ष सफाईचा कार्यक्रम सुरू केला होता. या कार्यक्रमाला इतिहासात 'द ग्रेट पर्ज', 'महान पक्षसफाई यज्ञ' असे भारदस्त नाव आहे. या काळात रशियात जे घडले त्याचे वर्णन 'भर मध्यान्हीच्या अंधारात' आले आहे. मात्र ही संपूर्ण कादंबरी जरी सोव्हिएट रशियातल्या घटनांवर आधारीत असली तरी कादंबरीत कोठेही स्टॅलिनच्या नावाचा प्रत्यक्ष उल्लेख नाही. स्टॅलिनचा उल्लेख नंबर वन – क्रमांक एक या शब्दात आहे. नंबर एक म्हणजे अर्थात कम्युनिस्ट पक्षातला नंबर एक. तसे पाहिल्यास कादंबरीत सोव्हिएट युनियनचाही प्रत्यक्ष उल्लेख कोठेही आलेला नाही. फार कशाला, ज्या घटनांचे व प्रसंगांचे वर्णन कादंबरीत आले आहे त्यांच्यासुध्दा नेमक्या तारखा व जागा कोस्सलरनी कोठेही दिलेल्या नाहीत.

मात्र असे असले तरी हे प्रसंग कोणते, या घटना कोणत्या हे सर्व केव्हा व कोठे घडले, त्यात कोण सामिल होते याबद्दल शंका घ्यावयास अजिबात जागा नाही इतक्या त्या निर्विवादपणे खऱ्या आहेत. या सर्व घटना स्टॅलिनच्या रशियातच घडल्या होत्या यात अजिबात शंका नाही. थोड्या संशोधनांती या घटना व प्रसंगांची माहिती आपणास मिळविता येते. थोडक्यात असे की, 'निकोलाय सालमोनोविच रुबाशॉव्ह' हा 'डार्कनेस' चा नायक आणि ज्याचा उल्लेख लेनिन 'बोल्शेव्हिक पक्षाचा लाल' या शब्दात करीत असे नि सोव्हिएट गुप्त पोलीस खात्याने (जी. पी. यु.) १९३८ साली देशद्रोहाच्या बनावट खटल्यात ज्याला गोवले होते तो निकोलाय बुखारीन हा बोल्शेविक पक्षातला आद्य खंदा शिपाई – ओल्ड गार्ड – हे दोन्ही एकच होत आणि बुखारीतवरच्याच खटल्याची ही हकिकत आहे हे कोणालाही शोधून काढता येते.

तथापी स्टॅलिनच्या राजवटीमध्ये सोव्हिएट युनियनमध्ये ज्या अनेक अनन्वित व निर्घृण घटना घडल्या नि देशाच्या उध्दाराच्या नावाखाली जे भयंकर अत्याचार केले गेले त्यांची माहिती मिळविण्यासाठी 'डार्कनेस' ही कादंबरी प्रसिध्द होण्याची गरज होती



अनुक्रमणिका

असे नव्हे. स्टॅलिनच्या राजवटीत रशियामध्ये ज्या भयंकर गोष्टी घडत होत्या त्याचे कागदोपत्री पुरावे तेव्हासुध्दा रग्गड उपलब्ध होते किंवा ज्यांनी ते प्रकार स्वतःच्या डोळ्यानी पाहिले होते अशांच्या आठवणीसुध्दा उपलब्ध होत्या. थोडक्यात असे की, स्टॅलिनच्या रशियात स्टॅलिनच्या मार्गदर्शनाखाली काय काय अत्याचार घडत होते हे समजून घेण्याची इच्छा ज्यांची होती त्यांच्यासाठी अनेक मार्ग हजर होते. परंतु खरी अडचण इथेच होती. 'समजून घेण्याची इच्छा नसली की, स्वतःच्या तळहातावरच्या रेषासुध्दा मनुष्याला बरोबर दिसेनाशा होतात.' सोव्हिएट रशियात हेच घडत होते. अनेक विद्वान, बुध्दिमान, ज्ञानी माणसे तेव्हाच्या सोव्हिएट रशियाच्या बाबतीत डोळ्यांवर कातडे ओढून बसली होती आणि तेथे जे काही चालले होते त्याच्याकडे कानाडोळा करीत होती. उदा. डाव्या मतप्रणालीची आणि स्वतःला पुरोगामी, प्रगत आणि उदारमतवादी अशी मोठमोठी विशेषणे लावून घेणारी जगभरची विचारवंत मंडळी. या तथाकथित विचारवंतांना स्टॅलिन राजवटीत सर्वसामान्य नागरिकाला जे भीषण अत्याचार सहन करावे लागत होते ते अजिबात दिसत नव्हते. त्यांना सर्वत्र आलबेल वाटत होते. याचे कारण असे होते की, त्यांनी स्वतःच्या डोळ्यावर पोथीवादाची झापडे लावली असल्याने जी राजवट अत्याचाऱ्यांचा बंदोबस्त करण्यासाठी व गोरगरीबांवरचा अन्याय करण्यासाठी प्रतिज्ञेने सत्तेवर येते ती स्वतःच अन्याय व अत्याचार करणे शक्य नाही असे त्यांनी ठरवून टाकले होते.

साहजिकच स्टॅलिनच्या संमतीने गोरगरीबांवर, पिडितांवर आणि पक्षातल्याच सच्च्या शिपायांवर होत असलेले अत्याचार त्यांना कबूल करायचे नव्हते. स्टॅलिनच्या राजकारणाचा खरा रंग पाहाण्याची त्यांची प्रामाणिक इच्छा नव्हती; नि म्हणून त्याना ते दिसत नव्हते. आपल्या आत्मचरित्रात हे कसे घडते याचे विश्लेषण खुद्द कोस्सलर यांनीच दिलेले आहे. सारांश स्टॅलिनच्या राजवटीत ज्या निर्घृण घटना घडत होत्या, त्या आपण पाहू नयेत असे अनेक तथाकथित विचारवंतांना तेव्हा वाटत होते. दोन, जरी समजा त्या घटना दिसल्या तरी त्या आापण कबूल करू नयेत असेही त्यांना वाटत होते. कबूल केल्या तर त्याच्याविरुध्द पवित्रा घ्यावा लागेल नि पवित्रा घेतला तर जगाच्या उध्दाराचा स्टॅलिनप्रणित जो महान प्रयोग चालू होता तो त्याज्य ठरवावा लागेल असे त्यांना वाटत होते.

तिसरी गोष्ट स्टॅलिन आणि स्टॅलिनच्या रशियाबद्दलची जागतिक सहानुभूती नष्ट होता कामा नये तेव्हा जगातल्या भल्या लोकांपासून ते दडवून ठेवले पाहिजे अशीही त्यांची धारणा होती. या सर्व कारणांसाठी स्टॅलिनच्या राजवटीचे खरे चित्र जगासमोर आले नाही आणि 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीच्या निमित्ताने जेव्हा ते चित्र बाहेर आले

तेव्हा खऱ्या विचारी, समंजस व संवेदनाशील जनतेला मोठाच मानसिक धक्का बसला. एकीकडे कोस्सलर यांची कादंबरी प्रसिध्द होत होती, तर दुसरीकडे स्टॅलिनच्या मृत्यूनंतर स्टॅलिन राजवटीबद्दलची खरी माहिती बाहेर येत होती. स्टॅलिनच्या राजवटीत जनतेची खरी स्थिती काय होती याचा इतिहास प्रसिध्द होत होता. त्या इतिहासाला दुजोरा देणारा प्रचंड लेखी पुरावा जगापुढे येत होता आणि या बरोबरच कोस्सलर यांच्या कादंबरीच्या ऐतिहासिक सत्यतेबद्दल जो उरलासुरला संशय होता तो पाल्यापाचोळ्यासारखा उडून गेला होता. 'डार्कनेस' ही कादंबरी असल्याने खूप लोक ती वाचत होते. जे वाचत होते त्यांना मानसिक धक्का बसत होता. या काळात सोव्हिएट युनियनच्या प्रतिष्ठेला जो धक्का बसला नि सोव्हिएट युनियनची जागतिक प्रतिष्ठा एकदा जी घसरली ती पुन्हा म्हणून कधी सावरली नाही, निव्वळ एका साध्या कादंबरीने हे घडवून आणले असे म्हटल्याने त्या कादंबरीची खोटी प्रशंसा केली जात असे कोणी म्हणतील, परंतु असे म्हणणाऱ्यांना सुध्दा एक गोष्ट कबूल करावी लागेल, आणि ती ही की, 'डार्कनेस' प्रसिध्द झाली आणि पूर्वी ज्या गौरवपर आणि प्रोत्साहनपर शब्दात सोव्हिएट युनियनचा उल्लेख जगभर केला जात होता तो तेथून पुढे बंद झाला. ही कादंबरी बाहेर आली आणि सामान्य जनतेचा सोव्हिएट युनियनकडे पाहण्याचा दृष्टिकोनच पार बदलून गेला.

या कादंबरीबद्दल दुसरी सांगण्यासारखी गोष्ट अशी की, जरी ही एक ऐतिहासिक कादंबरी असली तरी ती निव्वळ ऐतिहासिक कादंबरीच नाही. तिच्यात त्यापेक्षा आणखी अधिक असे काहीतरी आहे. अर्थात एक ऐतिहासिक कादंबरी म्हणून तिचा दर्जा कमी आहे असे नव्हे तर त्या बाबतीत ती एक उत्कृष्ट कादंबरी आहेच, पण ज्याना ऐतिहासिक कादंबरीत रस नाही, वा ज्याना सोव्हिएट युनियनचे येऊ घातलेले भवितव्य आदि प्रश्नात रस नाही अशांना सुध्दा ही कादंबरी आकर्षित करू शकते. म्हणजेच निव्वळ इतिहासापेक्षा तिच्यात काहीतरी अधिक आहे. ऐतिहासिक कादंबरीप्रमाणेच ही एक उत्तम प्रकारची गुन्हेगारकथा वा गुप्तहेरकथा सुध्दा आहे. वाचण्यासाठी एकदा का ती हातात घेतली की शेवटचे पान वाचून संपल्याशिवाय वाचक ती खाली ठेवीत नाही. इतके तिचे जबरदस्त आकर्षण आहे.

तत्वतः विचार केल्यास ही एक गुन्हेगार कथाच आहे असे म्हणता येईल. कारण अथपासून इतिपर्यंत या कादंबरीत गुन्ह्याचा कबुलीजबाब मिळविण्याचाच प्रसंग चितारलेला आहे आणि ज्या रहस्यमय गुन्ह्याची कथा ही कादंबरी सांगते तो गुन्हा कोणी केला होता, कशासाठी केला होता, त्या गुन्ह्याचे खरे स्वरूप काय होते, त्या गुन्ह्याला बळी पडलेले कोण, गुन्हेगार गुन्ह्याची कबुली देतो ती का, इत्यादी इत्यादी जे प्रश्न ही कादंबरी वाचताना वाचक स्वतःला विचारतो, तेच प्रश्न सर्वसाधारणपणे प्रत्येक



अनुक्रमणिका

गुन्हेगारकथेत चितारलेले असतात. उत्तम गुन्हेगारकथेचे आणखी सुध्दा एक लक्षण या कादंबरीत पाहावयास सापडते. उत्तम गुन्हेगारकथेत ज्याला वाचक गुन्हा गुन्हा म्हणत असतो तो गुन्हा नव्हे असे ठरण्याची शक्यताही मधेच दिसू लागते. 'डार्कनेस–' मधे नेमके तसेच घडते. कथानक जसजसे पुढे सरकत जाते तसतसा रहस्याचा एकएक धागा कोस्सलर आपल्यापुढे उघडा करतात. या रहस्यांचा उलगडा शेवटी कसा होणार हे कोस्सलरनी पुरविलेल्या धाग्यांचा अर्थ आम्ही काय लावणार, त्या धाग्यांच्या बाबतीत आम्ही कोणती नैतिक भूमिका घेणार याच्यावर शेवटी ठरते. या कादंबरीचा शेवट अशाप्रकारे ओपन ठेवलेला आहे. मुक्त ठेवलेला आहे. सर्वसामान्य गुन्हेगारकथांमधे लेखकाचा निष्कर्ष तोच वाचकांचाही निष्कर्ष असतो. कोस्सलरनी ही प्रथा जणू दूर सारली आहे. त्यानी कथेचा निष्कर्ष किंवा कथेवरचे अंतिम भाष्य, वाचकाने काढायचे तात्पर्य संदिग्ध ठेवले आहे. हे तात्पर्य, हा निष्कर्ष खुद्द वाचकाने काढावयाचा आहे. रहस्याचे सगळे धागे वाचकाच्या समोर आहेत. परंतु त्या धाग्यांचा अर्थ निसंदिग्ध नाही. हा अर्थ वाचकाच्या नैतिक पवित्र्याशी संबंधित आहे. वाचकाने घेतलेल्या नैतिक भूमिकेप्रमाणे त्यांचा अंतिम अर्थ बदलणार आहे. त्यामुळे या कादंबरीचे अखेरचे भाष्य हे शेवटी वाचक काय आहे, कसा आहे, किती खोलवर जाऊन तो विचार करू शकतो याच्यावर अवलंबून राहाते. कादंबरीकाराने कादंबरीतल्या रहस्याचे सगळे दुवे वाचकासमोर मांडले आहेत. भरीस संपूर्ण प्रकरणाची कसून छाननीसुध्दा केली आहे. कादंबरीचा वाचकासाठी अर्थ काय या प्रश्नाचे उत्तर कादंबरीकाराने एकूण प्रकरणाची जी सूक्ष्म छाननी केली आहे, त्या छाननीच्या निष्कर्षांशी तो कितपत सहमत होऊ शकतो याच्यावर ठरणार आहे. दुसऱ्या शब्दात वाचक जर का या कादंबरीतल्या बौध्दिक चर्चेमध्ये मनापासून सामील झाला तरच ही कादंबरी खऱ्या अर्थाने त्याच्याशी बोलणार, संवाद करणार आहे.

'भर मध्यान्हीचा अंधार' ही जशी ऐतिहासिक कादंबरी आहे तशीच ती राजकीय कादंबरीसुध्दा आहे. तिचा एकूण रोख, तिच्यात आलेल्या चर्चा, तिचा मतितार्थ सर्व काही राजकीय स्वरूपाचे आहे आणि असे असूनसुध्दा इंग्रजी भाषेत जेव्हा ही कादंबरी पहिल्याने प्रसिध्द झाली तेव्हा इंग्रजी समीक्षकांना ती एक मानसशास्त्रावर आधारित उत्तम प्रकारची एक गुन्हेगारकथा वाटली. या कादंबरीतील सुप्त, राजकीय मतितार्थाकडे इंग्रज समीक्षकांनी पूर्णपणे दुर्लक्ष केले होते. अर्थात ही श्रेष्ठ प्रतीची गुन्हेगारकथा नाही असे नाही. ती चांगली गुन्हेगारकथा निश्चितच आहे. पण त्याचबरोबर ती एक यशस्वी राजकीय कादंबरीसुध्दा आहे आणि गुन्हेगारकथा किंवा राजकीयकथा यांच्यापेक्षा अधिकसुध्दा काहीतरी आहे. कारण कोस्सलरनी ज्या राजकीय गुन्ह्यांवरून ही कादंबरी रचली त्या गुन्ह्यांबद्दलची इत्थंभूत हकिकत जरी आज उपलब्ध असली नि त्या गुन्ह्यांबद्दलचे

वाचकांचे सगळे कुतूहल जरी आज पूर्ण शमले असले तरी सुध्दा उत्तम निवेदनशैलीत नटलेले एक पुस्तक म्हणून आजसुध्दा वाचक ते आवडीने वाचतात. वस्तुतः ज्या गुन्ह्यांचा उल्लेख तिच्यात आला आहे त्यांच्याबद्दलचे कुतूहल शमल्याने वाचकांनी तिच्याकडे पाठ फिरवावयास हरकत नव्हती. पण नसे घडत नाही, असो.

ही एक उत्कृष्ट ऐतिहासिक कादंबरी आहे. तसेच ती एक सुंदर राजकीय कादंबरीसुध्दा आहे. ही कादंबरी हे एक आधुनिक मिथ्यक आहे. तिची निवेदनशैली अप्रतिम आहे. इत्यादी सगळे गुण या कादंबरीमधे आहेत. परंतु याच्यापेक्षाही आणखी एका वेगळ्या गुणासाठी ही कादंबरी वाचकाचे लक्ष आकर्षित करते. हा गुण म्हणजे या कादंबरीचा नायक, रुबशॉव्हन हा नायक आयुष्यभर एकाकी आहे. तसे त्याचे परिचित अनेक आहेत. तो अनेक माणसांमध्ये वावरतो. कारण तो राजकीय कार्यकर्ता आहे. राजकीय क्रांती हे त्याचे ध्येय आहे. हे ध्येय आता साध्य झालेले असते. पण या ध्येयाचा मूळ, अपेक्षित, त्याने ध्येयपूर्तीच्या प्रारंभी हृदयाशी धारण केलेला रंग पालटलेला आहे. क्रांतीच्या तत्वज्ञानाचा तो भक्त आहे. प्रत्येक तत्वज्ञानाचे काही परिणाम अपेक्षित असतात. तत्वज्ञानात मांडले जातानाच हे हिशेबात घेतले जाऊ शकतात. घेतलेही गेलेले असतात. परंतु त्याच तत्वज्ञानाचे असेही कित्येक परिणाम असतात की, त्या तत्वज्ञान जाहिरात केली जात असताना जे कुणालाही, विशेषतः त्या तत्वज्ञानाच्या प्रवर्तकानाही अज्ञात असतात. तीच गोष्ट आता क्रांतीच्या तत्वज्ञानाची सुध्दा झालेली आहे. क्रांतीमधून ज्या परिणामांची अपेक्षा केली गेलेली नव्हती, असे न अपेक्षिलेले अनइंटेंडेड परिणाम बाहेर येऊ लागतात. रुबाशॉव्हच्या बाबतीत या क्षणी हेच घडलेले असते. रुबाशॉव्ह आता तुरुंगाच्या आणि कदाचित डोक्यात गोळी घातल्याने येणाऱ्या मरणाच्या दारात येऊन पडला आहे, एका क्रूर आणि निष्ठूर हुकूमशहाच्या आज्ञेवरून हे घडलेले असते. या हुकूमशहाच्या गुप्त पोलिसांनी त्याला तुरुंगाच्या कोठडीत डांबले आहे नि त्याचा छळ सुरू केला आहे. त्याला तुरुंगात डांबण्यासाठी बहुधा त्यांनी खोटे, बनावट दस्तऐवजही तयार केले असावेत. हुकूमशहाला त्याच्याकडून त्याने कदाचित न केलेल्या गुन्ह्यांचा एकतर्फी आणि खुषीचा कबुलीजबाब हवा आहे व त्यासाठी ते नानाप्रकारे छळत आहेत, दहशत दाखवित आहेत, तुरुंगात डांबल्या गेलेल्या रुबाशॉव्हला प्रथम प्रथम तरी आपणाला येथे का डांबले आहे, आपला गुन्हा तरी कोणता हेच अजिबात कळत नाही. रुबाशॉव्हच्या त्यावेळच्या मनःस्थितीची तुलनाच करायची झाल्यास ती कापकाच्या 'द ट्रायल' नामक कादंबरीतील 'के' या प्रमुख पात्राच्या मनःस्थितीशीच फक्त करता येईल. या 'के' ला सुध्दा तुरुंगात डांबण्यात आलेले असते. परंतु आपणास तुरुंगात का डांबले हे मात्र त्याला माहित नसते. 'के' ला वाटते की ''आपली अवस्था एखाद्या बेवारशी कुत्र्यासारखी झाली आहे.



अनुक्रमणिका

इतकी लज्जास्पद की, मृत्यूमुळे जरी देहाची सुटका झाली तरी लांछन मागे राहाणारच आहे." रुबाशॉव्हच्या मनाची स्थितीसुध्दा अगदी तशीच झाली आहे.

हुकूमशहाच्या आज्ञेवरुन सुरू झालेली रुबाशॉव्हची पोलीस तपासणी हा या कादंबरीचा मुख्य विषय आहे. या तपासणीचे स्वरूप अगदी चमत्कारीक आहे. कारण एका बाजूने हुकूमशहाचे गुप्त पोलीस रुबाशॉव्हला प्रश्न करीत असतात तर दुसऱ्या बाजूने खुद्द रुबाशॉव्ह स्वतःच स्वतःला त्याच प्रकरणाबद्दल प्रश्न करीत असतो. एकाचवेळी अशा प्रकारे दोन वेगवेगळ्या पातळींवर ही चौकशी सुरू आहे. प्रश्न विचारले जात आहेत, उत्तरे दिली जात आहेत. उत्तरे बदलली जात आहेत. हुकूमशहा रुबाशॉव्हचा न्याय करू पाहात आहे तसाच खुद्द रुबाशॉव्ह स्वतःही स्वतःचा न्याय करू पाहत आहे. रुबाशॉव्हचा स्वतःला विचारलेला प्रश्न, "आपले काय चुकले ? ज्या दारुण परिस्थितीत आपण आज सापडलो आहोत ते कोणत्या कारणाने ? कशामुळे ? आपले कोठे चुकले ?" हा आहे. हा प्रश्न स्वतःच तो अनेकवार विचारतो. उत्तरे देतो, उत्तरे मागे घेतो, कोठल्याही उत्तराने त्याचे अंतिम समाधान होत नाही. पुन्हा पुन्हा तोच पहिला प्रश्न त्याच्या समोर येऊन उभा ठाकतो. ज्या पारदर्शक प्रामणिकपणाने रुबाशॉव्ह हे सर्व करीत असतो त्यामुळे त्याच्या दैवगतीबद्दल वाचकाच्या मनात अपार सहानुभूती आणि अनुकंपा उत्पन्न होते आणि अनुकंपेबरोबरच त्याच्या अफाट धैर्याबद्दल तितकाच अपार आदरसुध्दा उत्पन्न होतो. एकीकडे पोलीस रुबाशॉव्हला प्रश्न विचारीत असतात, दुसरीकडे खुद्द रुबाशॉव्ह स्वतःला प्रश्न विचारीत असतो. या प्रश्नातून राजकीय क्रांती आणि त्या क्रांतीचे आनुषंगिक पण न अपेक्षिलेले परिणाम याच्याबद्दल खुद्द वाचकसुध्दा स्वतःला प्रश्न विचारू लागतो. समकालीन राजकीय व्यवहाराबद्दल स्वतंत्र भूमिका घ्यावयास उद्युक्त होतो. एकाचवेळी अशाप्रकारे तीन चार पातळींवर एकाच समान विषयाबद्दल विचारमंथन घडून येते.

एखाद्या वेवारशी कुत्र्यागत आपली अवस्था कशामुळे झाली आणि आपला देहांत झाला तरी आपल्या नावाला लागलेले लांछन मागे उरणार अशा अवनत दशेला आपण कसे आलो हे रुबाशॉव्हला शोधून काढायचे आहे नि त्यासाठी तो वेगवेगळ्या दिशांनी स्वतःच्या हृदयात ठाव घेत आहे. रुबाशॉव्हच्या मनाची उलघाल उघड करून दाखविता दाखविता कोस्लर मधेच असा एक प्रश्न उपस्थित करतात की, ज्या प्रश्नाबरोबर या कथेचा रशियन वातावरणाशी असलेला संदर्भ मागे लोटला जाते आणि आपण वैश्विक वातावरणात प्रवेश करतो.

एका निर्घृण हुकूमशहाच्या आज्ञेवरून गुप्त पोलिसांनी रुबाशॉव्हची तपासणी सुरू केली आहे. या तपासणीसाठी रुबाशॉव्हला ते प्रश्नावर प्रश्न विचारत आहेत. याचवेळी



अनुक्रमणिका

खुद्द रुबाशॉव्हह स्वतःला प्रश्न विचारीत असतो, एकीकडे पोलीस त्याचा शारीरिक व मानसिक छळ करीत असतात तर दुसरीकडे खुद्द रुबशॉव्हही स्वतःचा मानसिक छळ करीत असतो. रुबाशॉव्ह जेव्हा एका नैतिक प्रश्नाच्या उत्तरासाठी स्वतःचा छळ सुरू करतो, स्वतःपाशी स्वतःच्या पापाचा झाडा देऊ लागतो तेव्हा वाचकाला एकाएकी जाणवू लागते की, हा रुबशॉव्ह फक्त रशियन नाही. तो केवळ रशियाचे तेथील कम्युनिस्ट वातावरणाचे, मार्क्सवादी वाद–प्रतिवादाच्या तर्कशास्त्राचे अपत्य नाही. तो त्याचवेळी जागतिक वातावरणाचेही अपत्य आहे. रुबाशॉव्हचे राजकीय अनुभव आम्हाला अनोळखी आहेत. त्याचे मार्क्सवादी वाद–प्रतिवादाचे तर्कशास्त्रशुध्द आम्हाला अनोळखी आहे.

परंतु स्वतःच्या हातून घडलेल्या चुकांसाठी आपल्या पापासाठी स्वतःला जबाबदार धरू पाहाणे, स्वतःशी पापाचा झाडा देऊ पाहाणे, त्यासाठी स्वतःला शिक्षा देऊ पाहाणे हे सर्व आपल्या ओळखीचे आहे. कारण न्याय तर आपणा सर्वांचाही होणार आहे. या न्यायनिवाड्यापासून कोणाचीही सुटका नाही. रुबाशॉव्हची नाही की आम्हा वाचकांची नाही. जगात आम्ही जे जे करू त्यासाठी आम्ही जबाबदार असतो. परंतु या ना त्या निमित्ताने जे करायचे आम्ही टाळलेले असते त्याच्यासाठीही आम्ही तितकेच जबाबदार असल्याने जेव्हा रुबाशॉव्हची खरी दशा नी रुबाशॉव्हसमोरचा प्रश्न आमच्यासमोर उघडा होतो तेव्हा आम्ही मनाने त्याच्याशी एकरूप बनतो. आता रुबाशॉव्हला पडलेला प्रश्न त्याच्या एकट्याचा राहात नाही, तो तुम्हा आम्हा रुबाशॉव्हची कैफियत वाचणाऱ्या सर्वांचाच बनतो. ज्या सार्वत्रिक संकटात रुबाशॉव्ह आहे त्याच संकटात, त्याच नैतिक पेचप्रसंगात आम्हीही सर्वजण आहोत आणि एकदा का या नव्या दृष्टीकोनातून रुबाशॉव्हच्या कथेकडे आम्ही पाहू लागलो की, मग रुबाशॉव्ह हा केवळ क्रांतीकारक रुबाशॉव्ह उरत नाही, रुबाशॉव्ह हा त्याचवेळी त्याची जबानी गोळा करणारा ग्लेटकिनसुध्दा असतो. रुबाशॉव्ह ग्लेटकिनपासून वेगळा नाही आणि जी. पी. यु. चा अधिकारी ग्लेटकिन हासुध्दा रुबाशॉव्हपासून वेगळा नाही. ग्लेटकिन हा रुबाशॉव्हचा अल्टर इगो आहे, डॉपलगँजर (doppelganger) आहे, त्याचा दुसरा आत्मा, प्रतिस्पर्धी आत्मा आहे. आता रुबाशॉव्हला विचारले गेलेले प्रश्न हे ग्लेटकिनचे प्रश्न उरत नाहीत, तर खुद्द रुबाशॉव्हने स्वतःच स्वतःला विचारलेले ते प्रश्न बनतात. ज्यांची उत्तरे त्याने तर्काच्या अंतिम टोकाला जाऊन द्यावयास हवी होती. पण ज्यांची उत्तरे त्याने अर्ध्यावरच मधेच सोडली होती आणि जी उत्तरे आम्ही आमच्या मनात खेळवू लागतो.

रुबाशॉव्हच्या पुढे खऱ्या महत्वाचा प्रश्न हा आहे की, इतिहासाचा अर्थ आणि ऐतिहासिक प्रक्रियेतील सुट्या व्यक्तीचे स्थान आणि काम काय ? ग्लेटकिन म्हणतो ते

की, रुबाशॉव्हला वाटते ते ? आणि ग्लेटकिनचा इतिहासाच्या तत्वज्ञानाबद्दलचा दृष्टीकोन जर का चुकीचा असेल तर विचारी मनुष्याला पटेल अशा प्रकारचा युक्तिवाद करून ते त्याला कसे पटवून देता येईल ? त्यासाठी वस्तुनिष्ठ पुरावा कोठून आणायचा ? तार्किक युक्तिवाद कोणते करायचे ? कथा संपता संपता रुबाशॉव्हला वाटते की, या प्रश्नाचे उत्तर आपणाला गवसले आहे. परंतु हे उत्तर खुद्द रुबाशॉव्हलाच दोषी ठरवू पाहाते. त्यालाच शिक्षा ठोठावू पाहते आणि शेवटी आपण दोषी आहोत हे पटल्याने, अर्थात हुकूमशहाच्या हस्तकांनी दिलेल्या कारणांसाठी नव्हे तर खुद्द रुबाशॉव्हने स्वतःच शोधून काढलेल्या कारणासाठी होय, रुबाशॉव्ह त्याला दिल्या गेलेल्या शिक्षेची न्यायता मान्य करतो आणि शिक्षा भोगावयास तयार होतो. ज्या अतुल धैर्याने आणि निखळ प्रामाणिकपणाने हे सर्व तो करतो त्यासाठी मग आमची मने हेलावतात. आम्हाला त्याच्या दैवगतीमधे आस्था वाटू लागने नि मनातल्या मनात वाटत राहाते की, रशियातल्या बड्या पक्षसफाई कार्यक्रमाच्या विषारी आठवणी जरी काळाच्या उदरात गडप झाल्या तरीसुध्दा पुढे आणखी दीर्घकाळपर्यंत तरी लोक रुबाशॉव्हला विसरणार नाहीत. अर्थात विकृत राजकीय वातावरणातून तयार झालेले एक विलक्षण प्रकरण म्हणून विसरणार नाहीत असे नसून ज्या विशिष्ट प्रकारच्या दैवगतीमधे रुबाशॉव्ह सापडला होता जवळपास तशाच प्रकारच्या दैवगतीमधे आधुनिक समाजाचा प्रत्येक घटक सापडू शकतो हे जाणल्यामुळे विसरणार नाहीत.

(टीप – जी. पी. यु. रशियन राष्ट्रीय सुरक्षा व्यवस्था, १९४१ सालापर्यंत ही सुरक्षा व्यवस्था (याच सुरक्षा व्यवस्थेमधे सोव्हिएट गुप्त पोलीस खात्याचाही समावेश होता.) एका स्वतंत्र खात्याच्या अखत्यारीत होती. १९४१ सालानंतर ती दोन खात्यांच्या अखत्यारीखाली गेली. या खात्याचे मूळ नांव Cheka असे होते. चेका म्हणजे एक्स्ट्रा ऑर्डिनरी कमिशन. १९२२ नंतर हे नाव बदलण्यात आले. चेकाचे तेव्हा जी. पी. यु. असे झाले. १९२३ मधे पुन्हा एकदा हे नाव बदलण्यात आले. आता ते ओ. जी. पी. यु. (युनायटेड स्टेट पोलिटिकल डायरेक्टोरेट) असे करण्यात आहे. १९३४ मधे हेही नाव बदलण्यात आले. नवे नाव एन्‌केव्हीडी – पिपल्स कमिसारिॲट फॉर इंटर्नल अफेअर्स असे झाले. १९४१ मधे एन्‌केव्हीडीचे दोन विभाग करण्यात आले. एका विभागाचे नाव एन्‌केव्हीडी असे राहिले व दुसऱ्याला एन्‌केव्हिजीबी - पिपल्स कमिसारिॲट फॉर स्टेट सेक्युरिटी असे नवे नाव देण्यात आले.)

* * *



अनुक्रमणिका

# २. थोडक्यात 'डार्कनेस ॲट नून'

१.

(आमच्या वाचकांपैकी अनेकांनी 'डार्कनेस ॲट नून' ही कादंबरी वाचलेली असेल. त्यामुळे ती कशाबद्दल आहे हे त्याना आधीच ठाऊक असेल. रुबाशॉव्ह हा खंदा क्रांतीकारक. एक बुजुर्ग बोल्शेव्हिक, ज्या पिढीने रशियन क्रांती घडवून आणली त्या पिढीपैकी एक. या रुबाशॉव्हला सरकारी पोलीसांनी पकडलेले असते. जनतेचा त्याने विश्वासघात केला, परकी राष्ट्राकडून लाच म्हणून पैसे घेतले इ. इ. आरोप त्याच्यावर करण्यात येतात. हे सगळे आरोप अगदी बिनबुडाचे, तद्दन खोटे आणि हास्यास्पद आहेत. परंतु शेवटी तो त्या सर्वांची कबुली देतो. तेव्हा कादंबरीचा ऐतिहासिक आधार अगदी उघड आहे. **स्टॅलिनप्रणीत पक्षसफाई यज्ञाच्या** काळात त्या यज्ञाचा एक भाग म्हणून जे **फसवे खटले** उभे केले गेले त्या खटल्यात नेमक्या अशाच प्रकारच्या कित्येकांनी असल्याच दुष्कृत्यांचे कबुलीजबाब दिले होते. देशाशी, क्रांतीशी एकनिष्ठ, समर्पित असे ते सर्वजण होते. आता प्रश्न असा होता की, त्यानी हे कशासाठी केले होते ? जी दुष्कृत्ये त्यानी केली नव्हती त्या दुष्कृत्यांचे कबुलीजबाब त्यानी का म्हणून दिले होते ? जे कुणी कम्युनिस्ट पक्षाचे घटक होते त्यांच्या दृष्टीने प्रश्नाचे उत्तर अगदी सरळ होते. या लोकांनी ती दुष्कृत्ये खरोखरच केली होती. तेव्हा ते अपराधीच होते नि म्हणून त्यानी अपराधाचा कबुलीजबाब दिला होता. याच्या उलट जे कुणी कम्युनिस्ट विरोधक होते त्यांच्याही दृष्टीने प्रश्नाचे उत्तर अगदी साधे व सरळ होते. मारझोड करून आणि भय दाखवून त्यांच्याकडून कबुलीजबाब घेतले गेले आहेत. परंतु ज्यांनी हे कबुलीजबाब दिले ती माणसे लेचीपेची नव्हती. ती चांगली खमकी होती, मारझोडीला दाद न देणारी होती. समर्पित वृत्तीची होती. **क्रांतीच्या** प्रयत्नात त्यांच्यावर अनेकदा जीवावरचे प्रसंग येऊन गेले होते. मृत्यूची भीती त्याना घाबरवू शकत नव्हती. तोवरच्या आयुष्यात अनेकदा ते हासत हासत मृत्यूला सामोरे गेलेले होते. तेव्हा मृत्यूला डरणाऱ्यांपैकी ते नव्हते. त्यांच्यावरचा एकही आरोप खरा नव्हता. त्या बाबतीत ते पूर्ण निर्दोष होते. परंतु ज्या सत्तेच्या नावाने त्यांच्यावर आरोप ठेवले गेले होते त्या सत्तेवर त्यांचा पूर्ण विश्वास होता. त्या सत्तेच्या सेवेत त्यानी देह झिजवला होता, आयुष्य वेचले होते.

तेव्हा शेवटी प्रश्न हा उरतो की हे कसे घडून आले होते ? या आरोपीनी खोटे कबुलीजबाब का द्यावेत ?)



अनुक्रमणिका

२.

(रुबाशॉव्ह हा 'डार्कनेस ॲट नून' या कादंबरीचा नायक. रुबाशॉव्हवर देशद्रोहाचा आरोप असतो. नि हा आरोप शेवटी तो कबूल करतो. वस्तुतः रुबाशॉव्ह आरोपाच्या बाबतीत पूर्ण निर्दोष होता. पण तरीही तो आरोपाची कबुली देतो. ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिन हे दोन अधिकारी त्याची जबानी घेतात. ऐव्हानॉव्ह रुबाशॉव्हच्या पिढीचा एकेकाळचा त्याचा सहकारी. क्रांतीचे तर्कशास्त्र त्याच्याच हाताखाली शिकलेला. ग्लेटकिन नंतरच्या पिढीचा. रुबाशॉव्ह म्हणजे काय हे न जाणणारा. अतिशय मुर्दाड. मनुष्य कितीही चिवट असला तरी त्याच्या चिवटपणाला मर्यादा असतात आणि ती मर्यादा गाठली की, तो वठणीवर येतो असे मानणारा.

ऐव्हानॉव्ह मानसशास्त्रीय तंत्रे वापरून रुबाशॉव्हचा कबुलीजबाब मिळवू पाहातो. ग्लेटकिन छळ आणि दहशतीची तंत्रे वापरून तेच करू पाहातो. अनेकाना ही तंत्रे काय असावीत याची माहिती नसेल. खुद्द कोस्सलर यानी जेव्हा ही कादंबरी लिहिली तेव्हा त्यानासुध्दा या तंत्रांची पुरेशी माहिती नव्हती. ही माहिती पुढे क्रुश्चेव्ह यांच्या राजवटीत बाहेर आली. कोस्सलर यांच्या कल्पनाशक्तीची कमाल की त्यांनी त्याबद्दल बराचसा बिनचूक अंदाज केला.

रुबाशॉव्हला एकांत कोठडीत ठेवण्यात आले होते. कैद्यांवर या एकांत कोठडीचे अतिशय भयंकर परिणाम होतात. अलीकडे एकांत कोठडीच्या मानसिक परिणामांबद्दल खूप संशोधन झाले आहे. त्यातील काही माहिती खाली देत आहोत.

डेन्मार्कमधे दखलपात्र गुन्ह्यासाठी गुन्हेगाराला अटक झाली की, त्याच्यावर गुन्हा लागू होण्यापूर्वीच्या काळात पोलीस चौकशी चालू असताना एकांत कोठडीत ठेवले जाते. ही कोठडी आकाराने अगदी छोटी असते. दिवसाच्या चोवीस तासांपैकी जवळपास तेवीस तास आरोपी कोठडीत बंद असतो. दिवसातून दोन वेळा फक्त अर्ध्या अर्ध्या तासासाठी कैद्याला कोठडीबाहेर काढतात. एरवी मलमूत्रविसर्जनासाठी कैदी जातो तेव्हा आणि जेवणाच्या वेळी काय तो त्याला दुसऱ्या माणसाचा सहवास लाभतो. करमणुकीसाठी कैद्यांना पुस्तके टी.व्ही., रेडिओ आदि साधने पुरविली जातात. त्याना नातेवाईकांची पत्रे मिळू शकतात. काही काही प्रकरणात पोलीस अधिकाऱ्याच्या हजेरीत नातेवाईकांची भेट घेता येते. वस्तुतः कम्युनिस्ट राजवटीत ज्या प्रकारची एकांत कोठडी असते तिच्यापेक्षा डेन्मार्कमधल्या तुरुंगातील एकांत-कोठडी खूपच सुसह्य आहे. तरीसुध्दा कैद्यांवर या एकांत कोठडीचा परिणाम अतिशय विपरीत होतो. अनेक कैद्यांना निद्रानाशाची सवय जडते. मानसिक अस्वस्थता वाटू लागते. मन सैरभैर होते. ते एकाग्र करता येत नाही.

काहींना स्मृतीभ्रंश होतो. दिवसांचे मान नष्ट होते. वेळ किती झाला हे मोजण्यासाठी किंवा दिवसाला आकार देण्यासाठी आरोपी कैदी वेड लागल्यागत त्याच त्याच हालचाली परत परत करत राहातात. जर ते नुसतेच स्वस्थ बसले तर त्याना दिवस खावयास उठेल. कारण वेळ जाता जाणाार नाही. या कैद्यांच्या हालचाली सक्तीने घडल्यासारख्या केल्या जातात. त्याना ऑब्सेशनल रिच्युअलचे स्वरूप येते. त्यातील स्वाभाविकता अदृश्य होते. चौकशी अधिकाऱ्याने बोलावणे पाठविले, किंवा वकिलाची भेट घेण्यासाठी तुरुंगाच्या ऑफिसात जावे लागले की या दैनंदिन कवाइतींमधे, ऑब्सेसिव्ह रिच्युअलमध्ये, मानसिक सक्तीखाली केल्या जाणाऱ्या त्याच त्याच हालचालींमधे व्यत्यय येतो.

हा व्यत्यय आला की, कैदी अकारण धास्तीग्रस्त बनतात. कित्येक कैदी स्वतःच स्वतःला दुखापत करून घेतात. काही आत्महत्येचा प्रयत्न करतात. एकांत कोठडीचा कालावधी काही आठवडयांच्या पलीकडे गेला की कैद्यांना थकवा जाणवू लागतो. पण थकव्याचे कारण सापडत नाही. काहींचे जगण्यातील स्वारस्य नष्ट होते. त्याना कशातही गोडी वाटेनाशी होते. काहींचा त्यांच्या भावनांवरचा ताबा उडतो. ते घटकेत हसतात, घटकेत रडू लागतात किंवा खिन्नपणे एका जागी तासनतास बसू लागतात. त्याना वेड लागल्याचा भास होतो. अशा प्रसंगी त्याना जरी एकांत कोठडीतून बाहेर काढले तरी एकांत कोठडीचे दुष्परिणाम कमी होत नाहीत. वाचलेले लक्षात राहीनासे होते. डोक्यात प्रचंड गोंधळ माजून टी. व्ही. वरचा कार्यक्रम समजेनासा होतो. चौकशीच्या प्रसंगी अनेक आरोपी-कैदी परस्पर-विसंगत विधाने करतात. एकांत कोठडीचा कालावधी प्रमाणाबाहेर गेला तर लोकात मिसळण्याची, स्नेहसंबंध प्रस्थपित करण्याची कैद्यांना भीती वाटू लागते. मैत्री करण्याची त्यांची सवय नष्ट होते. हा दोष पुढे अनेक वर्षे टिकतो.

डेन्मार्कमधल्या आरोपी—कैद्यांना फक्त काही मोजकेआठवडेच एकांत कोठडीत बंद ठेवण्यात येते. याच्या उलट हुकूमशाही किंवा सर्वंकष सत्तावादी राजवटींमधे आरोपी—कैद्यांना विनाचौकशीच महिनोनमहिने आणि वर्षानुवर्षे एकांतकोठडी दिली जाते, तेव्हा मेंदूचे काय होत असेल याची कल्पनाच केलेली बरी ! या राजवटींमधे व्यक्तीचे मुलभूत हक्कच डावलले जातात. लॉरेन्स हिंकल आणि हॅरॉल्ड वुल्फ या दोघानी कम्युनिस्ट देशातल्या पोलीस चौकशी तंत्राचा खास अभ्यास केला आहे. या विषयावर त्यानी जो शोध-निबंध प्रसिध्द केला आहे तो आता या विषयातील अभिजात निबंध मानला जातो. या निबंधाचे नाव `Communist Interrogation and Indoctrination of ``Enemies of the State".

कैद्यांना वठणीवर आणण्याच्या कम्युनिस्ट राजवटींच्या नेहमीच्या पध्दती अशा-

राष्ट्रहितविरोधी कारवाया केल्याचा आरोप ज्यांच्यावर असतो त्यांचा पोलीस पाठलाग करू लागतात. ते जिकडे जातील तिकडे पोलीस त्यांच्या मागे हिंडतात. (राष्ट्रहितविरोधी कारवाया करणारे या शब्दांचा अर्थ राजकीय फुटीर होय.)

पोलीस फक्त संशयितावरच नव्हे तर संशयिताचे स्नेहीसोबती, त्याचे नातेवाईक, कामाच्या ठिकाणचे सहकारी सर्वांवर पाळत ठेवतात. बहुधा आपल्या पाळतीवर पोलीस आहेत हे संशयिताला कळून येते. संशयित हाय खातो, भयग्रस्त बनतो. त्याच्या मनावर प्रमाणावाहेर दडपण येते. पुढे 'पुरेसा पुरावा' हाती येताच संशयिताला राष्ट्रीय पोलीस अटक करतात. पोलीसानी अटक करताच तो इसम गुन्हेगारात जमा होतो. मग त्याच्यावर आरोपपत्रक ठेवले गेले नाही तरी यात बदल होत नाही. पोलीस धरपकड सर्वसाधारणपणे रात्रीच्या वेळी केली जाते. ज्या आरोपींवर गंभीर स्वरूपाचे आरोप असतात त्यांना एकांत कोठडी दिली जाते. सामान्य आरोपींना इतर कैद्यांबरोबर एकत्र ठेवण्यात येते. है कैदी अनेकदा पोलिसांचे खबरे असतात. ज्यांच्याकडून विशेष माहिती काढून घ्यायची असते वा ज्यांना सार्वजनिक खटल्यात गोवायचे असते अशांना एकांत कोठडीत ठेवतात. ह्या कोठड्या ठेंगण्या व अरुंद असतात. या कोठड्यांना बहुतेक करून एकच छोटी खिडकी असते व ती सुध्दा जमिनीपासून खूप उंचावर असते. कैद्याला बाहेरचे पाहता येऊ नये म्हणून ही व्यवस्था. कैद्याला कोठडीच्या बाहेर पाहता येत नाही. परंतु पहारेकऱ्याला मात्र चावीच्या छिद्रातून आतले पाहाता येते.

जेवण, व्यायाम, झोप, जवानी घेताना कैदी कायमचा एकटा असतो. त्याला वाचावयास पुस्तके मिळत नाहीत, इतर करमणूक नाही. त्याला कोठल्याही प्रकारचे काम दिले जात नाही. तो पूर्णपणे एकटाच व रिकामा असतो. त्याला कोणाशीही भाषण करता येत नाही. कधी कधी शिक्षा म्हणून त्याला तासचे तास शरीराची विशिष्ट स्थिती करून त्या स्थितीत बसून राहावे लागते. त्याला ठराविक वेळीच झोपता येते. वाटेल तेव्हा झोपून राहाता येत नाही. आज्ञा दिली जाताच त्याला झोपावे लागते. झोपताना हात ब्लँकेटच्या बाहेर ठेवावे लागतात. एका विशिष्ट स्थितीतच झोप घ्यावी लागते. कैद्याने जर का यात काही कसूर केली तर कोठडीबाहेर उभा असणारा पहारेकरी त्याला उठवून नियमाप्रमाणे वागावयास लावतो. कैद्याच्या कोठडीत दिवा दिवसरात्र जळत ठेवतात. तोंड प्रकाशाच्या दिशेकडे करून कैद्याला झोप घ्यावी लागते.

कोठडीतले तपमान कधी खूप ऊष्ण तर कधी खूप थंड ठेवण्यात येते. कैद्याला अर्धपोटी ठेवण्यात येते. फक्त कदान्न पुरविण्यात येते. अर्धवट उपास, अपुरी झोप, असह्य थंडी वा उष्णता, कायम धास्ती वा भीती याच्यामुळे कैदी लवकरच अर्धमेला

बनतो. त्याची प्रतिकारशक्ती खच्ची होते. फक्त शरीराने व मनाने दणकट असेच कैदी या प्रकारच्या छळाला यशस्वीपणे तोंड देऊ शकतात. बहुतेक हाय खाऊन चार आठ दिवसात शरण येतात.

कैद झाल्यानंतर पहिल्या तीन आठवड्यातच बरेचसे कैदी मानसिक दडपण आणि अस्वस्थता याच्यामुळे हवालदिल बनतात. पहारेकऱ्याशी त्याना संभाषण करता येत नाही वा इतर कैद्यांबरोबरही संपर्क ठेवता येत नाही. त्यांच्या जीवाचे पुढे काय होणार वा त्यांच्या कुटुंबातील लोकांचे वा स्नेह्यासोबत्यांचे काय होणार याबद्दल काहीही माहिती त्याना दिली जात नाही. त्याना सतत अनिश्चिततेच्या मानसिक वातावरणात ठेवले जाते. अनेक कैद्यांना ही मानसिक अनिश्चितता असह्य होते. बहुतेक कैदी या विशिष्ट छळाला भयंकर घाबरतात.

कैदेत येऊन चार आठवडे उलटले की आपले प्रतिज्ञापूर्वक केलेले निषेध, अर्जविनंत्या, विनवण्या, चौकशा सर्वांची किंमत शून्य आहे हे कैद्याच्या ध्यानात येऊ लागते. कैद्याला आपण कुणा अज्ञात शक्तींच्या पंजात अडकलो आहोत आणि यातून कालत्रयीसुध्दा आपली सुटका होणार नाही असे वाटू लागते. कैद्याच्या मनात हे भय उत्पन्न झाले की छळाचे मुख्य उद्दिष्ट सफल होते. मानवी मनामध्ये जी काही मूलभूत उपजत भये घर करून आहेत त्यातील एकाचा वापर करून हे उद्दिष्ट साधलेले असते. मोठ्या आवाजाचे भय मनुष्यप्राण्याला उपजत आहे. उंचावरून खाली पडण्याचे भयसुध्दा तसेच उपजत आहे. या दोन भयांप्रमाणेच एखादा दुष्ट राक्षस किंवा एखादी दुष्ट शक्ती आपणाला अवचितपणे पकडून कायमची कैदेत ठेवील की काय हे भयसुध्दा मानवी मनाला उपजत आहे नि याच भयाचा वापर करून चौकशी अधिकारी कैद्याला वठणीवर आणतात आणि स्वतःला हवा तसा कबुलीजबाब याच्याकडून लिहून घेतात. या भयाचा उगम मानवी जीवनक्रमाच्या विशिष्ट साच्यात आहे. मानवी बालक केवळ जिवंत राहाण्यासाठीही सुरवातीचा खूप काळ वडील माणसांवर सर्वस्वी अवलंबून असते. बाल्यावस्थेतील मानवी बालकाची बरीच वर्षे परस्वाधीन असतात. या काळात वडील माणसांनी त्याची देखभाल केली नाही, वेळच्या वेळी त्याला खाणेपिणे दिले नाही, त्याचे दुखणेखुपणे काढले नाही तर ते बालक केव्हाच मरून जाईल. मानवी बालक आयुष्यातील पहिली काही वर्षे अशा प्रकारे सर्वस्वी अगतिक असते आणि या अगतिकपणाचे चमत्कारिक परिणाम त्याच्या मनावर घडतात. या काळात त्या बालकाला एकीकडे आपण किती हतबल आहोत हे जाणवते, तर दुसरीकडे भोवतालची मोठी माणसे किती शक्तिमान आहेत हेही जाणवते. या मानसिक संघर्षातून वाट काढण्यासाठी मानवी बालक राक्षसाने आपणास पळवून नेले आहे, किल्ल्यात एकाकी डांबून ठेवले आहे अशी कल्पनाचित्रे स्वतःच्या मनाशी तयार

करते. संपूर्ण मानवजात पिढ्यानपिढ्या 'आपण हतबल आहोत, आपणाला कोणीतरी पळवून नेणार, एकाकी किल्ल्यात बंदीवान करणार, तेथून आपली सुटका कधीही होणार नाही, आपण तेथेच खितपत राहाणार नि एकेदिवशी मरून जाणार' हे व यासारखी कल्पनाचित्रे रंगवीत आहे. पिढ्यानपिढ्या हरएक बालक या विशिष्ट अनुभव प्रकारातून जात असल्याने या अनुभवाचा एक शाश्वत ठसा मानवी मनावर उमटला आहे. कैद्याच्या मनातील हा ठसा जागा करणे हे त्यांचा छळ करणारांचे प्रमुख उद्दिष्ट असते. एकांत कोठडी, अपुरी झोप, अपुरा आहार, कायम पाळत इत्यादी मानसिक दडपणांमुळे पकडल्यापासून साधारण चार आठवड्यात हे उद्दिष्ट साध्य होते. कैदी मनाने मागे जात जात, बाल्यावस्थेत जेव्हा तो सर्वस्वी परस्वाधीन आणि हतबल होता त्या मानसिक वयात प्रवेश करतो. एकदा का कैद्याने या मानसिक वयात प्रवेश केला की, त्याला हवे तसे हाताळता येते.

या टप्प्यावर कैदी मनाने हताश बनतो. आपल्या सुटकेची आशा सोडतो. कित्येक कैदी भ्रमिष्ट होतात. त्याना भास होऊ लागतात. बुद्धीवरचा त्यांचा ताबा नष्ट होतो. ते कळसूत्री बाहुल्याप्रमाणे वागू लागतात. त्यांची स्वतंत्र इच्छाशक्ती लुप्त होते. ते आरोग्याची काळजी घेईनासे होतात. सगळया गोष्टी फक्त सवयीने करीत राहातात. त्याना मानसिक औदासिन्य येते आणि ते मनाने भकास बनतात.

कैदी जेव्हा एकांत कोठडीत असतात तेव्हा अन्य मनुष्यप्राण्याशी म्हणून त्यांचा संपर्क फक्त चौकशी अधिकाऱ्याशी काय तो येतो. चौकशी अधिकाऱ्याव्यतिरिक्त अन्य कोणताही मनुष्यप्राणी त्यांच्या दृष्टीस देखिल पडत नाही. परिणामी चौकशी अधिकाऱ्याला त्यांच्या मानसिक जीवनात प्रचंड महत्त्व येते. चौकशी अधिकाऱ्याबरोबरच संपर्क वाढविण्यासाठी कैदी धडपडतात. चौकशी अधिकारी तर चौकशी अधिकारी, पण एका मनुष्यप्राण्याशी आपणास बोलावयास मिळत आहे एवढ्यावर खूष होऊन ते त्या अधिकाऱ्याला प्रसन्न करू पाहतात. हा अधिकारी कैद्यांची जबानी घेतो. कैद्याला तो उलटेसुलटे प्रश्न विचारतो, कैद्याकडून गुप्त माहिती काढून घेण्याचा प्रयत्न करतो. दिलेल्या माहितीवर अधिकारी खूष आहे की नाही हे कैद्यांना अधिकाऱ्याच्या वागण्यावरून समजते. अधिकारी नाखूष बनला तर कैदी आणखीच घाबरतो. कारण अशा प्रसंगी चौकशी अधिकारी कैद्याचा छळ आरंभतो. मग चौकशी अधिकाऱ्याची भेट ही सुटका न वाटता दुःखात भर वाटू लागते. चौकशी अधिकारी कैद्याला एकेजागी खूप वेळ उभे करून ठेवतो. कैद्याच्या पायाला पेटके येतात. कृत्रिम उपाय करून कैद्याची रक्ताभिसरणव्यवस्था आणि मूत्रपिंड निष्क्रिय करून टाकण्यात येतात. कैद्याचा छळ करण्याचे हे टोकाचे मार्ग. अधिक सुधारलेले पण शारीरिक मारझोडीसारखे रानटी मार्गसुध्दा वापरण्यात येतात. कैद्यांच्या

डोक्यात बौध्दिक गोंधळ उत्पन्न करण्यासाठी अधिकारी काही दिवस कैद्याला मित्रत्वाने वागवतात तर काही दिवस शत्रुत्वाने. त्यामुळे कैद्याच्या डोक्यात गोंधळ माजतो. चौकशी अधिकारी आपल्या बाजूचा आहे की विरुध्द हेच त्याला कळेनासे होते.

चौकशी अधिकारी हा कैद्याच्या आयुष्यातला कधीमधी भेटणारा एकमेव मनुष्यप्राणी असल्याने व दुसऱ्या कोठल्याच मनुष्यप्राण्याचे कैद्याला दर्शनसुध्दा होऊ शकत नसल्याने कैदी चौकशी अधिकाऱ्यावर मनाने अवलंबून राहू लागतो. एका सुप्त मानसिक पातळीवर त्यांच्यात भावबंध उत्पन्न होतो. चौकशी अधिकाऱ्याबद्दल त्याला एक चमत्कारिक सहानुभूती वाटू लागते. कैद्याला वाटू लागते की, चौकशी अधिकारी त्याचे फक्त कर्तव्य करीत आहे. त्याच्यावर बंधन नसते तर तो आपल्याशी चांगला वागला असता. कैद्याचा छळ करणे खुद्द त्यालासुध्दा आवडत नाही. पण हुकुमाचा ताबेदार असल्याने त्याचा नाइलाज होत आहे. कैदी आणि चौकशी अधिकारी या दोघांमधे जो भावबंध तयार होतो त्याचा फार मोठा परिणाम कैद्याच्या वर्तनावर होतो. चौकशी अधिकारी असे भासवतो की, कैदी जर गुन्ह्याचा कबुलीजबाब देईल तर तो आणि अधिकारी दोघेही सुटतील. अनेकदा चौकशी अधिकाऱ्याच्या या बहाण्याला व सूचक सूचनांना कैदी बळी पडतात आणि गुन्हा केलेला असतो म्हणून नव्हे तर केवळ चौकशी अधिकाऱ्याबद्दल सहानुभूती वाटून आणि त्याला वरिष्ठांकडून त्रास पोहोचू नये या हेतूने प्रेरित होऊन कैदी कबुलीजबाब लिहून देतात.

हिंकल आणि वुल्फ लिहितात की, ''केवळ चौकशी अधिकाऱ्याबद्दल सहानुभूती वाटत आहे एवढ्याच कारणासाठी आरोपी–कैद्यानी कबुलीजबाबावर सही दिल्याच्या उदाहरणांची नोंद आहे. आपण कबुलीजबाब दिला नाही तर या गरीब बिचाऱ्या चौकशी अधिकाऱ्याला शिक्षा भोगावी लागेल या भावनेतून कैदी कबुलीजबाब देतात. याचा अर्थ आरोपी-कैदी आणि चौकशी अधिकारी या दोघांमधे जे मैत्रीचे नाते प्रस्थापित झालेले असते त्याचा फार मोठा प्रभाव कैद्याच्या वागण्यावर चालतो. कैदी आणि चौकशी अधिकारी या दोघांमधे वरीलसारखे मैत्रीचे नाते जरी प्रस्थापित झाले नाही तरीसुध्दा अधिकाऱ्याच्या हाताखाली नव्या चौकशीला तोंड देण्याऐवजी आणि एकांत कोठडीचा व अन्य छळ भोगण्याऐवजी कम्युनिस्टांच्या कायद्यामधे ज्या गुन्ह्यांना 'राष्ट्रविरोधी कारवाया' असे नाव आहे ते गुन्हे केल्याचा कबुलीजबाब देणे अधिक श्रेयस्कर असे त्याना वाटते व ते तसा कबुलीजबाब देऊन टाकतात.'' (१९५६)

धाकदपटशाने कैद्यांकडून कबुलीजबाब मिळविण्याचे हे तंत्र चार दोन वर्षांच्या प्रयत्नाने साध्य झालेले नाही. त्या तंत्राला अनेक वर्षांचा इतिहास आहे. झारच्या काळात

या तंत्राचा प्रारंभ झाला आणि कम्युनिस्ट राजवटीत अनेक प्रयोग करून ते आजच्या पूर्णत्वाला प्राप्त झाले आहे. झारच्या काळातील गुप्त पोलीस, आरोपींकडून कबुलीजबाब मिळविण्यासाठी, कैद्यांवर काही विशिष्ट शारीरिक प्रयोग करीत. त्याच प्रयोगांमधे सुधारणा करीत करीत आजची पध्दती तयार झाली आहे. कैद्याला देण्यात येणारी एकांत कोठडी हा त्यातील महत्त्वाचा भाग आहे. कैदी एकांत कोठडीला प्रचंड घाबरतात. एकांत कोठडीमुळे कैद्याचे बौध्दिक व्यवहार पूर्णपणे विस्कळीत होतात. दुसरी गोष्ट अशी एकांत कोठडीचा कैदी मनाने जास्तीत जास्त परस्वाधीन बनतो. चौकशी अधिकाऱ्यावर अवलंबून राहू लागतो आणि शेवटी कबुलीजबाब द्यावयास प्रवृत्त होतो.

कम्युनिस्ट देशात आरोपी–कैद्यांकडून न केलेल्याही राजकीय गुन्ह्यांचे कबुलीजबाब कसे मिळविले जातात याबद्दलची थोडीबहुत माहिती वर आम्ही दिली आहे. परंतु ही माहिती बरीचशी अमूर्त आणि तात्त्विक चर्चेच्या स्वरूपाची आहे. ही चर्चा व्यवस्थित ध्यानात यावी म्हणून अशा दहशतवादी छळाचे एक प्रत्यक्ष ऐतिहासिक उदाहरणच खाली देत आहे. म्हणजे छळ करणारे छळ करताना अमानुषपणाच्या कोणत्या थराला जाऊ शकतात तेही वाचकांच्या ध्यानात येईल. तसेच एखादा हिंमतवान कैदी त्या छळाला कसा तोंड देऊ शकतो हेही त्यावरून वाचकांना समजेल. ही हकिकत डॉ. एडिथ बोन या इंग्रज बाईंची आहे. डॉ. बोन या बहुभाषातज्ज्ञ आहेत. 'सेव्हन इयर्स सॉलिटरी' या नावाच्या आत्मवृत्तपर ग्रंथात ही हकिकत त्यानी दिली आहे.

१९४९ साली त्याना हंगेरीत अटक करण्यात आली. हंगेरीत त्या नोकरी निमित्ताने गेल्या होत्या. तेथील कम्युनिस्ट सरकारने शास्त्रीय इंग्रजी पुस्तकांची हंगेरियन भाषांतरे करण्यासाठी त्याना हंगेरीत बोलावून घेतले होते. १९१९ पासून त्या कम्युनिस्ट पक्षाच्या अधिकृत सभासद होत्या. जेव्हा त्याना अटक झाली तेव्हा त्यांचे वय साठ वर्षांचे होते. ब्रिटिश सरकारच्या वतीने तुम्ही हेरगिरी केली असा त्यांच्यावरील आरोप होता. त्यानी आरोप फेटाळून लावला आणि खोटा कबुलीजबाब देण्याचेही नाकारले. चौकशी अधिकाऱ्याबरोबर कसलेही सहकार्य त्यानी केले नाही. जवळ जवळ सात वर्षे या वृध्द बाई हंगेरीच्या तुरुंगात होत्या. १९६६ सालच्या नवंबरमधे त्या सुटल्या. या सात वर्षांपैकी तीन वर्षे त्याना पुस्तक वा लेखनसाहित्य अजिबात दिले गेले नाही. शिवाय त्यांना एकांत कोठडीत ठेवले होते. ज्या खोलीत त्यांना कैद करून ठेवले होते त्या खोलीला एकही खिडकी नव्हती. खोलीचे तपमान प्रमाणाबाहेर थंड ठेवण्यात येत असे. त्यानंतर पुढचे पाच महिने त्याना एका तळघरात ठेवले होते. तळघराच्या माळ्यावर त्याना राहावे लागे. तळघराच्या भिंतींना ओल होती. तळघराच्या जमिनीवर मानवी विष्ठा पसरलेली असे. हवा बाहेर जाण्यासाठी तळघराला सोय नव्हती. अशा घाणीत त्याना तब्बल पाच महिने काढावे

लागले. परंतु बोन बाईंनी त्याना पकडणाऱ्यांना दाद दिली नाही. त्यासाठी त्यानी वेगवेगळ्या क्लुप्त्या योजल्या होत्या. त्यांचे पाठांतर चांगले होते. त्या कविता पाठ म्हणत. त्याना एकूण सहा भाषा येत होत्या. मग एका भाषेतल्या कवितेचे भाषांतर त्या दुसऱ्या भाषेत करीत. या सहा भाषांमधले जेवढे शब्द त्याना येत असत त्या सगळया शब्दांची त्यानी मनातल्या मनात यादी तयार केली, कविता रचल्या. त्याना अनेक शहरांची माहिती होती. त्या शहरांच्या रस्त्यांवरून त्या मनातल्या मनात फेरफटका मारूत येत. मुख्य म्हणजे जेवढे दिवस त्या तुरुंगात होत्या तेवढ्या दिवसात एकदाही त्यानी चौकशी अधिकाऱ्यांची पत्रास ठेवली नाही. त्यानी त्याना सतत तुच्छतेने वागविले. त्यांचा उघड तिरस्कार केला. त्याना मोठ्याने शिव्या घातल्या. स्वतःला कसल्या ना कसल्या कामात गुंतवून ठेवले. आपले निर्दोषत्व वारंवार बजावून सांगितले आणि हे उपाय करून मानसिक आरोग्य टिकवून ठेवले.)

**'डार्कनेस ॲट नून'** बद्दलची पुढील चर्चा समजण्यासाठी ह्या कादंबरीचे कथानक थोडक्यात माहित करून घ्यावे लागेल. या कथानकापैकी काही भाग आताच वर येऊन गेला आहे. पण तो फुटकळ उल्लेखांच्या स्वरूपाचा असल्याने येथे 'डार्कनेस ॲट नून' ची कथा थोडी अधिक सलग देण्याचा विचार आहे. अर्थात ही एक राजकीय कादंबरी असल्याने तिच्यातील बराचसा भाग कादंबरीतील बौध्दिक चर्चेतून व्यक्त झाला आहे. ही सगळी चर्चा येथे देता येणार नाही. कारण तेवढा अवसर नाही. शिवाय तशी गरज सुध्दा नाही. आमचा विचार या कादंबरीचे फक्त मध्यवर्ती सूत्र द्यावे असा आहे नि ते अगदी थोडक्यात देता येईल असे वाटते.

कादंबरीच्या सुरुवातीलाच कोस्सलर यांनी दोन अवतरणे दिली आहेत. त्या दोन अवतरणांवरून कादंबरीतील मुख्य बौध्दिक व भावनिक ताण - टेन्शन - स्पष्ट होतात. ही अवतरणे अशी :

एक : "हुकूमशाही स्थापन केल्यानंतर जो कोणी ब्रूटसला यमसदनास पाठविणार नाही अथवा प्रजासत्ताक स्थापन केल्यानंतर ब्रुटसच्या पोराबाळांचा निकाल लावणार नाही त्याची कारकीर्द फार काळ टिकू शकणार नाही." माकियावेली : डिस्कॉर्सो म्हणजे अर्थात प्रवचने.

दोन : हे गृहस्था, हृदयात दया नसेल तर जगणे अशक्य आहे." डोस्टोव्हस्की : क्राइम अँड पनिशमेंट.

'डार्कनेस ॲट नून' च्या नायकाचे नाव रुबाशॉव्ह. कॉमरेड रुबाशॉव्ह.

क्रांतीविरोधी कारस्थान केले म्हणून त्याला फाशीची शिक्षा दिली गेली आहे नि तुरुंगातल्या एकांत कोठडीत तो शिक्षेच्या दिवसाची वाट पाहातो आहे. बोल्शेव्हिक पक्षाचा प्रारंभापासून रुबाशॉव्ह हा आधारस्तंभ. पक्षातला खंदा लढवय्या. पडल्या पडल्या त्याला फ्रेंच राज्यक्रांती आणि त्या क्रांतीमधे ज्यांनी भाग घेतला होता त्या आद्यक्रांतीकांवरच्या सार्वजनिक खटल्याची याद येते. मुख्यतः दान्तांची. दान्ता हा फ्रेंच क्रांतीतील प्रारंभीचा एक मोठा नेता. पुढे त्याच्यावर क्रांतीशी प्रतारणा केली असा आरोप येतो व त्याचे मुंडके उडविण्यात येते. त्या प्रसंगी त्याने जे भाषण केले होते ते आता रुबाशॉव्हला आठवते. भाषण त्याचे तोंडपाठ होते.

"माझ्या आख्ख्या आयुष्याचा गळा घोटण्याचे प्रयत्न तुम्ही चालविले आहेत. माझे आयुष्य बंड करून तुमच्याविरुध्द उठू द्या. तुमच्या गळ्याला हात घालू द्या. ....... स्वातंत्र्यदेवतेच्या पावलांचा आवाज थंड होत आहे. त्याऐवजी कबरीवर मृतांच्या नावाचे जे दगड बसवतात त्या दगडांचा खडखडाट ऐकू येऊ लागला आहे. असे हे आणखी किती दिवस चालणार ? पाहावे तिकडे जुलूमजबरदस्ती दिसत आहे. जुलूमशाहीने चेहऱ्यावरचा पडदा केव्हाच टाकून दिला असून मोठ्या दिमाखाने ती सर्वत्र संचार करू लागली आहे."

रुबाशॉव्हवर बरेच आरोप आहेत. त्याच्यावर पहिला आरोप क्रांतीशी द्रोह केल्याचा आहे. दुसरा आरोप नंबर एकच्या म्हणजे कम्युनिस्ट पक्षाच्या प्रमुखाच्या खुनाच्या कटाचा आहे. तिसरा आरोप सशस्त्र कट करून कम्युनिस्ट राजवट उलथून पाडण्याच्या प्रयत्नाचा आहे.

रुबाशॉव्ह तुरुंगाच्या एकांत कोठडीत बंद केला गेला असून त्याच्याकडून 'खुशीचा कबुलीजबाब' मिळविण्याचे प्रयत्न केले जात आहेत. प्रथम ऐव्हानाव्ह व मागाहून ग्लेटकिन हे दोन पोलीस अधिकारी त्याची चौकशी करतात. ऐव्हानॉव्ह क्रांतीच्या काळात त्याच्याबरोबर असल्याने त्याला सहानुभूतीने वागवितो म्हणून पुढे त्याच्यावरही पोलीस खटला भरून त्याला ठार मारण्यात येते. ग्लेटकीन रुबाशॉव्ह आणि ऐव्हानॉव्ह यांच्या नंतरच्या पिढीतला आहे. त्याला या जुन्या मंडळींच्या विचार करण्याच्या पध्दतीबद्दल यत्किंचितही सहानुभूती नाही. त्याचा विश्वास दहशतीवर आहे. कैद्यांचा छळ करून त्यांच्याकडून कबुलीजबाब घेणे ही त्याची आवडती सवय आहे.

शेवटी रुबाशॉव्ह कबुलीजबाब देतो. पण त्याच्यावरचे आरोप त्याला कबूल होते म्हणून नव्हे तर क्रांतीच्या तत्त्वज्ञानाबद्दलची आपली एकूण भूमिकाच चुकली हे पटल्याने त्याने कबुलीजबाब दिलेला असतो. कादंबरीचा सगळ्यात मनोवेधक भाग म्हणजे पहिल्या सुनावणीच्या शेवटचा ऐव्हानाव्ह आणि रुबाशॉव्ह यांच्यातला संवाद. दुसऱ्या सुनावणीच्या

सुरुवातीला दिलेला रुबाशॉव्हच्या रोजनिशीतला उतारा व तिसरा सुनावणीच्या वेळचा काही भाग होय. पुढे हेच तीन भाग संक्षेपाने दिले आहेत. हे भाग वाचताच कम्युनिझमची इतिहासविषयक विचारसरणी, राजकीय क्रांतीबद्दलची भूमिका आणि या दोन्ही विचारसरणींचा सुप्तासुप्त परिणाम वाचकांच्या ध्यानात येईल व नंतरचे कादंबरीवरचे भाष्य अधिक चांगल्याप्रकारे आस्वादता येईल अशी आशा आहे.

या कादंबरीतील आणखी एक महत्त्वाचा प्रश्न म्हणजे पक्ष आणि समाजापलीकडे व्यक्तीला तिचे स्वतःचे म्हणून काही स्वतंत्र व्यक्तिमत्व असू शकते काय हा होय. तुरुंगात येऊन पडेपर्यंत रुबाशॉव्हला प्रत्येक व्यक्तीला खास तिचा असा स्वतंत्र पृथक 'मी' असू शकतो याची अजिबात कल्पना नव्हती. पण पुढे 'मी' आणि पक्ष व पक्षाचे पदाधिकारी ते 'तुम्ही' (यू) अशी भाषा त्याच्या तोंडी येऊ लागते नि त्याला स्वतःमधल्या या अदृश्य 'मी' ची पहिल्यानेच ओळख होते आणि तो त्या 'मी' च्या दृष्टीकोनातून आपल्या सगळया कृत्यांची फेरतपासणी सुरू करतो. अगदी शेवटी शेवटी त्याला हे पटते की, कम्युनिस्ट विचारसरणी एकतर्फी आचरण्यात आणि त्या विचारसरणीला अनुसरून आपले सहकारी, आपल्यावर आंधळा विश्वास ठेवणारी आपली स्त्री-चिटणीस यांचा जो आपण बळी दिला तो गैर आहे. या अपराधाची फेड म्हणून आपण मृत्यूदंड स्वीकारावयास हवा. सारांश कादंबरीच्या अखेरीस रुबाशॉव्ह स्वतः होऊन गुन्ह्याचा कबुलीजबाब देतो. परंतु ज्या कारणांसाठी चौकशी अधिकारी खुशीचा कबुलीजबाब मागत असतात त्याच्यापेक्षा ज्या कारणांसाठी रुबाशॉव्ह तो कबुलीजबाब देतो ती कारणे वेगळी असतात. चौकशी अधिकाऱ्याची कल्पना ही की रुबाशॉव्ह ज्या कम्युनिस्ट क्रांतीच्या विचारसरणीने एकेकाळी प्रभावित झाला होता नि मध्यंतरीच्या काळात जिचा त्याला विसर पडला होता ती विचारसरणी पुन्हा एकदा प्रभावी झाल्याने कबुलीजबाब देत आहे. तर खुद्द रुबाशॉव्ह मात्र क्रांतीची विचारसरणी तर्काच्या अंतिम टोकाला नेऊन वापरताना आपण केवळ एक शब्दिक व्याख्येच्या, एका अमूर्त कल्पनेच्या नादी लागून हाडामांसाच्या खऱ्याखुऱ्या मनुष्यप्राण्यांवर अन्याय करीत होतो हे पटल्याने कबुलीजबाब देत होता. असो. या सर्व चर्चेचा काही महत्त्वाचा भाग खाली देत आहोत.

### पहिली सुनावणी :—

भाषणाच्या ओघात ऐव्हानॉव्ह रुबाशॉव्हला म्हणतो की, ''तुला गोळी घालून ठार मारण्यात येऊ नये अशी माझी मनापासून इच्छा आहे. या उपर तू नि तुझे दैव.''

त्यावर रुबाशॉव्ह त्याला विचारतो, ''मला गोळी घालून ठार मारावयास तुम्ही

लंक का निघाला आहात ?''

(ऐव्हनॉव्ह) : ''हे पाहा, रुबाशॉव्ह माझ्याकडे थोडे लक्ष दे. मघापासून मी पाहातो आहे की, प्रत्येक वेळी तू 'मी' म्हणजे तू स्वतः आणि आम्ही म्हणजे सरकार आणि पक्ष असा फरक करीत बोलत आहेस. खरे तर तू स्वतःला पक्षापेक्षा पृथक् समजू लागलास. एवढे एक कारण तुला ठार मारावयास पुरेसे आहे. पण लोकांच्या समाधानासाठी जाहीर चौकशी आणि कायदेशीर समर्थन आवश्यक आहे म्हणून हा सारा खटाटोप.''

ऐव्हानॉव्हच्या उत्तरावर रुबाशॉव्ह विचार करू लागतो. गेल्या चाळीस वर्षात त्याने जे जे काही केले होते, ज्या ज्या तत्त्वांचा त्याने विश्वास धरला होता, जी जी तत्त्वे त्याने अमलात आणली होती, जी जी तत्त्वे त्याने लोकांना शिकविली होती, ज्यांच्या वतीने तो झगडला ते ते सर्व त्याला आता आठवू लागते. आजपर्यंत एकाच विचारसरणीचा त्याने प्रचार केला होता. पक्षाच्या तुलनेत व्यक्तीला किंमत नाही, पक्षापुढे व्यक्ती केवळ नगण्य आहे, पक्ष सर्व काही, व्यक्ती फक्त शून्य. वृक्षाची फांदी तुटली की सुकून जाणार नि गेलीच पाहिजे.''

काही क्षणांनी (रुबाशॉव्ह) : ''तुझे हे बोलणे येथे गैरलागू आहे. पूर्वी आम्ही आमचा उल्लेख 'आम्ही' या बहुवचनाने करीत होतो आणि 'मी' हे प्रथम पुरुषी एकवचन कटाक्षाने टाळीत होतो हे तू म्हणालास ते अगदी खरे आहे. 'आम्ही' च्या नावाने बोलण्याची माझी सवय आता नष्ट झाली आहे. तुम्ही लोकांनी मात्र ती सवय टिकवून ठेवली आहे. आज खरा प्रश्न हा आहे की ज्यांच्या नावाने तुम्ही स्वतःला 'आम्ही, आम्ही' असे म्हणवून घेत आहात ते 'आम्ही' खरोखर कोण आहेत ? ते कोठे आहेत ? आणि त्यांच्या नावाने स्वतःचा उल्लेख 'आम्ही' असा करण्याचा हक्क तुम्हाला आहे काय ? या 'आम्ही' शब्दाची व्याख्या आता पुन्हा नव्याने करावी लागेल नि खरा महत्त्वाचा मुद्दा हाच आहे.''

(ऐव्हानॉव्ह) : ''मला सुध्दा तेच म्हणायचे आहे. तू अगदी माझ्या मनातलेच बोललास. पक्ष, शासन आणि त्या शासनाच्या पाठीमागे असलेला बहुजन समाज आणि ज्याच्या उल्लेख 'आम्ही' या शब्दाने करीत आहोत ते सर्वजण क्रांतीकार्य पुढे चालवावयास लायक राहिले नाहीत. याबद्दल तुझी खात्री झाली आहे असेच ना तुला म्हणायचे आहे ?''

(रुबाशॉव्ह) : ''मला विचारशील तर जनतेला मी या आम्हीतून बाहेर ठेवीन.''

(ऐव्हानॉव्ह) : ''सामान्य जनतेबद्दल इतका तिटकारा तुला केव्हापासून वाटू लागला ? प्रथम पुरुषी बहुवचनाकडून प्रथमपुरुषी बहूवचनाकडून बोलण्याच्या

व्याकरणाच्या नव्या सवयीशी या बदलाचा काही संबंध आहे काय ?''

(एकांत कोठडीत बंद केल्यानंतर काही दिवसानंतर रुबाशॉव्ह जेव्हा पक्षासाठी त्याने केलेल्या कृत्यांचा विचार करू लागतो तेव्हा एकेदिवशी अकस्मात त्याची दाढ ठणकू लागते. आता ऐव्हानॉव्हने त्याला वरील प्रश्न करताच त्याची दाढ पुन्हा जोरात ठणकू लागते. कोस्सलर यानी ठणकणारी दाढ हा रुबाशॉव्हच्या विवेकबुध्दीचा पर्याय म्हणून वापरला आहे. रुबाशॉव्ह आपल्या 'मी' च्या नावाने स्वतःच्या कृत्यांचा विचार करू लागतो नि त्याची दाढ दुखू लागते. ऐव्हानॉव्हच्या प्रश्नावर तो एक क्षणभर डोळे मिटून घेतो नि स्वतःशी बोलल्यासारखे बोलतो, ''पापाची फेड करावयास हवी. पापाच्या फेडीची सुरवात झाली.'')

(रुबाशॉव्ह) : 'जनतेला या तुमच्या 'आम्ही' मधे ओढू नकोस. जनता म्हणजे काय हे तुम्हाला अजिबात कळण्यासारखे नाही. बहुधा मलाही आता ते कळत नसावे. एक काळ असा होता की, जेव्हा 'आम्ही' खऱ्या अर्थाने आम्ही होतो आणि जनता म्हणजे काय हे इतर कोणाहीपेक्षा आम्हाला अधिक चांगल्या प्रकारे कळत होते. जनतेच्या खऱ्या अंतःकरणाचा, तिच्या आशा आकांक्षाचा इतका खोलवर ठाव आपल्यावाचून अन्य कुणीच आजवर कधी घेतला नव्हता. त्या काळात जनतेवर आम्ही जो प्रयोग चालविला होता तो म्हणजे जनतेच्या रूपातील इतिहासावरच, इतिहासाच्या कच्च्या सामुग्रीवरचाच आमचा प्रयोग होता.''

'' ...... त्या काळात लोक आमचा उल्लेख **जनतेचा पक्ष** म्हणून करत असत. इतिहासातले इतरांना काय कळते ? इतिहासरूपी महासागरावरचे छोटे छोटे बुडबुडे नि बारीक सारीक लाटा व भोवरे यांच्यावाचून इतरांना त्यातील काहीही कळण्यासारखे नव्हते.

इतिहासातील सटरफटर आणि तकलादू बदलांच्या पलीकडे त्यांची बुध्दी कधी गेली नाही, आणि हे बदल सुध्दा त्यांना उलगडता आले नाहीत, ते नाहीच ! इतिहास खरा कशामुळे घडतो याची कारणे फक्त आम्हीच शोधून काढली. फक्त आम्हीच जनताजनार्दनाच्या अंतरंगाचा ठाव घेतला आणि जनता हीच इतिहासाचा खरा कच्चा माल आहे हे शोधून काढले. अनादीकाळापासून ही जनताच इतिहास घडवीत आली आहे. तिच्या सुस्तीचे यमनियम जसे आम्ही शोधून काढले तसेच तिच्या अणुरेणुंमधे घडून येणाऱ्या बदलांचे यमनियमदेखील आम्हीच शोधून काढले. एवढेच नव्हे तर कधी कधी एखाद्या ज्वालामुखीप्रमाणे हीच जनता भडकून उठते ती का व कशी त्याचेही यमनियम आम्हीच शोधून काढले होते. थोडक्यात इतिहासाच्या स्थितीगतीचे सिध्दांत आम्ही हुडकून काढले होते आणि तीच आमची महान शिकवणूक होती. फ्रेंच राज्यक्रांती घडवून आणणारे



अनुक्रमणिका

जाकोबिन्स हे फक्त नीतीशास्त्राचे पुरस्कर्ते असतील तर आम्ही वस्तुस्थितीचे पुरस्कर्ते होतो, व्यवहारवादाचे पुरस्कर्ते होतो. आम्ही केवळ गृहितकृत्यांच्या चौकटीतून इतिहासाच्या स्थितीगतीचा अभ्यास केला नाही. इतिहासाचा आदिम गाळ उपसून काढल्यानंतर इतिहासाच्या प्रगती, परागतीचे कायदे आमच्या हाती आले होते. मानवजातीसंबंधी जेवढे ज्ञान आजवर कोणी मिळवू शकला नाही तेवढे ज्ञान आम्ही जमा केले आणि म्हणूनच आमच्या हाती क्रांती यशस्वी झाली. दुर्दैवाने हे सगळे ज्ञान तुम्ही पुन्हा एकदा गाडून टाकले आहे ......"

(ऐव्हानॉव्ह) : "हं, चालू द्या, चालू द्या. काय बोलायचे ते बोलून टाक."

(रुवार्शोव्ह) : "सारे काही तुम्ही गाडून टाकले आहे. अगदी खोलवर गाडून टाकले आहे. तेव्हाची ती माणसे, त्यांनी जमा केलेले शहाणपण, त्यांची प्रज्ञा, त्यांच्या आशा सगळे सगळे तुम्ही पायदळी तुडविले आहे. 'आम्ही' ची कल्पनाच तुम्ही नष्ट केली आहे. तुम्ही 'आम्ही' या भावनेचाच खून केला आहे. जनता तुमच्या पाठिमागे आहे असा विश्वास तुम्हाला अद्यापीही वाटतो काय ? युरोपमधले इतर काही हुकूमशहा तुमच्याप्रमाणेच सांगत आहेत. अगदी तुमच्याच विश्वासाने सांगत आहेत."

"माझ्या दुष्टाचार्यपणाबद्दल मला क्षमा कर. पण लोकमत तुमच्या मागे आहे असे तुम्हाला खरोखरच वाटते काय ? देशातली जनता मुकाट्याने तुमचे म्हणणे ऐकून घेत आहे. ती उदासीन बनली आहे. तुमच्या सगळ्या गोष्टी ती सहन करते. या देशात ती तुमचे म्हणणे चालवून घेते. दुसऱ्या देशात दुसरे हुकूमशहा आहेत नि तेथे ती त्यांचे म्हणणे चालवून घेते.

पण याचा अर्थ तिला तुमच्याबद्दल आपलेपणा आहे असा करू नये. तुमच्याबद्दल जनतेच्या मनात सहानुभूतीचा लवलेशसुध्दा नाही. परत एकदा या देशातील जनता बहिरी आणि मुकी बनली आहे. **इतिहासातील** ही 'क्ष' नामक महान शक्ती पुन्हा एकदा मूक आणि बधिर बनली आहे. आपल्या पृष्ठभागावर विहार करणाऱ्या जहाजाच्या दैवगतीबद्दल अथांग सागर जसा उदासीन असतो तशी ही जनता तुम्हा लोकांच्या बाबतीत बनली आहे. सागरावरून जाणारे येणारे प्रत्येक प्रकाशकिरण सागराच्या पृष्ठभागावर प्रतिबिंबित होते. परंतु सागराच्या पोटात मात्र काळाकुट्ट अंधार आणि भयाण शांतता असते ही गोष्ट विसरू नका. खूप खूप दिवसांपूर्वी आम्ही हा जनसागर तळापासून ढवळून काढला होता. परंतु ते दिवस आता मागे पडले आहेत. सांगायचे झाल्यास असे म्हणता येईल की, त्या दिवसात आम्ही एक नवा इतिहास घडविला नी तुम्ही आज फक्त राजकारण करीत आहात. तुमच्यात आणि आमच्यात खरा फरक हा आहे.'

(ऐव्हानॉव्ह) : 'रुबाशॉव्ह, मला माफ कर. पण तुझे म्हणणे मला कळले नाही. थोडे अधिक स्पष्ट करून सांग.'

(रुबाशॉव्ह) : 'ठीक आहे, बीजगणित हे आळशांचे शास्त्र असे एका गणितशास्त्र्याचेच वचन आहे. तेव्हा मी तरी काय करणार ? तू म्हणतोस तर माझा मुद्दा अधिक स्पष्ट करतो. बीजगणितातल्या 'क्ष' ची किंमत अज्ञात असते हे तुला ठाऊकच आहे. पण हा 'क्ष' गृहित धरून आपण गणिताला सुरुवात करीत असतो. आमच्या दृष्टीने सगळी निनावी जनता हा तो 'क्ष' होता. हा 'क्ष' अमक्या प्रकारचा आहे असे गृहीत धरून आम्ही आमच्या गणिताला सुरुवात केली. याला इतिहास घडविणे म्हणतात. तुम्हाला 'क्ष' च्या खऱ्या स्वरूपाची फिकीर नव्हती. म्हणून हा 'क्ष' कसा आहे याचा विचार न करता तुम्ही गणित सुरू केले. यालाच मी तुम्ही जनतेच्या संबंधात राजकारण केले आहे असे म्हणत आहे. समीकरणातल्या 'क्ष' ची किंमत काय हे गृहित धरून जेव्हा कोणी काही करतो तेव्हा तो इतिहास घडवित असतो.'

(ऐव्हानॉव्ह) : 'छान, तू काहीतरी गंमतीदार बोललास. पण तुझे बोलणे भारीच तात्त्विक आणि अमूर्त स्वरूपाचे आहे. आपण थोडे जमिनीवर उतरू या. 'आम्ही' म्हणजे पक्ष आणि शासनातील लोक, सामान्य जनतेच्या हितसंबंधाचे प्रतिनिधित्व करीत नाही किंवा क्रांतीबद्दल बेफिकीर आहोत. हाच तुझ्या म्हणण्याचा मतितार्थ ना ! किंवा मानवजातीच्या प्रगतीमध्ये आम्हाला आस्था उरलेली नाही असेच तुला म्हणायचे आहे ना! माझ्या ध्यानात आले.'

(रुबाशॉव्ह) : 'बरोबर, या खेपेस तुला ते बरोबर समजलेले दिसते.'

यानंतर ऐव्हानॉव्ह रुबाशॉव्हला त्याच्या आयुष्यातील एक एक प्रकरण वाचून दाखवितो. ही सर्व प्रकरणे त्याने पक्ष आणि पक्ष कार्यावरच्या नि क्रांतीकार्यावरच्या प्रामाणिक निष्ठेतून आपल्या अंगावर घेऊन पार पाडली होती.

रुबाशॉव्ह चरित्रातील एक एक नोंद ऐव्हानॉव्ह त्याला वाचून दाखवतो.

'१९३३ साल. ज्या देशात आपल्या पक्षाची ताकद वाढत होती, संघटना मजबूत होत होती, त्याच देशात एकाएकी हुकूमशाही फैलावली. तेव्हा पक्षकार्यकर्त्यापैकी निरुपयोगी लोकांना पक्षातून काढून टाकण्यासाठी आणि पक्षाची नव्याने पुनर्घटना करण्यासाठी तुला गुप्तपणे त्या देशात पाठविण्यात आले ......'

'पुढे तीन महिन्यांनी तू पकडला गेलास. दोन वर्षे तुरुंगात राहिलास. या काळात

तुझे वर्तन पक्षाच्या दृष्टीने अगदी आदर्श होते. दोन वर्षानंतर तू सुटलास. तुझा मानसन्मान ......'

मधेच रुबाशॉव्हला स्वतःलाच ते प्रसंग आठवू लागतात. त्याला छोटा लोवी आठवतो .... त्याने तुळईला टांगून घेऊन आत्महत्या केली होती. संपाच्या संबंधात पक्षाने घेतलेल्या विचित्र भूमिकेचा तो बळी होता.

* * *

मध्यंतरी पक्षद्रोह करणारांवरच्या सार्वजनिक खटल्याना सुरुवात होते. त्यातील पहिल्या फेरीतील खटल्यातच रुबाशॉव्हचे कित्येक मित्र अडकतात किंवा अडकविले जातात. रुबाशॉव्हसुध्दा त्या बनावट खटल्यात अडकायचा. परंतु 'जीव बचावला तर क्रांतीचे कार्य कधी ना कधी पुढे रेटता येईल' हे क्रांतीच्या तत्त्वज्ञानातील मार्गदर्शक तत्त्व डोळ्यासमोर ठेऊन तो पकडलेल्यांचा जाहीर निषेध करतो आणि अशा प्रकारे नंबर एकवरची स्वतःची निष्ठा सिध्द करतो. सार्वजानिक खटल्यांच्या दुसऱ्या फेरीत रुबाशॉव्हची खाजगी चिटणीस आर्लोव्हा हिला अडकविण्यात येते. रुबाशॉव्ह कातडीबचावू निवेदन करतो. आर्लोव्हाला देहान्त शासन दिले जाते. यालाच उद्देशून ऐव्हानॉव्ह बोलत असतो.

(ऐव्हानॉव्ह) : 'राजकीय गुन्हेगारांचे खटले चालविण्याच्या आमच्या पध्दती दोन. एका पध्दतीला आम्ही 'अ' म्हणतो, दुसरीला 'ब' म्हणतो. 'अ' पध्दतीचे खटले म्हणजे सरकारी खात्यामार्फत चौकशी. 'ब' म्हणजे जाहीर चौकशी.' बहुतेक राजकीय खटले सरकारी खात्यामार्फत चालवले जातात. हे खटले सार्वजनिकरीत्या चालविले गेले असते तर त्यामुळे जनतेची दिशाभूल होईल म्हणून ते जाहीरपणे चालविण्यात येत नाहीत, असेही तो पुढे सांगतो. ऐव्हानॉव्हची इच्छा रुबाशॉव्हचा खटला जाहीर खटल्यांच्या वर्गात पडावा अशी असते. म्हणून तो त्याची चौकशी स्वतःपाशी ठेवू पाहतो व त्या दृष्टीने रुबाशॉव्हकडून एक विशिष्ट प्रकारचा कबुलीजबाब त्याला हवा असतो. रुबाशॉव्ह ते नाकारतो. येथे पहिली सुनावणी संपते.

## दुसरी सुनावणी :-

"चर्च अथवा धर्मसंस्थेचे खुद्द अस्तित्वच जेव्हा धोक्यात येते तेव्हा नीतीअनीतीचा विधिनिषेध पाळण्याचे बंधन धर्मसंस्थेवर राहात नाही. कारण त्या क्षणी आपापसातली दुही मोडून काढून दुहीच्या जागी एकी प्रस्थपित करणे हेच एकमेव पवित्र उद्दिष्ट असते. अशा प्रसंगी कसेही वागले तरी ते नैतिकदृष्ट्या क्षम्य असते किंवा एकी

साधण्यासाठी साधनशुचितेचा विवेक बाळगला नाही तरीही ते गर्ह्य ठरत नाही. मग ते साधन ढोंग करण्याचे असो, कोणाला कपटाने फसविण्याचे असो, कोणाशी दगलबाजी करण्याचे असो, हिंसाचाराचे असो, पैसे घेऊन धार्मिक पदांची विक्री करणारे असो, तुरुंग, फाशी, खून व अन्य कसल्याही प्रकारचे उद्दिष्ट पवित्र असल्याने साधन सुध्दा पवित्र बनते. सुव्यवस्थेवाचून समाज टिकत नाही. सुव्यवस्था प्रस्थापित करण्यासाठी व्यक्तीचा वा व्यक्तीच्या खाजगी हिताचा बळी द्यावा लागला तरी त्यात अधर्म्य काहीही नाही.''

— डिट्रिश फॉं नैहेम —

व्हर्देनचा बिशप (दी शिश्माते लिब्री - ३ इ. स. १४११)

दुसरी सुनावणी या प्रकरणाची सुरुवात वरील अवतरणाने सुरू होते. या अवतरणातून कोस्सलर यांना **'क्लोज्ड सिस्टिम्सच्या'** तात्त्विक भूमिकेवर भाष्य करायचे आहे. चर्च किंवा धार्मिक संस्था किंवा कम्युनिस्ट पक्षासारखे पक्ष या सगळ्या बंदिस्त व्यवस्था आहेत. कोठल्याही बंदिस्त व्यवस्थांची वागण्याची एक विशिष्ट पध्दती असते. एकदा का कोणी या व्यवस्थांच्या परिघात प्रवेश केला की मग त्याला स्वतःचे तर्कशास्त्र वापरता येत नाही. त्याला त्या व्यवस्थेचे तर्कशास्त्र वापरावे लागते. अपरिहार्यपणे हे तर्कशास्त्र अत्यंत निर्घृण असते. कारण प्रत्येक बंदिस्त तत्त्वव्यवस्था तिच्या स्वतःच्या गृहीतकृत्यांनुसार चालत असते. या गृहीतकृत्यांची सत्यासत्यता हा चर्चेचा वा चौकशीचा विषय होऊ शकत नाही. तो अंधश्रध्देचा भाग असतो. या गृहीतकृत्यांना आव्हान देता येत नाही. त्यांची तार्किक तपासणी करता येत नाही. त्यांच्या खरेपणाची शंका घेता येत नाही. ही गृहीतकृत्ये तत्त्वतःच तेथे खरी मानावी लागतात. दुसरी गोष्ट, बंदिस्त तत्त्वव्यूह वा अन्य व्यवस्था या त्या व्यवस्थेसाठी व्यवस्था म्हणून महत्त्वाच्या असतात. निदान त्या व्यवस्थांच्या अनुयायांसाठी तरी. व्यवस्थेसाठी व्यवस्था मोठी मानली गेल्याने व्यवस्था टिकणे वा टिकवून ठेवणे हे सभासद घटकांचे एकमेव महत्कार्य ठरते आणि व्यवस्था टिकवून धरण्यासाठी व्यक्तीचा बळी देण्याला व्यवस्थेच्या मुख्यांचा विरोध नसतो. बंदिस्त व्यवस्थांचे पुरस्कर्ते सांगतात की, व्यवस्था हेच अंतिम वास्तव, व्यवस्थेपुढे व्यक्तीला स्वतंत्र अस्तित्व नाही. व्यवस्था टिकवून ठेवण्यासाठी नीती अनीती , योग्यायोग्य, सूक्तासूक्त यांचा विधिनिषेध बाळगण्याचे कारण नाही. इतिहासात फक्त 'आम्ही' लाच खरे अस्तित्व आहे. 'मी' ला नाही. दैनंदिन व्यवहारात वापरले जाणारे 'मी' हे सर्वनाम केवळ वंचना आहे. व्याकरणाच्या विकृत कायद्यांमधून उत्पन्न होणारी वंचना. एक गफलत. एक काल्पनिक वस्तू. माणसे स्वतःचा उल्लेख 'मी' या सर्वनामाने करतात. पण ज्या व्याकरणाच्या सवयीमुळे हा उल्लेख ती करतात ते व्याकरणच जर अस्तित्वात नसते तर हा उल्लेख होऊ शकला नसता. असे या चिरेबंदी व्यवस्थांच्या पुरस्कर्त्यांचे म्हणणे आहे.



अनुक्रमणिका

चिरेबंदी व्यवस्थांच्या प्रवर्तकांना आणि पुरस्कर्त्यांना समूहाचा उद्धार करताना काही व्यक्तींचा बळी द्यावा लागला तर ते त्याना विचारात घेण्याच्या लायकीचे वाटत नाही. व्यक्ती एकत्र येतात तेव्हा समूह तयार होतो हे सत्य बंदिस्त व्यवस्थांचे प्रवर्तक विचारात घेऊ इच्छित नाहीत. हे सर्वजण मनुष्यजातीचा विचार करताना अमूर्त संकल्पनांच्या पातळीवर विचार करतात. समूहाच्या उद्धाराचा संबंध अखेरीस व्यक्तीच्या उद्धाराशी पोहोचतो ही गोष्ट त्याना महत्त्वाची वाटत नाही किंवा महत्त्वाची वाटली तरी तिच्याकडे ते दुर्लक्ष करतात आणि समूहाच्या तथकथित उद्धारासाठी व्यक्तीचा बळी द्यावयास मागेपुढे पाहात नाहीत. असो. तर पहिल्या सुनावणीतल्या चर्चेमध्ये क्रांती, क्रांतीमधील जनतेचे महत्त्व आणि कार्य, निर्दयता आणि सदयता या दोन मनोविकारातील ताण इत्यादी गोष्टींची चर्चा आली आहे. तर दुसऱ्या सुनावणीमध्ये चिरेबंदी व्यवस्थांचे अंतर्गत तर्कशास्त्र, या तर्कशास्त्रामधे अडकलेल्यांचे वर्तन आदि मुद्यांचा परामर्ष घेतला गेला आहे.

दुसरी सुनावणी या प्रकरणाची सुरुवात रुबाशॉव्हच्या रोजनिशीतल्या उताऱ्याने झाली आहे.

'अंतिम सत्य हे खरोखर सत्य ठरेपर्यंत नेहमीच असत्यामधे मोडते. शेवटी जो कुणी बरोबर ठरणार असतो तो तसा बरोबर ठरेपर्यंत नेहमीच चूक आणि उपद्रवी वाटत असतो.

'अखेरीस कोणाचे बरोबर आणि कोणाचे चूक हे केव्हा ठरणार असते ? कार्याच्या प्रारंभी नव्हे तर कार्याच्या शेवटी होय. अशा वेळी कार्याला प्रारंभ करावा लागतो. अशा आशेवर की पुढे कधीतरी इतिहास न्याय करील, आपल्या बाजूने कौल देईल नि मग आम्ही आमचा आत्मा सैतानाकडून सोडवून घेऊ.'

नं. १ – 'माकियावेलीच्या 'द प्रिन्स' या राज्यशास्त्रावरच्या ग्रंथाची प्रत कायम आपल्या उशाशी ठेवतो अशी वंदंता आहे. हे जर का खरे असेल, तर ते योग्यच म्हणावे लागेल. कारण माकियावेलीच्या या ग्रंथानंतर राजकीय नीतीशास्त्रावर कोणीच काही नाव घेण्यासारखे बोललेला नाही. एकोणिसाव्या शतकातील उदारमतवादी तत्त्ववेत्त्यानी याच विषयावर थोडे भाष्य केले आहे. पण ते मनावर घेण्यासारखे नाही. उदारमतवादी म्हणतात की, 'स्वतःचे म्हणणे पटवून देण्याची सर्व राजकीय पक्षांना समान संधी मिळाली पाहिजे. ज्या पक्षाचे म्हणणे जनतेला पटले त्या पक्षाच्या मागे जनता जाईल.' येथेही शेवटी आमचेच म्हणणे खरे ठरले. राजकारण म्हणजे क्रिकेटचा खेळ नव्हे. जेव्हा सर्वत्र आबादीआबाद असते तेव्हा उदारमतवादी उपदेश ठीक आहे. परंतु आणीबाणीच्या काळात या उपदेशाचा उपयोग नाही. साहजिकच येथे सुद्धा आम्हीच बाजी मारली. उदारमतवाद्यांचे



अनुक्रमणिका

एकोणिसाव्या शतकातील भोंगळ राजकीय आचारशास्त्र बाजूला सारून त्या जागी विसाव्या शतकाचे क्रांतीचे खणखणीत नैतिक आचारशास्त्र प्रस्थपित करण्याचे कार्यसुध्दा आम्हीच पार पाडले. इतिहासाला जेव्हा कलाटणी मिळण्याचा काळ असतो तेव्हा साध्य महत्त्वाचे, साधन बिनमहत्त्वाचे अशी परिस्थिती असते. अशा प्रसंगी साध्याकडे ध्यान द्या, साधन कोणते का असेना, साधनाच्या सूक्तासूक्ततेची फिकीर करण्याचे कारण नाही हाच सनातन नियम खरा असतो. विसाव्या शतकासाठी माकियावेलीवादाचा नवा अवतार आम्हीच प्रथम प्रसृत केला. इतरांनी, म्हणजे प्रतिक्रांतीवाद्यांनी किंवा हुकूमशहांनी आमची फक्त निर्बुद्ध नक्कल केली. सार्वत्रिक बुद्धिवादाच्या नावाने आम्ही आमच्या नव-मॅकियावेलीवादाचा पुकारा केला होता. आमचे महात्म्य त्यात होते. इतरांनी रोमँटिक राष्ट्रवादाच्या नावाने नवमॅकियावेलीवादाचा पुकारा केला होता आणि त्यांची कालबाह्यता त्यात होती. शेवटी इतिहास आम्हाला क्षमा करील नी सगळ्या पापांपासून सुटका करील असे मी म्हणत आहे त्याचे रहस्य यात आहे. तसेच इतिहास आमच्या प्रतिस्पर्ध्यांना क्षमा करणार नाही याचेही रहस्य यातच आहे....

असे आहे तरी आमचे राजकारण म्हणजे आमच्या उक्ती आणि आमच्या कृती, वर ज्याचा निर्देश केला त्या उधारीवरच चालू आहेत. सगळे नैतिक संकेत आम्ही कचऱ्याच्या टोपलीत फेकून दिले आहेत. एकोणिसाव्या शतकातील उदारमतवादी तत्त्ववेत्त्यांचा क्रिकेटच्या खेळातील नियमांवर बसवलेला राजकारणाचा साचा आम्हाला हास्यास्पद वाटतो. म्हणून तोही आम्ही कचऱ्याच्या टोपलीत फेकून दिला आहे. तेव्हा आजतरी भावी परिणामांच्या अंदाजावर विसंबून जे तर्कशास्त्र आम्ही जवळ केले आहे तेच आमचे मार्गदर्शक तत्त्व आहे. आमच्या बौद्धिक भूमिकेचे परिणाम शेवटी काय होऊ शकतील याचा तर्काच्या अंतिम टोकापर्यंत जाऊन अंदाज करणे व त्याप्रमाणे आपला कार्यक्रम आखणे हेच आजतरी आमचे एकमेव कर्तव्य बनले आहे. आमचे गलबत रिकामे आहे. गलबतात भरवाण अजिबात नाही. म्हणून सुकाणूवरचा दाब कमी झाला किंवा जास्ती झाला तर आमच्या जीवावर बेतणार आहे.

'काही दिवसांपूर्वी आमच्या देशातील 'ब' या आघाडीच्या शेतकी तज्ज्ञाला आणि त्याच्याबरोबर त्याच्या तीस सहकाऱ्यांना गोळी घालून ठार करण्यात आले. नायट्रेटपासून तयार केलेले कृत्रिम खत हे पोटॅशपासून तयार केलेल्या खतापेक्षा अधिक चांगले असते असे 'ब' व त्याच्या सहकाऱ्यांचे म्हणणे होते. उलट नं. १ च्या मताने पोटॅश हे सर्वात उत्तम खत होते. त्यामुळे देशद्रोही म्हणून 'ब' व त्याच्या तीस सहकाऱ्यांना संपविण्यावाचून गत्यंतर नव्हते. हे प्रकरण सार्वजनिक वादाचा विषय होऊ दिले असते तर जनतेचा बुद्धिभेद झाला असता. जनतेच्या डोक्यात गोंधळ माजला असता व

क्रांतीकार्यात अडथळा आला असता. जेथे शेतीचे राष्ट्रीयीकरण करण्यात आले आहे तेथे असल्या विषयाला प्रचंड महत्त्व असते. कोणी सांगावे उद्या नवे जागतिक युध्द उद्‌भवेल आणि त्यात आम्ही जिंकणार की हरणार हे कृत्रिम खताच्या प्रश्नावर ठरेल. समजा नायट्रेटपासून तयार केलेले खत कमी प्रतीचे निघाले तर तेव्हा काय करायचे ? खताच्या बाबतीत नं. १ चे मत बरोबर ठरले तर इतिहास त्याला दोषमुक्त करणार आहे नि मग त्या एकतीसजणांची हत्या ही एक सामान्य गोष्ट ठरेल. परंतु नं. १ जर चूक असला तर .......

'आमच्याकडे क्रिकेट खेळातल्या नैतिक कल्पना चालत नाहीत. आम्ही वस्तुनिष्ठ दृष्टीने वागतो. प्रत्यक्ष परिणामाच्या बाबतीत बरोबर कोण आणि चूक कोण एवढ्याच गोष्टीला आम्ही महत्त्व देतो. क्रिकेट खेळातली नीतीतत्वे मानणाऱ्यांच्या दृष्टीने वेगळयाच मुद्याला महत्त्व असते. त्यांचे म्हणणे 'ब' ने जेव्हा नायट्रेट खताची शिफारस केली तेव्हा ती शिफारस तो प्रामाणिकपणाने करीत होता की अप्रमाणिकपणाने हा महत्त्वाचा प्रश्न आहे. 'ब' ने जर का प्रामाणिकपणाने नायट्रेट खताची शिफारस केली असली नि त्याचा अंदाज चुकला तर त्यांच्यामते 'ब' दोषी नाही. कारण 'ब' ची ती प्रामाणिक समजूत होती. जर त्याने लबाडी करण्यासाठी नायट्रेट खताची शिफारस केली असेल तर 'ब' ला गोळी घालून ठार करावयास त्यांचा विरोध नाही. मग समजा कालांतराने असे सिद्ध झाले की, नायट्रेट खतच पोटॅश खतापेक्षा चांगले आहे तरी त्याना 'ब' मेला हे चूक वाटणार नाही. त्याना फक्त 'ब' च्या प्रामाणिकपणाशी कर्तव्य असते. 'ब' ला प्रामाणिकपणे जर वाटत असेल की अमके खत चांगले नि तमके वाईट, तर त्याचे चुकत असले तरी त्याला शिक्षा होता कामा नये. उलट त्याला त्याच्या मताचा प्रचार करण्याची संधी दिली गेली पाहिजे. मग भले त्याच्यामुळे त्याच्या देशाचे किती का नुकसान होईना. ते विचारात घेण्याचे कारण नाही. समजा उद्या नायट्रेट खत शेतीला हानीकारक आहे असे ठरले नि देशाचे अपरिमित नुकसान झाले तरी उदारमतवादी नीतीशास्त्रवाल्यांना ते महत्त्वाचे वाटणार नाही.

'आमच्या दृष्टीने हा सगळा मामला मूर्खपणाचा आहे. तुमच्या अंतस्थ हेतूशी आम्हाला कर्तव्य नाही. तुमचे हेतू चांगले आहेत पण तुमचे कृत्य हानीकारक ठरत असेल तर तुम्हाला गोळी घालून ठार केलेच पाहिजे असे आम्ही म्हणतो. ज्याचे चुकले त्याला चुकीची किंमत द्यावीच लागेल. ज्याचे बरोबर असेल त्याला इतिहास दोषमुक्त करणारच आहे. हा ऐतिहासिक उधारीचा कायदा असून आम्ही फक्त एवढाच एक कायदा ओळखतो. कारण तो आमचा कायदा आहे, आम्ही केलेला कायदा आहे.

'अनेकदा खऱ्या गोष्टीपेक्षा भूलथापांमुळे इतिहासाची सेवा अधिक चांगल्याप्रकारे

होत असते. खुद्द इतिहासानेच आम्हाला हे शिकविले आहे. कारण मनुष्य हा एक अती आळशी प्राणी आहे. मोझेसप्रमाणे आश्वासित स्वर्गाकडे घेऊन जाण्यापूर्वी प्रथम त्याला चाळीस वर्षे रखरखीत वाळवंटातून फिरवावे लागते. चाळीस वर्षे वाळवंटातून तो चालला म्हणजे कुठे विकासाचे त्याचे पहिले पाऊल पुढे पडते. याचा अर्थ असा की, त्याच्या विकासाचे एक पाऊल पुढे पडायचे असेल तर चाळीस वर्षे वाळवंटात त्याला फिरवावे लागेल. तरच तो पाऊल पुढे टाकील. भीती आणि आशा किंवा शिक्षेचा धाक आणि बक्षिसाची लालूच दाखवूनच त्याला प्रगतीला जुंपावे लागते. एवढेच नव्हे तर बऱ्याचदा खोटी भीती आणि बक्षिसाची खोटी लालूच याच दोन क्लुप्त्यांच्या जोरावर त्याला पुढे हाकलत नेता येते. जर का तसे केले नाही तर तो वाटेतच अडून बसेल नि करमणूक म्हणून (मोझेसबरोबर इजिप्तमधून आश्वासित स्वर्गाच्या शोधासाठी बाहेर पडलेलया ज्यू जमातीप्रमाणे) कामधेनूच्या सोन्याच्या मूर्तीच्या मागे वेळ फुकट घालवील.

'इतिहासाचा आमच्याइतका कसून अभ्यास कोणीच केला नसेल. इतिहासाचा अभ्यास करणारे इतर आणि आम्ही यांच्यात फरक हा आहे की इतरांपेक्षा आम्ही तार्किक विचारांमधे अधिक सुसंगत आहोत. तर्कशुध्द विचार हेच आमचे महत्त्वाचे लक्षण आहे. सद्वर्तनाची इतिहासाला फारशी कदर नाही आणि अपराध व गुन्ह्यांना शिक्षा झाली नाही तरी इतिहास त्याची फिकीर करत नाही हे आम्ही पाहिले आहे. परंतु गफलतीचे परिणाम झाल्यावाचून राहात नाहीत आणि थेट सातव्या पिढीपर्यंत चुकीचे परिणाम सहन करावे लागतात हे आम्हाला माहीत आहे. म्हणूनच आम्ही चुका होऊ देत नाही. चुका टाळण्यासाठी आम्ही त्यांच्या मुळावरच घाव घालतो. मानवजातीच्या उद्यावर इतका प्रचंड अधिकार आणि इतकी प्रचंड सत्ता, इतक्या थोड्या लोकांच्या हातात आजवर कधीच एकवटली नव्हती. म्हणून आम्ही असे मानतो की चुकीच्या कल्पनेचा एकएक पुरस्कार हा भावी पिढ्यांविरुध्दचा एकएक गुन्हाच आहे. साहजिकच गुन्हेगारीसाठी अन्य लोक ज्याप्रमाणे गुन्हेगाराला देहान्ताची शिक्षा देतात त्याप्रमाणेच चुकीच्या कल्पनांसाठी आम्ही सुद्धा असल्या लोकांना देहान्ताची शिक्षा देतो. प्रत्येक बाबतीत आम्ही तर्काचे अंतिम टोक गाठतो नि त्याप्रमाणे वर्तन करतो म्हणून जग आमची गणना माथेफिरूंमधे करू पाहाते. आम्हाला वेडे पीर म्हणते. वैयक्तिक सुखाला महत्त्व देणारी आजची जीवनपध्दती नष्ट करून तिच्या जागी सामुदायिक सुखाची काळजी घेणारी नवी जीवनपध्दती प्रस्थापित करण्याचे व्रत आम्ही आमच्या अंगावर घेतले आहे म्हणून आमची तुलना पाखंड्याना धार्मिक कारणांसाठी जिवंत जाळून मारण्याची शिक्षा देणाऱ्या मध्ययुगीन रोमन कॅथलिक चर्चमधल्या निवाडा-मंडळाशी जग करते. रोमन कॅथलिक पंथाच्या निवाडा-मंडळाशी आमचे साम्य आहे ही गोष्ट आम्ही कबूल करतो. परंतु आम्ही जेव्हा एखाद्याची पाठ घेतो तेव्हा त्याच्या दुष्कृत्यासाठी तसे करीत नाही. तर त्याच्या डोक्यात येणाऱ्या विषारी



अनुक्रमणिका

विचारांसाठी आम्ही त्याची पाठ घेतो, नि त्याचा छळ करतो. आमच्या तत्त्वाप्रमाणे जगात खाजगी काही असूच शकत नाही. सर्व गोष्टी सामुदायिक आहेत. माणसांच्या डोक्यात येणारे विचारदेखील खाजगी नाहीत असे आमचे मत होते. प्रत्येक गोष्ट तर्काच्या अंतिम टोकापर्यंत नेऊन सोडायची या वेडाने आम्ही इतके काही वेडे झालो होतो की, विरुध्द दिशानी प्रवास करणाऱ्या दोन छोट्या विचारांची जरी टक्कर आमच्याकडे झाली तरी शॉर्ट सर्किट होऊन आमच्या तळावर आग लागत होती. सारांश, आपापसात झगडून नाश पावणे हेच आमच्या नशिबी लिहिले होते.

'मी स्वतः त्यांचपैकी एक होतो. तर्काच्या गरजेप्रमाणे मी विचार करीत असे आणि तर्काने सांगितल्याप्रमाणे वागत असे आणि असे वागतानाच ज्यांच्याबद्दल मला आत्मियता होती त्यांचा मी नाश घडवून आणला आणि ज्यांच्याबद्दल माझ्या मनात रोष होता, जे मला आवडत नव्हते त्यांच्या हाती मी सत्ता नेऊन दिली. इतिहासाने माझ्या लायकीप्रमाणे नेमक्या जागी मला आणून ठेवले आहे. उधारीची जेवढी माझी पत होती तेवढी मी वापरली आहे. जे काही मी केले ते जर का बरोबर ठरले तर मला पश्चाताप करावा लागणार नाही, उलट जर का ते चुकीचे ठरले तर माझ्या चुकीचे प्रायाश्चित मला भोगावे लागेल, नि मी ते भोगणार आहे.

'परंतु भविष्यात काय खरे ठरेल नि काय खरे ठरणार नाही हे आताच समजण्यासारखे नाही. पूर्वीच्या काळी जे काम प्रेषित करीत होते तेच काम आज आम्ही करीत आहोत. त्यांच्यात आणि आमच्यात फरक एवढाच की पुढे काय घडणार आहे हे त्यांच्या दिव्य दृष्टीला आधीच दिसत असे, आम्हाला ते दिसत नाही. आमच्यापाशी त्यांची दिव्यदृष्टी नाही. दिव्यदृष्टीऐवजी आम्ही तार्किक दृष्टीवर भरवसा ठेवतो. तर्कावर विश्वास ठेऊन आम्ही आमच्या योजना राबवतो. तथापि यात एक घोटाळा झाला होता. आम्ही सर्वांनी जरी समान धाग्यापासून स्वतःच्या विचाराला सुरुवात केली होती तरी प्रत्येकाचे अंतिम तात्पर्य वेगवेगळे येत होते. एकाचा पुरावा दुसऱ्याच्या पुराव्याला छेद देत होता. एकाचा निष्कर्ष दुसऱ्याच्या निष्कर्षाला खोडून टाकीत होता. शेवटी आम्ही श्रद्धेवर येऊन ठेपलो आणि स्वतःचा, स्वतःच्या बुद्धीचा भरवसा धरायचे ठरविले. आमची बुद्धी सांगेल ते खरे असे आम्ही ठरविले. भूमितीच्या शास्त्राप्रमाणे. भूमितीशास्त्राचा सगळा डोलारा गृहीतकृत्यांवरच्या विश्वासावर आहे. ही गृहीतकृत्ये वादातीतपणे खरी मानलेली असतात. त्यांच्या खरेपणाची कोणी शंका घ्यायची नसते. आम्ही सुध्दा स्वतःच्या बुद्धीच्या खरेपणाची शंका घ्यायची नाही असे ठरविले. आम्हा लोकांच्या आयुष्यातला तो एक मोठा आणीबाणीचा क्षण होता. एका क्षणात आम्ही आमच्यापासचे सगळे बौध्दिक भरवाण खाली फेकून दिले होते आणि फक्त स्वतःवरच्या विश्वासावरच पुढे निघालो होतो. फक्त एका

सुकाणूवर आमचे तारू आम्ही हाकीत होतो. स्वतःवरच्या विश्वासाच्या सुकाणूवर. स्वतःच्या शहाणपणावरचा विश्वास एवढे एक सुकाणू आमच्यापाशी आता उरले होते. पण आम्ही सर्व लोक एक गोष्ट विसरत होतो. भूमिती ही मानवी बुद्धीची सर्वोच्च करामत खरी. परंतु ज्या गृहीतकृत्यांवर भूमितीची इमारत उभी आहे ती गृहीतकृत्ये बुद्धीच्या मदतीने सिद्ध करता येत नाहीत, ती स्वयंसिद्ध असतात. जो गृहीतकृत्यांच्या खरेपणावर विश्वास ठेवीत नाही, त्याच्या गणिताची इमारत त्याच्या स्वतःच्या डोळ्यादेखत खाली कोसळून जमिनदोस्त होते.

'नंबर एकची स्वतःच्या बुद्धीवर अढळ श्रद्धा आहे. आपण कधी चूक करणार नाही असे त्याला ठामपणे वाटते. स्वतःवरची, स्वतःच्या शहाणपणावरची चिवट, दुर्दम्य, अढळ श्रध्दा हीच त्याची सर्वात मोठी करामत होय. त्याच्या सुकाणूचा दोरखंड आजही भक्कम आहे. गेल्या काही वर्षात माझ्याचा दोरखंड झिजला आहे, पातळ झाला आहे, तुटावयास आला आहे .......'

'खरी गोष्ट अशी आहे की मी चुका करणार नाही या माझ्या समजुतीवरचाच माझा विश्वास उडाला आहे नि तेथेच मी मार खात आहे.

* * *

रुबाशॉव्हची पहिली सुनावणी आटोपली. ऐव्हानॉव्ह आणि त्याचा ग्लेटकिन नावाचा सहकारी रुबाशॉव्ह केसबद्दल बोलत असतात.

(ग्लेटकिन) : 'आता रुबाशॉव्हचे काय करायचे ?'

(ऐव्हॉनॉव्ह) : 'त्याचे डोकेठिकाणावर दिसत नाही. त्याची बुध्दी कमी झालेली नाही. पूर्वीइतक्याच तर्कशुध्द पध्दतीने तो विचार करतो. मुद्दा हा की तो शेवटी शरण येणार आहे.

(ग्लेटकिन) : ' मला तसे वाटत नाही.'

(ऐव्हानॉव्ह) : ' तो शरण येणार आणि आम्हाला हवा तो कबुलीजबाबही लिहून देणाार. एकदा का प्रत्येक गोष्टीचा त्याने तर्कशुध्द पध्दतीने विचार केला की त्याचे त्याला पटले की आपण कबुलीजबाब द्यावयास हवा नि तो कबुलीजबाब देईल. तेव्हा तू त्याला त्रास देऊ नकोस. त्याला शांतपणाने विचार करू दे. मी त्याला कागद, पेन्सिली आणि सिगारेटी देण्याची व्यवस्था केली आहे. त्यामुळे त्याची विचारशक्ती अगदी जोमात काम करू लागेल.



अनुक्रमणिका

(ग्लेटकिन) : 'मला हे पटत नाही'

(ऐव्हानॉव्ह) : 'तुला तो आवडत नाही म्हणून तू असे बोलत आहेस.' ..... जेव्हा कधी रुबाशॉव्ह गुन्हा कदूल करील तेव्हा घाबरल्यामुळे त्याने तसे केलेले नसेल. तर प्राप्त परिस्थितीत गुन्हा कबूल करणे हीच एक त्यातल्या त्यात उत्तम गोष्ट आहे हे त्याच्या तार्किक बुद्धिला पटल्याने त्याने ते केलेले असेल हे पक्के लक्षात ठेव. रुबाशॉव्ह हा भेकड नाही. मारझोडीने तो वळणार नाही. त्याचा छळ करून काहीही साधणार नाही. तुम्ही त्याचा जितका जास्त छळ कराल तितका तो अधिक हट्टी बनेल.'

(ग्लेटकिन) : 'असल्या बोलण्यात काहीही अर्थ नाही. छळापुढे न वाकणारी माणसे जन्माला यायची आहेत. निदान मी तरी आजवर असा कोणी पाहिलेला नाही.'

(ऐव्हानॉव्ह) : ' .... हा तर्क तू कशावरून काढलास ? क्रांतीनंतरची पहिली काही वर्षे तरी कैद्यांचा छळ केला जात नव्हता. त्यावेळी आपल्या डोक्यात मनुष्यप्राण्याच्या भलेपणाबद्दल अनेक भ्रम होते. शरीरिक शिक्षेचे उच्चाटण, गुन्ह्याची शिक्षेच्या रूपातील भरपाई बंद, कैद्यांसाठी सुधारगृहे, आरोग्यमंदिरे, कैद्यांच्या करमणुकीसाठी फुलबागा, अशा अनेक कल्पना आमच्या डोक्यात तेव्हा होत्या. पण तो सगळा मूर्खपणा होता हे आज पटते.'

(ग्लेटकिन) : 'मला तो मूर्खपणा वाटत नाही. तू तर तुच्छतावादी बनला आहेस. आणखी शंभर वर्षे उलटली म्हणजे हे सर्व प्रत्यक्षात येणार आहे. परंतु प्रथम जे आहे ते सर्व संपवले पाहिजे. त्यामुळे जितक्या लवकर हे सर्व आटोपेल तितके चांगले. शारीरिक शिक्षेची उचलबांगडी, कैद्यांना सुधारगृहे इत्यादी करण्याची वेळ आताच आली आहे असे जे तुम्ही समजत होता तो मात्र भ्रम होता. जेव्हा माझी येथे नेमणूक झाली तेव्हा माझ्याही डोक्यात तुमच्यासारख्याच खुळ्या कल्पना होत्या. त्या काळात फुलबागांपासून सगळ्या गोष्टींना प्रारंभ करावा असे आम्हालासुध्दा वाटत होते. पण ती आमची चूक होती. आणखी शंभर वर्षे उलटली म्हणजे हे सर्व करता येईल. गुन्हेगाराच्या विवेकवुध्दीला आवाहन करून तू चांगले वाग असे त्याला सांगता येईल. त्याला त्याच्या सामाजिक वुध्दीची आठवण देऊन भलेपणाने वाग असे म्हणता येईल. परंतु चालू घटकेला त्यापैकी काहीही प्रत्यक्षात येणार नाही. आज छळ हाच एकमेव खात्रीचा उपाय आहे. आज त्याला मारझोड करून किंवा त्याचा मानसिक छळ करूनच त्याला वठणीवर आणावे लागेल. वेळ आली तर त्याला ठार सुध्दा करावे लागेल.

■ ■ ■



अनुक्रमणिका

ऐव्हानॉव्हमुळे रुबाशॉव्हला लिहिण्यासाठी कागद, साबण, पेन्सिल, टॉवेल वगैरे विकत घेण्याची सवलत मिळाली. ही सवलत मिळताच आपला गतेतिहास लिहून काढण्याचे काम रुबाशॉव्ह सुरू करतो. तसे करून त्याला त्याचा भूतकाळ आणि त्याचा भविष्यकाळ जे कोणी जिवंत होते आणि जे कोणी मेले होते त्या सर्वांची सांगड घालायची होती आणि त्याच्याकरिता त्याला आपल्या विचारांचा तार्किक शेवट गाठायचा होता. हे दहा दिवस ऐव्हानॉव्हने त्याची चौकशी थांबवली होती.

आपली आपल्याला पूर्ण ओळख आहे असे तोवर रुबाशॉव्हला वाटत होते. नैतिक पूर्वग्रह त्याच्यामधे अजिबात नव्हते. त्यामुळे लोक ज्या 'मी' ला प्रथमपुरुषी एकवचनी सर्वनामाला साधारणपणे बिचकतात तो 'मी' त्याच्या डोक्यात अजिबात नव्हता. रुबाशॉव्ह असे धरून चालला होता की माणसे स्वार्थी आणि खोट्या अहंकाराने पछाडलेली असतात आणि या खोट्या अहंकारामुळे व स्वार्थामुळे त्याना आपण कोणीतरी विशिष्ट, इतरांपेक्षा स्वतंत्र असा 'मी' आहोत असे वाटत असते. हा खोटा अहंकार जर का त्यांनी टाकून दिला तर त्यांनासुध्दा स्वतःचा उल्लेख 'मी' या प्रथमपुरुषी एकवचनाने करण्याची गरज राहणार नाही. परंतु आज तुरुंगाच्या कोठडीच्या खिडकीला ओठंगून तो उभा असताना एक विचित्र गोष्ट घडली. त्याला असे जाणवू लागले की, स्वतःबरोबरच्या ज्या संवादाला लोक 'स्वगत भाषण' किंवा 'एकपात्री संवाद' म्हणतात तो खरे पाहाता एकपात्री संवाद नसतो. तर त्या संवादात दोन पात्रे असतात आणि त्या दोन पात्रांपैकी एक पात्र एकही शब्द न बोलता गुपचूप उभे असते नि दुसरे पात्र व्याकरणाचे सगळे नियम खुंटीला टांगून ठेवून त्या दुसऱ्या पात्राला 'तू' ने संबोधण्याऐवजी 'मी' ने संबोधत असते. या दुसऱ्या पात्राला त्या 'मी' च्या अंतरंगात प्रवेश करायचा असतो, त्याचा विश्वास काबीज करून त्याचे खरे हेतू समजावून घ्यायचे असतात. परंतु ते मुकं पात्र मात्र गप्पच राहाते आणि लक्ष टाळण्याचा प्रयत्न करते. एवढेच नव्हे तर स्थल आणि काळाच्या मितीमधेही हा मी स्वतःला अडकून घेत नाही.

पुढे रुबाशॉव्हला असे आढळून येते की, हा विचित्र प्रकारचा एकपात्री संवाद जेव्हा स्वतःच स्वतःशी आपण करीत असतो तेव्हा नेहमीच्या संवादाप्रमाणे आपले ओठसुध्दा हालतात. म्हणजे हा 'मी' हे विसविशीत वा पोकळ असे काही नसून तेथे काहीतरी खरेखरीचे व भरीव आहे. एका शब्दात रुबाशॉव्हला त्याच्या अनुभवावरून पटते की या 'मी' चे दोन भाग असून त्यातील एक भाग आज इतकी वर्षे मौन पाळून होता आणि आता त्याने बोलावयास सुरुवात केली आहे.

एव्हाना रुबाशॉव्ह स्वतःच्या मनाशी ठरवतो की आपण स्वखुषीचा

कदुलीजबाब द्यायचा नाही. ऐव्हानॉव्हची ती सूचना चुकीची आहे. साहजिकच आपल्या आयुष्याचे आता फार थोडे दिवस उरले हे रुबाशॉव्हच्या ध्यानात येते.

आता रुबाशॉव्हला ऐव्हानॉव्हच्या व्यक्तित्वाबद्दल कुतूहल वाटू लागते. त्याच्याशी बोलता बोलता ऐव्हानॉव्ह त्याला म्हणाला होता की, दैवाचे फासे उलटे फिरले असते तर ऐव्हानॉव्हच्या जागी रुबाशॉव्ह नि रुबाशॉव्हच्या जागी ऐव्हानॉव्ह दिसला असता. रुबाशॉव्ह मग त्याच उद्‌गारांचा विचार करू लागतो. त्याला पटते, ते जणू काही जुळे भाऊ आहेत. एकाच मातेच्या उदरातून ते जन्मले नव्हते. परंतु दोघांच्याही तात्त्विक श्रध्दा समान होत्या. नीतीअनीतीच्या त्यांच्या कल्पनाही समान होत्या. समान बौध्दिक कोटीक्रमांमध्ये ते विचार करीत होते. कारण अगदी संस्कारक्षम वयातच त्यांनी कम्युनिस्ट पक्षात प्रवेश केला होता नि त्याच पक्षाने त्यांना घडविले होते. त्यामुळे ऐव्हानॉव्हची जागा रुबाशॉव्हने आणि रुबाशॉव्हची ऐव्हानॉव्हने असा बदल घडला असता तरी फारसा फरक पडला नसता. जर का तसे घडले असते तर ऐव्हानॉव्ह गुन्हेगार आरोपी बनला असता आणि रुबाशॉव्ह त्याची चौकशी करणारा अधिकारी. सांगायची गोष्ट एवढीच की रुबाशॉव्ह आणि ऐव्हानॉव्ह दोघांच्या एकूण धारणेत आणि विचारपद्धतीत अजिबात फरक नव्हता. खेळाच्या नियमांमध्ये बदल घडू शकत नव्हता. बदल फक्त तपशिलामधे संभवत होता.

स्वतःला इतरांच्या जागी कल्पून विचार करण्याची रुबाशॉव्हची जुनी सवय पुन्हा एकदा नव्याने प्रबळ झाली; नि ऐव्हानॉव्हच्या दृष्टीतून तो स्वतःच्या केसकडे पाहू लागला. आता त्याला रुबाशॉव्हची अधःपतित अवस्था स्पष्टपणे दिसू लागली आणि पक्षाच्या आदेशावरून रिचर्ड आणि बुटक्या लुईचा न्याय जेव्हा आपण केला तेव्हाची स्वतःची मनःस्थिती त्याला आठवली. आपण तेव्हा पक्षाशी व आपल्या सहकाऱ्यांशी अत्यंत प्रामाणिकपणे वागलो होतो. आपल्या वागण्यात मानभावीपण अजिबात नव्हता नि त्याच न्यायाने ऐव्हानॉव्ह आपल्याशी आज प्रामाणिकपणानेच वागत आहे हे त्याला पटले.

हे सगळे एखाद्या स्वगत भाषणासारखे चालू होते. परंतु अलीकडे जे काही त्याच्या मनात चालू होते त्या धर्तीवर म्हणजे एका बाजूला एक मूक पात्र आणि दुसऱ्या बाजूला संवाद सुरू. खरे तर प्रत्येक खेपेस सगळा संवाद त्या मूक पात्रालाच उद्देशून केला जात होता. परंतु ते मूक पात्र ओठ घट्ट मिटून बसले होते आणि त्याचे अस्तित्व व्याकरणातल्या प्रथम पुरुषी एकवचनाशीच थबकून राहिले होते. या प्रथम पुरुषी एकवचनाला त्याने उघड प्रश्न विचारून पाहिले, तर्कशुध्द पध्दतीने विचार करावयास लावण्याची खटपट केली पण प्रथमपुरुषी एकवचनी पात्र मूक ते मूकच राहिले होते. हे



अनुक्रमणिका

प्रथम पुरुषी एकवचनी पात्र मधेच केव्हातरी बोले. परंतु कारणपरत्वे मात्र नव्हे आणि जेव्हा ते बोले तेव्हा रुबाशॉव्हची दाढदुखी वाढलेली असे. या प्रथमपुरुषी एकवचनाच्या बोलण्याच्या विषयात अजिबात शिस्त नव्हती. इतकेच काय पण त्याला ज्या हकिकती आठवत त्यातही अर्थाअर्थी काही संबंध नसे. उदा. एकदा त्याला **'पाएटा'** चित्रातील मेरी मातेचे जोडलेले हातच आठवले. कधी ज्याला बुटक्या लुईने पाळलेली मांजरे आठवत, कधी 'माती असशी मातीत मिळशी' हे कडवेच आठवे. तर कधी एका विशिष्ट प्रसंगी आर्लोव्हा जे एक खास वाक्य बोलली होती तेवढे ते सुटे वाक्यच आठवे .... मधून मधून तर कोणी तरी सक्ती करावी तसे तो एकच वाक्य बोले की, 'मी माझ्या पापाची फेड करीन, मी माझ्या पापाची फेड करीन.'

कोठडीत येरझारा घालताना त्याच्या आयुष्यात हा जो नवा प्राणी (एन्टीटी) उगवला होता त्याचे खरे स्वरूप शोधण्याचा प्रयत्न रुबाशॉव्ह करीत होता. या प्रयत्नाचा एक भाग म्हणून या प्राण्याला त्याने 'व्याकरणातून उत्पन्न झालेली एक कल्पित वस्तू' असे नाव दिले. पक्षाच्या शिकवणुकीमुळे त्या वस्तूला तो 'मी' म्हणू शकत नव्हता. कारण पक्षाच्या मताने जगात फक्त 'आम्ही' असतात. जगात 'मी' नसतात. 'मी' ची भावना हा एक भ्रम आहे. 'मी' हा एक भ्रम आहे हा विचार रुबाशॉव्हच्या इतका अंगवळणी पडला होता की त्याला खुद्द त्याच्या ठिकाणी हे जे 'मी' चे, प्रथमपुरुषी एकवचनी सर्वनामाचे अस्तित्व जाणवत होते, त्या अस्तित्वालाही 'मी' हे नाव वापरताना त्याला लाज वाटत होती. रुबाशॉव्हच्या आयुष्याचे फार थोडे दिवस आता उरले होते नि त्याला जाणवत होते की आता आपण फक्त काही दिवसांचे सोबती आहोत. त्याची मोठी इच्छा होती की सारे संपण्यापूर्वी सगळ्या गोष्टींचा एकदा सोक्षमोक्ष लावून टाकायचा. परंतु काय असेल ते असो त्यात त्याला यश मात्र येत नव्हते. तो तर्काने विचार करीत होता. परंतु जेथे तर्काची हद्द संपत होती तेथेच 'व्याकरणामुळे तयार होणाऱ्या कल्पित वस्तूची हद्द' सुरू होत होती. त्यामुळे तर्काच्या जोरावर या प्रकरणाचा सोक्षमोक्ष लावण्याचा विचार रुबाशॉव्ह सोडून देतो. 'व्याकरणातली ही कल्पित वस्तू' हा आपल्या अस्तित्वाचा एक अविभाज्य भाग आहे हे त्याला पटत होते. परंतु तर्काच्या मदतीने त्याचे स्वरूप समजून घेता येणार नाही हेही त्याला समजत होते. आपण तार्किक पद्धतीने त्याचा शोध घेऊ लागताच तो कुठेतरी अदृश्य होतो आणि हासभास नसता एकाएकी पुन्हा अवतीर्ण होऊन आपल्या गळ्याला हात घालतो, आपणाला दिवास्वप्नांमधे घेऊन जातो; दाढदुखी सुरू करतो; जुन्या आठवणी जाग्या करतो हेही त्याच्या निदर्शनाला आले आहे. सारांश रुबाशॉव्हला हे उमजले होते की मानवी व्यक्तित्वामधे असा काही भाग आहे की ज्याचेवर तार्किक बुद्धीचा कबजा चालत नाही आणि प्रत्येक प्रश्न तार्किक विचाराने सोडवू असे

कोणी म्हटले तरी ते शक्य होणार नाही. एका शब्दात त्याला हे उमजले नि पटले होते की, निव्वळ विशुध्द बुध्दी वापरून मानवजातीचे अंतिम व यच्चयावत प्रश्न सोडविण्याची कम्युनिस्ट पक्षाची व कम्युनिझमच्या तत्वज्ञानाची महत्त्वाकांक्षा ही महत्त्वाकांक्षा म्हणून कितीही स्तुत्य असली, तरी ती अव्यवहार्य आहे. एवढेच नव्हे तर ही महत्त्वाकांक्षा जेव्हा कोणी तडीस नेऊ पाहातो तेव्हा तितक्या प्रमाणात मानवजातीच्या आत्म्यावरच तो जुलूम करतो होय. या प्रयत्नामधे मनुष्याचे मनुष्यपण संपुष्टात येऊन मनुष्याचा दैत्य बनतो.

ऐव्हानॉव्हच्या सूचनेवर विचार करण्यासाठी रुबाशॉव्हला एका आठवड्याची मुदत दिलेली होती. याच काळात तुरुंगातले अन्य क्रांतीकारक कैदी तुरुंगातल्या न्हाव्याच्या मदतीने रुबाशॉव्हला एक संदेश देण्याचा प्रयत्न करतात. क्रांतीकारक कैदी रुबाशॉव्हला सांगतात की, 'तोंड उघडू नकोस, मुकाट्याने मरण पत्कर.' तुरुंगात आल्यापासून बाहेरच्या जगाकडून रुबाशॉव्हला मिळालेला हा पहिला संदेश. हा संदेश वाचून रुबाशॉव्हला पूर्वीचे, पक्षाचे कार्य करीत असताना शत्रूच्या हाती लागून तेथल्या कैदखान्यात बंद असतानाचे दिवस आठवतात. कारण तेव्हासुद्धा त्याला बाहेरून संदेशाच्या अशाच चिठ्या मिळत असत. मात्र, त्यातील संदेश 'मुकाट्याने मरण पत्कर' असा नसे, तर बंदीविरुध्द आवाज उठव, तुझ्यावर आरोप करणारांवर त्यांच्यापेक्षाही वरच्या आवाजात आरोप कर' असा असे. आज 'शरण जाऊ नकोस, मुकाट्याने मरण पत्कर' हा संदेश वाचताच रुबाशॉव्हच्या मनात विचार येतो की, 'क्रांतीकारकांनी कैदेत असताना तोंड न उघडता मुकाट्याने मरून जावे' असेही काही प्रसंग असतात की काय ? मग त्याचे विचार त्याच दिशेने काम करू लागतात. क्रांतीकारकांनी कसे मरण पत्करावे हे विशद करून सांगणारी छापिल पुस्तके नसतात. आपण कसे मरायचे हे ज्याचे त्याने ठरवायचे आहे या निष्कर्षाला तो येतो.

रुबाशॉव्हपुढे प्रश्न असतो की, 'तोंडातून ब्रसुद्धा न काढता मुकाट्याने मरण पत्करणे हे अधिक श्रेयस्कर की, क्रांतीचे अंतिम ध्येय साध्य करण्यासाठी आज शरण जाऊन आणि स्वतःचा नावलौकिक घालवून जीव बचावणे हे अधिक श्रेयस्कर खरे श्रेयस्कर काय ? आपण जिवंत राहिलो तर पुढे मागे आपले ध्येय साधता येईल. आजच मेलो तर सारे जागच्या जागी राहील. त्याने आपल्याऐवजी आर्लोवाचा बळी दिला. कारण क्रांतीच्या हितासाठी त्याचे जिवंत राहाणे अधिक आवश्यक होते. स्वतःचा जीव वाचविण्यासाठी आर्लोवाचा बळी देण्यात काहीच चूक नाही हाच युक्तिवाद त्याच्या मित्रांनी आर्लोवाच्या मृत्यूच्या प्रसंगी त्याच्यापाशी केला होता आणि सर्वांच्या दृष्टीने हा निर्णायक युक्तिवाद होता. विश्वासघातापेक्षा आत्मबलिदान केव्हाही श्रेस्ठ असे मानणाऱ्या डुढ्ढुक मध्यमवर्गीय नीतितत्त्वापेक्षा क्रांतिकार्यासाठी इतरांचा बळी देऊन स्वतःचा जीव

वाचविणे, भावी काळासाठी स्वतःला सुरक्षित राखणे हे क्रांतीचे नीतीतत्त्व अधिक श्रेष्ठ आहे असे ते सर्वजण म्हणाले. इतिहासाचा चेहरामोहरा ज्यांनी पालटून टाकला आहे त्यांच्यासाठी स्वतःचा जीव वाचविणे आणि क्रांतीकार्याला मदत करणे, क्रांतीच्या उपयोगी पडणे हेच महत्त्वाचे कर्तव्य ठरते. 'माझ्या जिवाचे तू हवे ते कर' असे खुद्द आर्लोव्हासुद्धा म्हणाली होती आणि तेच त्याने केले होते. त्याने आर्लोव्हाचा बळी दिला होता. अशा परिस्थितीत स्वतःचे फाजिल लाड करणे, केवळ खोट्या अहंकारापोटी, मोठेपणाच्या चुकीच्या कल्पनांसाठी, केवळ आयुष्याचा कंटाळा, तिटकारा आला म्हणून या मोक्याच्या क्षणी स्वतःचा बळी देणे सयुक्तिक ठरते काय ? 'पुढील पाच दहा वर्षात आमच्या युगाचे खरे भविष्य ठरणार आहे.' असे ऐव्हानॉव्ह बोलला होता, अशावेळी आपण पाय काढता घेतला तर ते बरोबर दिसेल काय ? बरे आपण नंबर एकला विरोध दर्शविला नि कालांतराने नंबर एकचेच म्हणणे बरोबर ठरले तर काय ? कदाचित आजच्या या दुर्गंधीत, रक्तमांसाच्या चिखलात आणि असत्याच्या गटारातच भावी उज्वल समाजरचनेचा पाया कशावरून घातला जात नसेल ? इतिहासाला तरी सत्यासत्याची, न्यायान्यायाची चाड कोठे असते ? सत्यासत्याची पर्वा न करता, रक्तमांसाच्या चिखलावरच इतिहाससुद्धा आपल्या करामतीची इमारत बांधीत नसतो काय ?

'म्हणे मुकाट्याने मरण पत्कर. बोलणे सोपे, पण करणे ........'

'मुकाट्याने मरण पत्कर' हे शब्द रुबाशॉव्ह नकळत अनेकवार स्वतःशी पुटपुटतो. मधेच ते त्याच्या ध्यानात येते.

ऐव्हानॉव्हची सूचना आपण नाकारली ते चूक केले असे आता त्याला वाटू लागते. मनापासून ती सूचना आपण झिडकारली होती काय याचीही आता त्याला शंका येते.

* * *

मधेच रुबाशॉव्ह आणि कैदी नंबर ४०२ हे भिंतीवर ठोके मारून एकमेकात संदेशांची देवाणघेवाण करतात. संदेशावरून रुबाशॉव्हला कळते की राजकीय मतभेदासाठी पक्षाच्या एका वरिष्ठ सभासदाला रात्री गोळी घालून ठार करण्यात येणार आहे. परत एकदा रुबाशॉव्हचा विचारप्रवाह सुरू होतो.

रुबाशॉव्हने तोवर देहान्तशासन केव्हाही पाहिलेले नसते. यादवी युध्दात खुद्द त्याच्यावर देहान्तशासनाचा प्रसंग ओढवला होता. पण तेव्हा तो थोडक्यात वाचला होता. शांततेच्या काळात एक नित्याची बाब म्हणून राजकीय कैद्यांना फाशी देण्याच्या प्रसंगाचे



अनुक्रमणिका

चित्र डोळ्यासमोर उभं करण्याचा प्रयत्न तो करतो. फाशीची शिक्षा रात्रीच्या वेळी तुरुंगाच्या तळघरात अंमलात आणतात आणि कानाखाली किंवा डोक्याच्या मागे मानेवर जवळून रिव्हॉल्व्हरची गोळी घालून कैद्यांना ठार केले जाते एवढीच मोघम माहिती त्याला होती. मृत्यू ही नवलाईची गोष्ट आहे असे पक्षाला कधीच वाटले नव्हते. पक्षाच्या दृष्टीने त्यात हळवे होण्यासारखेही काहीच नव्हते. इतर घटनांसारखी तीही एक घटना. एक तार्किक परिणती. या पलीकडे मृत्यूचे स्तोम माजविण्याची पक्षाला सवय नव्हती. म्हणजे पक्षासाठी मृत्यू ही एक अमूर्त बाब होती. दुसरी गोष्ट पक्षातल्या चर्चेमध्ये मृत्यूचा उल्लेख सहसा केला जात नसे. 'फाशी वा देहान्त शासन' या शब्दांचे तर पक्षाला जणू वावडे होते. नेहमीचा शब्दप्रयोग म्हणजे 'वासलात' आणि 'वासलात' शब्दामुळे 'अमक्या तमक्याच्या राजकीय जीवनाची इतिश्री झाली' ही कल्पना फक्त मनात येत असे. प्रत्यक्ष मृत्यूबद्दल बोलण्यात कोणालाच रस नसे. तार्किक समीकरणातील एक घटक या पलीकडे मृत्यू या शब्दाला पक्षाच्या हिशेबी काहीही अर्थ नव्हता. मृत्यूची कल्पना पक्षासाठी इतकी शाब्दिक अथवा अमूर्त बनली होती.

रुबाशॉव्हला बातमी लागते की मायकेल बोग्रोव्हवला फाशी देण्यासाठी नेण्यात येत आहे. बोग्रेव्ह हा एकेकाळाचा रुबाशॉव्हचा सहकारी. नंबर एक आणि त्याचा एका बाबीवरून मतभेद झाला. नंबर एकने त्याची वासलात लावण्याचे ठरविले. बोग्रोव्ह रडत होता, भेकत होता. तुरुंगावरचे पहारेकरी त्याला ओढून फाशीच्या जागी घेऊन जातात. रुबाशॉव्हच्या थेट दरवाजावरून. रुबाशॉव्हला मळमळून येते. आर्लोव्हाच्या मृत्यूच्या वेळी तो अस्वस्थ बनला होता. पण तरीही तिचा मृत्यू त्याच्या लेखी तार्किक परिणतीच होता. आता मात्र त्या तार्किक परिणतीच्या खरेपणाबद्दल त्याच्या मनात संशय उत्पन्न झाला. बोग्रोव्हच्या दुर्दैवी किंकाळ्या रुबाशॉव्हच्या कानावर पडल्या आणि इतकी वर्षे ज्या तार्किक समीकरणावर डोळे झाकून विश्वास ठेवला होता त्या समीकरणाचा जणू तोलच जणू तोलच ढासळला.

* * *

'रुबाशॉव्ह, रुबाशॉव्ह .....' बोग्रोव्हची ती शेवटची हृदयविदारक हाक रुबाशॉव्हच्या हृदयात कायमची कोरली गेली..... त्या काही सेकंदात त्याने जे काही पाहिले ते जळत्या निशाणीने त्याच्या मनावर जणू कायमचे डागले गेले. युनिफॉर्ममधल्या दोन दणकट अधिकाऱ्यांनी दोन्ही बाजूंनी कैद्याचे बखोटे पकडले होते. ते अधिकारी कोण हे ओळखू येत नव्हते. तो कैदी मधे लोंबकळत होता. एखाद्या कचकड्याच्या बाहुलीसारखा, तोंड जमिनीकडे वळलेलं, शरीर अस्वभाविकपणे ताठरलेलं, कमरेला बाक, पाय मागे



अनुक्रमणिका

फरफटत, पायातले बूट फरशीवर खरडत आहेत. त्या खरडण्याचाच कर्कश आवाज रुबाशॉव्ह दुरून ऐकतो. कैद्याचे तोंड खाली झुकले होते. तोंडावर केसांचे पांढरे झुबके पसरलेले. चेहऱ्यावरून ओघळणारा घाम आणि तोंडातून गळणारी लाळ. रुबाशॉव्हच्या नजरेआड जेव्हा तो देह झाला तेव्हा त्याचे विव्हळणे हळूहळू कमी कमी होत गेले. फक्त ऊ – आ – ओ हे स्वर मात्र अस्पष्टपणे त्याच्या कानावर येत राहिले. कोपऱ्यावर वळण्यापूर्वी दोन प्रदीर्घ किंकाळ्या रुबाशॉव्हच्या कानी आल्या नि त्या अस्पष्ट स्वरांचा खरा अर्थ त्याला कळला. बोग्रेव्ह रुबाशॉव्हला हाक मारत होता. एकेकाळच्या आपल्या सहकाऱ्याचे नाव घेण्याचा तो अयशस्वी प्रयत्न होता.

* * *

रुबाशॉव्ह झोपेत आहे, त्याला स्वप्न पडत आहे. स्वप्नात तो शत्रूच्या देशात असतो. ऐव्हानॉव्ह त्याच्या खोलीत येतो. रुबाशॉव्हला जाग येते. पण ही जाग खरोखरीच आहे की तेही स्वप्न आहे ? रुबाशॉव्ह संभ्रमीत अवस्थेत. 'मी जागा आहे की झोपेत आहे ? खराखुरा ऐव्हनॉव्ह तेथे उभा आहे की स्वप्नातला ? नाही. ऐव्हनॉव्ह खराखुरा आहे नि देश त्याचा स्वतःचा आहे. पण आता शत्रूचा देश झाला आहे. ऐव्हानॉव्ह हा त्याचा एकेकाळचा मित्र, पण तोसुद्धा शत्रू बनला आहे.

रुबाशॉव्हला वाटते की ऐव्हानॉव्हने जाणून बुजून रुबाशॉव्हचा छळ करण्यासाठी, त्याला घाबरविण्यासाठी कॉम्रेड बोग्रोव्हला त्याच्या कोठडीवरून फरफटत नेले होते. ऐव्हानॉव्ह आरोप नाकारतो. तो म्हणतो की, 'मी तुला, तुझ्या संपूर्ण मानसशास्त्रासकट ओळखतो. बोग्रोव्हला गोळी घालून ठार मारण्यात आले ही गोष्ट खरी. याच तुरुंगात गेले अनेक महिने तो कैदी होता ही सुद्धा गोष्ट खरी. त्याचा निर्घृण छळ करण्यात आला हीही गोष्ट खरी. तुझ्या कोठडीवरून त्याला मुद्दामच फरफटत नेण्यात आले हे सुद्धा खरे. परंतु हे मी केलेले नाही. माझ्या सूचना धुडकावून हे करण्यात आले. असे करावे ही ग्लेटकिनची कल्पना आहे. मी असे कधीसुध्दा केले नसते. अर्थात तुला दुःख होईल या भीतीने नव्हे, तर असे करण्याचा परिणाम नेमका उलटा होईल, तू अधिकच हट्टी बनशील आणि कबुलीजबाब न देता फुकट बळी जावयास तयार होशील हे मला माहित आहे. म्हणून मी ते केले नसते ...... तू शुद्धीवर असावास, तुझ्या अंगात साक्षात नीतीदेवता संचारू नये अशी माझी इच्छा आहे. तू शुद्धीवर असलास, तर्कशुद्ध पद्धतीने विचार करण्याच्या मनःस्थितीत असलास, तर्काच्या अंतिम टोकाला जाऊन जर का तू निष्कर्ष काढलास तर तू नक्की कबुलीजबाब देशील ही मला खात्री आहे.

ऐव्हानॉव्हच्या उद्‌गारांवर रुबाशॉव्ह एक अक्षरही बोलत नाही. तेव्हा

ऐव्हानॉव्हच त्याला विचारतो की, तुझ्या स्वतःच्या बुद्धीची खात्री झाल्यावाचून तू आपली चूक कबूल करणार नाहीस याची मला कल्पना आहे. तथपि मला एक गोष्ट सांग. अशी कल्पना कर की कबुलीजबाब देणे आवश्यक आहे याबद्दल तुझी खात्री झाली, तसेच तटस्थपणे विचार केल्यावर तुला आढळले की माफी मागणे योग्य आहे तर तू तसे करशील की नाही ? बस्स, एवढ्या एका प्रश्नाचे उत्तर तू मला दे म्हणजे मी गप्प बसतो.'

यावर रुबाशॉव्ह काही क्षण गप्प राहातो नि त्याच्या अंगावर खेकसतो की, "तू चालता हो. येथे तुझा काहीही फायदा नाही."

ऐव्हानॉव्ह बाहेर जात नाही. उलट रुबाशॉव्हलाच म्हणतो की, "तू मला घाबरत आहेस. नाहीतर माझ्या प्रश्नाचे उत्तर तू दिले असतेस आणि तू मला घाबरतोस याचे कारण असे आहे की मी ज्या पद्धतीने विचार करीत आहे त्याच पद्धतीने तू सुध्दा विचार करीत आहेस किंवा अधिक बरोबर म्हणजे अशा पद्धतीने विचार करावयास तू स्वतःच मला शिकविले आहेस ......"

* * *

कादंबरीच्या शेवटाच्या दृष्टीने ऐव्हानॉव्ह–रुबाशॉव्ह या दोघातला हा संवाद फार महत्त्वाचा आहे. तुरुंगात येऊन पडेपर्यंत रुबाशॉव्ह खरोखरच ऐव्हानॉव्हच्या पद्धतीने विचार करीत होता. हृदय आणि तर्क दोन गोष्टीत त्याला तर्कच फक्त महत्त्वाचा वाटत होता आणि स्वतःच्या आणि इतरांच्याही आयुष्यातील सगळे निर्णय फक्त तर्काला साक्षी ठेवून तो घेत होता. तुरुंगात त्याला वेगळा अनुभव आला नि तर्कावरच्या त्याच्या अंधविश्वासाला तडा गेला.

* * *

रुबाशॉव्हला अधिक डिवचण्यासाठी ऐव्हानॉव्ह बोलणे पुढे सुरू करतो, 'लवकरच बहुधा माझ्या अंगावर तू खेकसशील की सैताना माझ्यापासून दूर हो. प्राचीन काळी माणसाना मोहात पाडण्यासाठी सैतान विषयोपभोगाची - पृथ्वीचे राज्य, साऱ्या जगाची संपत्ती, सौंदर्यवतींचा हात भोगांची लालूच दाखवीत असे. आता त्या मोहाचे स्वरूप बदलले आहे. आता बुद्धिवादाच्या नावाने मोह दाखविला जातो. बुद्धीच्या नावाने सैतान आता आवाहन करतो. भौतिक सुखाच्या नावाने नाही. जीवनाची मूल्ये बदलतात. संतशिरोमणी रुबाशॉव्ह महाराज यांच्या आत्म्याचा कबजा घेण्यासाठी परमेश्वर आणि सैतान या दोघांमध्ये चुरस लागली असून संतशिरोमणी रुबाशॉव्ह यांच्या हृदयाचे जे हाल होत आहेत त्यांचे वर्णन करणारे एक पॅशन–प्ले लिहावे असे मला वाटू लागले आहे. (खिस्ताच्या यातना

आणि त्याचे मरण या विषयावरच्या नाटकांना पॅशन प्ले असा शब्द आहे.) संपूर्ण आयुष्य पापाचरणात घालविल्यावर संत रुबाशॉव्ह पश्चात्तापदग्ध होऊन परमेश्वराकडे परत वळत आहेत. बरे, परमेश्वर कसा तर भांडवलशाही उदारमतवाद आणि ख्रिस्ती मुक्तिफौजेचे मटणसूप पिऊन पिऊन ज्याच्या अंगावर चरबीची पुटेच्या पुटे चढली आहेत असा ! याच्या उलट आमच्या नव्या सैतानाची स्थिती पाहा. सैतानाचा देह शुष्क झाला आहे. त्याच्या अंगावर चरबी नावाला सुद्धा नाही. वृत्तीने तो विरक्त आहे. तर्कशुद्ध विचार हे त्याचे वैशिष्ट्य आहे. सैतान सतत माकियावेली, संत इग्नेशस लोयोला (१४९१ - १५५६ सोसायटी ऑफ जीजस या संस्थेचा स्पॅनिश संस्थापक), कार्ल मार्क्स, हेगेल यांचे ग्रंथ वाचत असतो. मानवजातीबद्दल त्याला एक हिशेबी जिव्हाळा वाटतो. त्या जिव्हाळ्यामुळे - मानवजातीचे उद्या भले व्हावे म्हणून आज तो मानवजातीशी भावनाहीन व कठोर वागतो. त्याच्या दुर्दैवाने ज्या कामांचा त्याला अतिशय तिटकारा आहे तीच कामे त्याला करावी लागतात. माणसामाणसातली कत्तल पूर्णपणे बंद करण्यासाठी आज त्याला स्वतःलाच अनेकजणांची कत्तल करावी लागते. निरपराध लोकांचा बळी दिला जाणार नाही अशी उद्याची समाजव्यवस्था स्थापन करण्यासाठी आज त्याला अशा निरपराध्यांनाच बळी द्यावे लागत आहे. चामड्याच्या वादीने कोणी फटकारे मारले तर त्याला प्रतिकार करण्याची सवय लोकांना लागावी म्हणून आज त्याला त्याच लोकांना चामड्याच्याा वादीने बडवून काढावे लागत आहे. एका उच्चतम नीतीव्यवस्थेची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी आज त्याला सगळ्या शिष्टसंमत नीतीमूल्यांना चाट द्यावी लागत आहे. थोडक्यात मानवजातीबद्दल सैतानाला एक प्रकारचे जे अमूर्त आणि अवर्णनीय प्रेम वाटत आहे त्या प्रेमापोटी तो साऱ्या जगाचे शत्रुत्व घ्यावयास आज सज्ज झाला आहे. बा सैताना ! कॉमरेड रुबाशॉव्ह आता तुझा अनुयायी राहिलेला नाही. तो आता हुतात्मा होऊ पाहात आहे. आजपर्यंत ज्यांनी त्याचा मनापासून द्वेष केला ते भांडवलशाही देशातील प्रागतिक वृत्तपत्रकार आणि स्तंभलेखक त्याच्या मृत्यूनंतर त्याला संत बनवितील. संतशिरोमणी रुबाशॉव्ह यांना त्यांची सद्सद्विवेकबुद्धी सापडली आहे. दुर्दैवाने दुहेरी हनुवटीमुळे मनुष्य क्रांतीला जसा निरुपयोगी बनतो तसाच तो सदसद विवेकबुद्धीमुळेही निरुपयोगी बनतो. सद्सद्विवेकबुद्धी ही कॅन्सरच्या किडीसारखी असून ही कीड मेंदूला लागली की ती आख्खा मेंदू पोखरून खाते. सैतान महाराजांचा पूर्ण पराभव झाला आहे आणि त्यानी माघार घेतली आहे. माात्र सैतानमहाराज हरले असले तरी ते दातओठ खातील नि शिव्याशाप देतील अशी अपेक्षा करणे व्यर्थ आहे. सैतान महाराज तसले काहीही करणार नाहीत. ते खांदे उडवतील नि पुढे जातील. स्वतःचा दुबळेपणा झाकण्यासाठी मोठमोठ्या तत्त्वांची नावे पुढे करून त्याना सोडून गेलेले आजवर काही थोडे नाहीत. त्याना त्याचे अजिबात वैषम्य नाही .......'

ऐव्हानाव्हचे भाषण संपले नि रुबाशॉव्हने त्याला विचारले की बोग्रोव्हला फाशी

का देण्यात आले ?

ऐव्हानॉव्ह म्हणाला की, लांब पल्ल्याच्या मोठ्या पाणबुड्या बांधाव्यात की मर्यादित पल्ल्याच्या छोट्या, सुटसुटीत पाणबुड्या बांधाव्यात या प्रश्नावर बोग्रोव्ह आणि नंबर एकचा मतभेद झाला. बोग्रोव्ह मोठ्या पाणबुड्यांच्या बाजूने होता. पक्ष आणि पक्ष म्हणजेच नंबर एक कारण कम्युनिस्ट पक्षात पक्षाचा नंबर एक हाच पक्षातला सर्वाधिकारी असतो, छोट्या पाणबुड्यांच्या बाजूचा होता. सर्वंकष सत्तावादी राजवटीत मतभेद चालवून घेतले जात नाहीत. मतभेद हा तेथे देशद्रोह, पक्षद्रोह, तत्त्वद्रोह इत्यादी सर्व प्रकारचा द्रोह असल्याने, मतभेद व्यक्त करणाराची कायमची वासलात लावल्यावाचून पक्षाच्या नंबर एकला स्वस्थता वाटू शकली नाही. या प्रकारच्या राजवटींमध्ये विरोध सहन केला जाऊ शकत नाही. या राजवटींच्या दृष्टीने नंबर एकला विरोध म्हणजे येऊ घातलेल्या परमेश्वराच्या राज्यालाच विरोध असल्याने विरोध करणाराचा काटा काढल्यावाचून गत्यंतर नसते. सर्वंकषसत्तावादी राजवटींचा एकूण नमुना प्रेषिती धर्मासारखा असतो. प्रेषिती धर्म येऊ घातलेल्या परमेश्वरी राज्याचा हवाला देतात. मात्र हे राज्य येण्याची अट एकच. प्रेषिताच्या बाजूने जे येणार नाहीत त्यांचा फडशा पाडला पाहिजे. प्रेषिताचे विरोधक ते परमेश्वराचे विरोधक असे प्रेषितांचे साधे समीकरण असल्याने, परमेश्वराचे विरोधक संपविल्यावाचून परमेश्वराचे राज्य येणार नाही हे एकमेव अपरिहार्य उत्तर आपल्या अनुयायांना हे धर्म देतात. तीच कथा सर्वंकषसत्तावादी राजवटींचीसुद्धा. ऐव्हानॉव्हचा सगळा युक्तिवाद हे अगदी स्पष्ट करतो. सैतानाला मानवजातीचे प्रेम आहे. त्याला मानवजातीचे भले करायचे आहे. पण लवकरात लवकर भले करायचे तर प्रथम हे भले करण्याच्या आड जे कोणी येतात वा येण्यासारखे आहेत त्यांना कायमचे दूर करावयास हवे. एकेकाळी रुबाशॉव्ह देखिल याच तर्कशास्त्राने चालत होता आणि आता ऐव्हानॉव्हला आशा आहे की, जर का पुन्हा एकदा जुन्या तर्कशास्त्राप्रमाणे तो चालू लागेल तर आजसुद्धा तो नंबर एकच्या बाजूला येईल. म्हणजेच नंबर एकच्या विरुद्ध भूमिका घेण्यात आपली चूक झाली याची जाहीर कबुली तो देईल असो.

हलवून खुंटा बळकट करावा म्हणून ऐव्हानॉव्हने रुबाशॉव्हची जी कानउघडणी सुरू केली होती ती तो पुढे चालू करतो. आता त्याच्या उपदेशाची दिशा बदललेली असते. क्रांतीकारकांना दया, करुणा असल्या गोष्टी कशा मारक आहेत याच्यावर त्याचे प्रवचन सुरू होते. ऐव्हानॉव्ह म्हणतो की, 'माझ्या ठिकाणी जर का नाममात्र दया असती तरीही मी येथून निघून गेलो असतो. परंतु माझ्या ठिकाणी दया तिळमात्रही नाही. मला दारूचे व्यसन आहे. पण दयेचे व्यसन मात्र नाही. दयेचा फक्त छोटा घोट घे, नि तू संपलास म्हणून समज. मानवजातीच्या दुःखाबद्दल कढ काढून रडत बसणे आणि स्वतःची कीव

करणे हा आमच्या जातीचा आजार तुला माहीतच आहे. आमच्यातील सगळे मोठे कवी याच विषाची बाधा होऊन संपून गेले आहेत. वयाची चाळीशी पन्नाशी उलटेपर्यंत हे सगळे जण क्रांतीकारक होते. त्यांची चाळीशी, पन्नाशी उलटली नि त्यांना दया-बुद्धीच्या आजाराची लागण झाली. त्यानंतर जगाने त्यांना साधुत्वाचा हार घातला. मला वाटते तुझी महत्त्वाकांक्षादेखिल साधू ठरावे अशीच आहे. तुला असे वाटत आहे की तुझ्याशिवाय इतर कुणाला दया वगैरे ठाऊक नाही. ..... रुबाशॉव्ह महाशय दारूने जशी धुंदी येते, तशीच धुंदी सद्‌गुणांच्या मस्तीनेही येते. तेव्हा असल्या धुंदीपासून आपण सावध राहिल्यास चांगले. दारूच्या प्रत्येक बाटलीत काही मोजकी धुंदी असते. हे तुला, मला आणि सगळ्या जगाला माहित आहे. मात्र अती लीनपणा आणि इतरांच्या दुःखाने आपण दुःखी होऊ शकतो ही भावना या गोष्टीसुद्धा माणसाला दारूच्या पेल्यासारखीच झींग आणू शकतात, याची कल्पना जगातल्या आणि त्यातल्या त्यात आपल्या देशातल्या मंडळींना फारच कमी आहे.

'माझा मुद्दा अगदी साधा आहे. तुला असे वाटते आहे की हे जग म्हणजे विकारांना वाट देण्यासाठी तयार करण्यात आलेला एक अतिभौतिक वा दैवी कुंटणखाना आहे. परंतु ते खरे नाही. जग म्हणजे भावनाविष्काराचा कुंटणखाना नाही हा आपल्या पक्षाचा पहिल दंडक. मानवी दुःखाबद्दल सहानुभूती, सद्सद्‌विवेकबुध्दी, पक्षाबद्दल तिरस्कार, वैफल्य, पश्चात्ताप, अपराधासाठी प्रायश्चित्त असल्या गोष्टींना मनात थारा देणे म्हणजे एक प्रकारचा तिरस्करणीय बौद्धिक बाहेरख्यालीपणा आहे. आसन मांडून समाधीत गुंग होणे काय किंवा आकाशाकडे डोळे लावून मोठ्या नम्रतेने स्वतःची मान ग्लेटकिनच्या रिव्हॉल्वरमधील गोळीसाठी पुढे करणे काय, जगात याच्याइतके अधिक सोपे दुसरे काहीच नाही. हिंसेच्या मार्गाचा त्याग करावा, केल्या कर्माचा पश्चात्ताप करून मनःशांती मिळवावी या प्रकारचा मोह आपल्यासारख्यांना वारंवार होत असतो आणि आपल्यासारख्यांसाठी सगळ्यात मोठा मोह हाच आहे. स्पार्टाकस (खिस्तपूर्व ७३– ७१; रोमन गुलामांच्या सैन्याचा पुढारी. याने रोमविरुद्ध गुलामांचे बंड उभारले होते.) ते दाँतौं (जार्ज जॅक - १७५९ - ९४ फ्रेंच राज्यक्रांतीमधला एक धुरीण. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर स्थापन झालेल्या लोकसुरक्षा समितीचा सभासद. रोबेस्पियर या क्रांतीमधल्या दुसऱ्या धुरीणाशी त्याचा संघर्ष येऊन त्याला गिलोटिनवर चढविण्यात आले.) आणि डोस्टेव्हस्की – एकापेक्षा एक क्रांतीकारक, रथीमहारथी या मोहाला बळी पडल्याचे आढळून येईल. ज्या प्रकारच्या मोहाला क्रांतीकारक बळी पडू शकतात त्या मोहाचा हा एक ज्वलंत नमुना आहे. सैतानाच्या मोहांपेक्षा परमेश्वराचे मोह मानवजातीच्या कल्याणाच्या दृष्टीने अधिक भयंकर म्हणता येतील. जोवर जगामध्ये अंदाधुंदी राज्य करीत आहे, जोवर जगामध्ये सुव्यवस्था प्रस्थापित झालेली नाही, तोवर परमेश्वरावरची श्रध्दा ही एक कालविसंगत गोष्ट

असून, सद्सद्विवेकबुद्धीबरोबरची प्रत्येक तडजोड ही केवळ दगलबाजी, बेईमानी आहे. तुझ्याबरोबर जेव्हा तुझा तथाकथित अमंगल 'आतला आवाज' बोलू लागतो तेव्हा कानावर हात घेऊन कान बंद करून घेतलेस तर आधिक बरे .....'

'आपण समजतो त्याप्रमाणे नीरो (इ. स. ३७-६८, रोमन सम्राट- ५४-६८, जुल्मी राजवट आणि क्रौर्यासाठी कुप्रसिद्ध) किंवा फुशे हे खरे इतिहासातले गुन्हेगार नाहीत. खरे गुन्हेगार गांधी किंवा टॉलस्टॉय हे 'महात्मे' आहेत. ब्रिटिशांच्या शस्त्रास्त्रांपेक्षा गांधींच्या 'आतल्या आवाजाने' हिंदुस्थान देशाच्या स्वातंत्र्याचा मार्ग खरोखर अधिक अडवून धरला आहे. रुप्याच्या तीस नाण्यांसाठी ज्यूडासने खिस्ताचा विश्वासघात केला. तीस नाण्यांसाठी स्वतःला विकणे हा मी प्रामाणिक व्यवहार समजतो. परंतु स्वतःच स्वतःच्या सद्सद्विवेकबुद्धीला विकले जाणे म्हणजे मानवजातीला वाऱ्यावर सोडून देणयासारखे आहे. इतिहास स्वभावतःच न—नैतिक आहे. नीतींअनीतीच्या कल्पनेच्या आधीचा आहे. इतिहासाला सद्सद्विवेकबुद्धी नसते. रविवारी चर्चमधून पाद्रीलोक धार्मिक प्रवचने देतात. त्या प्रवचनातल्या उपदेशाबरहुकूम इतिहास घडवू पाहाणे म्हणजे जग आता जेथे आहे तेथेच ते राहू देण्यासारखे आहे. अर्थात माझ्या इतकीच तुलासुद्धा याची कल्पना आहे. एवढेच नव्हे तर या क्षणी काय पणाला लागले आहे याची सुद्धा कल्पना तुला आहे.'

'...... ऐव्हानॉव्ह जे बोलत होता ते सगळे रुबाशॉव्हला कळत होते. आज अनेक वर्षे खुद्द त्याने स्वतःसुध्दा तोच युक्तिवाद केला होता. त्यामुळे त्याच्या दृष्टीने ऐव्हानॉव्हच्या युक्तिवादामधे काहीही नवीन नव्हते. नवीन हे होते की ऐव्हानॉव्ह ज्या आंतरिक मानसिक प्रक्रियांबद्दल इतक्या तुच्छतेने बोलत होता त्या प्रक्रियांबद्दल पूर्वीच्या काळी स्वतःच्या अनुभवांतून त्याला काहीही माहित नव्हते. त्याच्या दृष्टीने तो सगळा केवळ अमूर्त प्रकार होता. एक पुस्तकी थाटाचा प्रकार. परंतु आज परिस्थिती बदलली आहे. ऐव्हानॉव्ह ज्या मानसिक प्रक्रियांची चेष्टा करीत होता त्या आज त्याने स्वतः अनुभविल्या होत्या. 'व्याकरणातल्या कल्पित वस्तूचे' अस्तित्व त्याने स्वतःमधे अनुभवले होते नि त्या अस्तित्वाबद्दल त्याची खात्री पटली होती. परंतु तरीही एक प्रश्न सुटत नव्हताच ! या प्रक्रिया तर्कविसंगत होत्या ही गोष्ट मागे उरत होतीच ! आपण या प्रक्रिया स्वतःमधे अनुभविल्या म्हणून त्यांचे तर्कविसंगत स्वरुप थोडेच पालटणार होते ? गूढवादाचे सुख त्याने स्वतः उपभोगले होते. एवढ्यावरून गूढवादाला विरोध न करणे योग्य होते काय ? गूढवादाच्या सुखाचा अनुभव त्याला आला म्हणून गूढवादाला विरोध करण्याची गरज संपत होती काय?. एक वर्षापूर्वी त्याने आर्लोव्हाला जाणूनबुजून मृत्यूकडे ढकलले होते. त्या काळात देहान्त शासनाने मरताना काय यातना होतात हे समजण्याइतकी कल्पनाशक्ती त्याच्यापाशी नव्हती. आज त्याच्यापाशी ती आहे. म्हणून तेव्हापेक्षा वेगळे वागणे आज बरोबर ठरते काय ? वस्तुनिष्ट दृष्टीने बोलायचे किंवा तर्कशुद्ध पध्दतीने विचार करायचा तर आर्लोव्हा,

रिचर्ड, बुटका लुई यांचा बळी देणे एकतर बरोबर होते किंवा चूक होते. त्याच्याशी रिचर्डच्या तोतरेपणाचा किंवा आलोव्हाच्या पुष्ट स्तनांचा किंवा बोग्रोव्हच्या हृदयद्रावक विव्हळण्याचा संबंध कोठे पोहोचत होता ?

रुबाशॉव्ह तुरुंगातलया कोठडीत पुन्हा येरझाऱ्या घालू लागतो. ऐव्हानॉव्ह काहीतरी नवे भाष्य करतो. रुबाशॉव्हचे त्याच्याकडे लक्ष नसते. तो ' आर्लोव्हा जर का आज जिवंत असती तर आयण तिला फासावर जाऊ दिले असतो का ?' याच प्रश्नात व्यग्र असतो. या प्रश्नाचे उत्तर मिळाले की सगळ्या प्रश्नांची उत्तरे मिळतील असे त्याला वाटते. ..... ऐव्हानॉव्हला तो विचारतो,

' डोस्टोव्हस्कीच्या 'क्राइम अँड पनिशमेंट' मधला रास्कोलनिकॉव्ह तुला आठवतो का ?'

(ऐव्हानॉव्ह) : 'केव्हा ना केव्हा हा विषय तू काढशील असे मला वाटलेच होते.! तुला म्हातारचळ लागला आहे की काय ? म्हणे क्राइम ॲन्ड पनिशमेंट.'

(रुबाशॉव्ह) : 'थांब, थांब, अशी घाई करू नकोस. ही फक्त शाब्दिक चर्चा आहे. पण हळूहळू आपण मुद्याच्या जवळ येत आहोत. मला वाटते की, त्या म्हाताऱ्या बाईला ठार मारण्याचा हक्क रास्कोलनिकॉव्ह या विद्यार्थ्याला कसा पोहोचतो ? हा त्या कादंबरीतला मुद्याचा प्रश्न आहे. रास्कोलनिकॉव्ह हा तरुण आहे, बुद्धिमान आहे, कर्तृत्ववान आहे. आपल्या आयुष्याचे तो काहीतरी भव्यदिव्य करू शकतो. खूप मोठे आयुष्य त्याच्यापुढे उभे आहे. उलट ती बाई अगदी म्हातारी झाली आहे. जगाच्या दृष्टीने तिच्या आयुष्याला काडीचीही किंमत उरलेली नाही. तरीसुद्धा रास्कोलनिकॉव्हने तिचा जीव घेणे हे बरोबर वाटत नाही. तिचा खून ही गोष्ट गणितातच बसत नाही. पहिली गोष्ट म्हणजे तिचा खून करताना त्याला आणखी दुसरा एक खून करावा लागतो. त्याच्या साध्या सरळ आणि तर्कशुध्द गणिताचा तो हिशेबात न घेतला गेलेला आणि तर्काबाहेरचा परिणाम होता. दुसरी गोष्ट म्हणजे दोन अधिक दोन बरोबर चार हे गणित जरी निर्जीव वस्तूंच्या बाबतीत खरे असले, तरी जेव्हा माणसाशी संबंध येतो, तेव्हा हे गणित कोलमडून पडते हे खुद्द रास्कोलनिकॉव्हलाच पुढे पटते त्याचे काय ?'

(ऐव्हानॉव्ह) : 'मला विचारशील तर त्या पुस्तकाची एकूण एक प्रत जाळून टाकली पाहिजे असे माझे स्वच्छ मत आहे. त्या पुस्तकातील तथकथित मानवतावादी अर्धवट तत्त्वज्ञान जर का आपण शब्दशः अंमलात आणले तर त्याचे परिणाम काय होतील याचा तू कधी विचार केला आहेस काय ? गणितातल्या आकड्यांचे तर्कशास्त्र मानले गेले पाहिजे, या उपदेशाला चिकटून आम्ही वागू लागलो तर काय होईल याची तू कल्पना



अनुक्रमणिका

केली आहेस काय ? संपूर्ण फलटण मृत्यूच्या खाईतून वाचविण्यासाठी सेनापतीने छोटे टेहाळणी पथक बळी देऊ नये असाच या उपदेशाचा अर्थ की नाही ? बोग्रेव्हसारख्या मूर्खाला फासावर चढवू नये आणि एकदोन वर्षात आमची संपूर्ण किनारपट्टी शत्रूच्या तोफखान्याकडून चक्काचूर होऊ द्यावी असाच याचा अर्थ की नाही ?'

(रुबार्शोव्ह) : 'तू दिलेले सगळे दाखले युध्दकाळातील प्रसंगावर आधारीत आहेत. म्हणजेच असाधारण परिस्थितीशी संबंधित आहेत.'

(ऐव्हानॉव्ह) : 'वाफेच्या इंजिनाचा शोध लागल्या दिवसापासून जगात नेहमीसाठीच असाधारण परिस्थिती निर्माणा झालेली आहे. युद्धे आणि क्रान्त्या ही त्या असाधारण परिस्थितीची बाह्य लक्षणे होत. तुझा रास्कोलनिकॉव्ह हा मूर्ख आणि गुन्हेगार दोन्हीही आहे. अर्थात केवळ तार्किक बुद्धीवर विसंबून तो वागत होता. अंतःकरणाचा कौल त्याने घेतला नाही म्हणून मी असे म्हणतो असे नाही, तर स्वतःच्या वैयक्तिक फायद्यासाठी त्याने तिला ठार मारले होते म्हणून मी त्याला मूर्ख आणि गुन्हेगार म्हणत आहे. साध्य उदात्त असले की साधने कोणती आहेत हे पाहाण्याचे कारण नाही हेच राजकीय नीतीचे एकमेव तत्त्व पूर्वी होते आणि आतासुध्दा आहे. जे कुणी याच्यापेक्षा वेगळे सांगतात ते फक्त वायफळ बडबड करीत असतात. माझ्या दृष्टीने त्यांच्या तसल्या बडबडीला यत्किंचितही किंमत नाही..... पक्षाच्या आदेशावरून संपासाठी पैसा हवा म्हणून किंवा पक्षाच्या वतीने बेकायदा छापखाना काढायचा आहे म्हणून जर का त्या म्हातारीचा मुडदा रास्कोलनिकॉव्हने पाडला असता तर समीकरण बरोबर आहे असे मी सुद्धा म्हणालो असतो. परंतु त्या परिस्थितीत ही कादंबरीच लिहिली गेली नसती. कारण तिच्यात हाताळलेला प्रश्नच तेव्हा गैर ठरला असता आणि जर का ही कादंबरी लिहिली गेली नसती तरीही जगाचे काही बिघडले नसते....'

यावर रुबार्शोव्ह काहीच बोलत नाही. त्याच्या डोक्यात अद्याप मघाचाच प्रश्न घुमत असतो. गेल्या काही महिन्यातला आणि दिवसातला एकूण अनुभव विचारात घेता आज जर का आर्लोव्हाला मृत्यूकडे धाडण्याचा प्रसंग असता तर मागच्याप्रमाणे तिला आपण मृत्यूकडे धाडले असते का याच प्रश्नात तो अद्यापी गुंतून होता. त्याच्या मनाचा निश्चय होत नव्हता. तर्कशुद्ध पद्धतीने विचार केल्यास ऐव्हानॉव्हचे म्हणणे बरोबर होते. नेहमीचा अदृश्य प्रतिस्पर्धी मौन पाळून होता. फक्त एक चमत्कारिक अस्वस्थपणाने त्याला घेरले होते आणि त्याही बाबतीत ऐव्हानॉव्हचे म्हणणे खरे ठरत होते. माणसाच्या मनात राहून त्याला वेळोवेळी विरोध करणारे त्याचे दुसरे मन किंवा अदृश्य प्रतिस्पर्धी समोरासमोर येऊन कधीच युक्तिवाद करीत नाही. माणूस बेसावध असतो तेव्हाच तो त्याच्यावर हल्ला करतो असे ऐव्हानॉव्ह बोलला होता नि ते अगदी बरोबर होते.

(ऐव्हानॉव्ह) : 'मतप्रणालींचा (आयडिऑलॉजीज्) घोळ घातलेला मला अजिबात आवडत नाही. मानवी नैतिक आचारशास्त्रासंबंधी फक्त दोन मतप्रवाह अस्तित्वात असू शकतात आणि दोन्ही परस्परविरूद्ध आहेत. पैकी एक ख्रिस्ती धर्मप्रणीत आणि दया, क्षमा, शांतीचा पुरस्कार करणारा, भूतदयावादी. ख्रिस्ती मतप्रणालीप्रमाणे व्यक्ती परम पवित्र आहे. तिचा हक्क सर्वात वरचा. गणिताचे नियम व्यक्तीला लागू नाहीत. गणिताच्या आकड्याच्या भाषेत मनुष्यप्राण्याचा विचार होऊ शकत नाही. असा या मतप्रणालीचा ठाम विश्वास. दुसऱ्या मतप्रणालीचा प्रारंभच मुळी उद्दिष्ट सामुदायिक असल्यास, ते उद्दिष्ट साध्य करण्यासाठी कसलेही साधन वापरावे या सिद्धांताने होतो. समाजाच्या हितासाठी व्यक्तीचा बळी देण्यास हरकत नाही एवढेच फक्त ही मतप्रणाली सांगत नाही. तर तसेच केले पाहिजे अशी सक्ती सुध्दा ही मतप्रणाली करते. या मतप्रणालीच्या मताने संपूर्ण समाजाशी तुलना करता व्यक्तीला कोठल्याही प्रकारचे स्वतंत्र हक्क असू शकत नाहीत. समाजाचे हित विचारात घेता प्रयोगशाळेत प्रयोगासाठी वापरतात त्या जिवंत सशाइतकीही किंमत व्यक्तीला नाही किंवा फक्त तेवढीच किंमत व्यक्तीला आहे अशी ही भूमिका आहे. पहिल्या प्रकारच्या भूमिकेला जर का प्राणीव्यवच्छेदन विरोधी नीतीशास्त्र असे नाव आपण दिले तर दुसऱ्या प्रकारच्या भूमिकेला प्राणीव्यवच्छेदन नीतीशास्त्र असे नाव देता येईल. बिलंदर तसेच बुद्धिहीन आणि पढतमूर्ख लोक तात्विक चर्चा करताना या दोन भूमिकांमधे गोंधळ करतात. तथापि प्रत्यक्ष राजकीय व्यवहाराशी संबंध येताच संदिग्ध भूमिका टाकून निःसंदिग्ध भूमिका धारण करावी लागते. ज्याना सत्ता राबवावी लागते त्याना कळते की या दोन भूमिकांपैकी कुठल्यातरी एकीची निवड केल्यावाचून गत्यंतर नाही, आणि अपरहिर्यपणेच लोक दुसऱ्या भूमिकेकडे वळतात. जगाच्या इतिहासाकडे वरवर नजर टाकली तरी हे समजून येईल. ख्रिस्ती धर्माची स्थापना झाल्यावर ख्रिस्ती धर्माच्या व ख्रिस्ताच्या नावाने आजवर ज्या अनेक राजवटी होऊन गेल्या त्यापैकी एकातरी राजवटीने ख्रिस्ती धर्माची व ख्रिस्ताची शिकवणूक अंमलात आणल्याचे तू मला दाखवू शकशील काय ? असं एकही उदाहरण दाखविता येणार नाही याबद्दल माझी खात्री आहे. जेव्हा जेव्हा आणीबणीचे प्रसंग उद्‌भवले, आणि राजकारणात हमेशाच आणीबाणीचे प्रसंग आणता येतात, तेव्हा तेव्हा परिस्थिती असाधारण आहे. अशा असाधारण परिस्थितीत देशाच्या रक्षणासाठी असाधरण इलाजच योजणे आवश्यक आहे असा युक्तिवाद केला गेला आहे. जेव्हा कधी राष्ट्रे आणि वर्ग अस्तित्वात आले तेव्हापासून ते थेट आजतागायतपर्यंत राष्ट्रांना आणि वर्गांना आत्मसंरक्षणाचा कांगावा करीतच दिवस काढावे लागले आहेत. मतलब हा की काही ना काही कारण काढून प्रत्येक राष्ट्राने आणि वर्गाने मानवतावाद अंमलात आणण्याचे कर्तव्य नेहमीच उद्यावर ढकलले आहे....'



अनुक्रमणिका

ऐव्हानॉव्हच्या या प्रवचनावर रुबाशॉव्हने फक्त खांदे उडवून उत्तर दिले. काही क्षणांनी मग रुबाशॉव्ह उद्‌गारला की, 'मानवतावाद आणि राजकारण, व्यक्तीच्या प्रतिष्ठेबद्दल आदर आणि मानवजातीची प्रगती यांचे एकमेकांशी जमण्यासारखे नाही हे ही मान्य करतो. हिंदुस्थानच्या दृष्टीने गांधी ही हिंदुस्थानवरीव आपत्ती होय हे सुध्दा मी मान्य करतो. साधतशुचितेचा अति आग्रह धरला की राजकारणात षंढपणा पदरी येतो हे सुद्धा मी मान्य करतो. पण हे नकारांच्या बाबतीतले मतैक्य झाले. मानवतावादी नीतीशास्त्राऐवजी दुसऱ्या नीतीशास्त्राची कास धरली तर शेवटी आपण कोठे पोहोचतो ते आता पाहू या......'

(ऐव्हानॉव्ह) : 'कोठे पोहोचतो ?'

(रुबाशॉव्ह) : आमच्या सुवर्णयुगाचा विचका झाल्याचे तुला दिसत नाही काय? विचका भयंकर विचका. अगदी सत्यनाश. हा सत्यनाश कोणी केला ? नि कसा केला?'

(ऐव्हानॉव्ह) : 'असेल, सत्यनाश असेल, विचका असेल, पण त्याचा दोष तत्त्वज्ञानाच्या माथी मारण्याचे कारण नाही. तो दोष ज्यानी तत्त्वज्ञान राबविले त्यांचा होता. फ्रेंच राज्यक्रांती ज्यानी घडविली तो ग्राशी (Gracei), सेंट झुस्ट (लुई अन्त्वान ले ऑ - १७६७–९४) याना क्रांतीकारक कोण म्हणेल ? हे सगळे शिकाऊ उमेदवार होते. क्रांतीचा त्यानी निव्वळ बट्याबोळ केला। आजतागायतची हरएक क्रांती ही नैतिक कल्पनांच्या दडपणाखाली काम करणाऱ्या शिकाऊ क्रांतीकारकांनी केली आहे. साहजिकच त्या क्रांतीचे वाटोळे झाले तर त्यात नवल नाही. चांगल्यावर भरवसा ठेवून ते वागले आणि अनुभवाने शहाणे होऊ शकले नाहीत, म्हणून त्यांचा शेवटी नाश झाला. इतिहासातले आम्ही पहिले लोक की जे तर्कशुद्ध पद्धतीने विचार करून क्रांती करावयास निघालो आहोत.'

(रुबाशॉव्ह) : 'बरोबर, बरोबर. आमचा सगळा कारभार तर्काला धरून चालतो हे खरे आहे. इतका तर्काला धरून की शेतकऱ्यांमधे जमिनीचे समान व न्याय्य वाटप करणे सोयीचे व्हावे म्हणून आम्ही कृत्रिम दुष्काळ पाडला आणि त्या कृत्रिम दुष्काळात फक्त एका वर्षाच्या अवधीतच पन्नास लाख शेतकरी आणि त्यांची बायकामुले याना तडफडत मरू दिले. औद्योगिक क्षेत्रातील मजुरांची पिळवणूक थांबली पाहिजे या इच्छेने आम्ही इतके उत्तेजित बनलो की जवळ जवळ एक कोटी माणसांना आम्ही विषारी हवेच्या आर्क्टिक प्रदेशात आणि पूर्वेकडच्या जंगलांमधे मरण्यासाठी वेठबिगारीच्या कामावर धाडून दिले. रोमन काळात रोमन राज्यकर्ते ज्याप्रमाणे गुलामांना वागवीत तशा थाटात. आमचा कारभार इतका काही तर्काला धरून चालतो की, आमचा जर कशाबद्दल आपापसात

मतभेद झाला तर तो मतभेद मिटविण्यासाठी प्रतिस्पर्ध्यांचा गळा घोटणे एवढा एकमेव मार्ग आम्हाला सुचतो. कारण फाशी हा आमच्या युक्तिवादाच्या भात्यातला एकमेव बाण असतो आणि आम्ही तो सर्वांवर चालवतो. मग आमचा मतभेद पाणवुडया मोठ्या असाव्यात की छोट्या असाव्यात याबद्दल असो. अथवा खत कोठल्या प्रकारचे वापरायचे याच्याबद्दल असो किंवा इंडोचायनामधे पक्षाने कोठले धोरण स्वीकाराले या संबंधात असो. मतभेद कोठल्याही प्रकारचा नि बाबतीतला असो. आमचा अखेरचा उपाय मतभेद दाखविणाराच्या आयुष्याची इतिश्री हाच होय. मतभेत व्यक्त करणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांची मान छाटणे हा मतभेदावरचा आमच्या जवळचा एकमेव इलाज. मतभेदावर दुसरा इलाज आम्हाला माहीत नाही. गणितात अल्पशी गफलत झाली तरी फासावर चढावे लागेल अथवा तुरुंगाच्या कोठडीत आयुष्य काढावे लागेल या कायम भीतीखाली यंत्रविशारद काम करतात. हातून छोटीशी चूक घडली तरी त्यासाठी आपणास जबाबदार धरतील व आपला जीव घेतील या भीतीपोटी राज्यकारभारातले वरिष्ठ अधिकारी प्रत्येक चुकीचे खापर कनिष्ठांच्या डोक्यावर कसे फोडता येईल याची चिंता करीत काम करतात. नि कनिष्ठांना देशोधडीला लावतात. ललित शैलीचा थाट कोणत्या प्रकारचा आहे या प्रश्नाचा निकाल लावण्यासाठी आमचे कवी गुप्त पोलिसांचे साहाय्य घेतात आणि एकमेकाना दोषी धरण्यासाठी झटतात. आविष्कारवादी म्हणतात की, निसर्गवादी प्रतिक्रांतीवादी आहोत. तर निसर्गवादी आविष्कारवाद्यांवर तसाच उलटा आरोप करतात. भावी पिढ्यांचे आयुष्य सुखात गेले पाहिजे का कल्पनेने आम्ही इतके काही भारलो गेलो आहोत की ती कल्पना अमलात यावी म्हणून चालू पिढीला आम्ही असे धारेवर धरले आहे की कष्ट काढता काढता या पिढीचे आयुष्य निदान पाव शतकाने तरी घटले आहे. देशाचे अस्तित्व सतत टिकून राहावे म्हणून आम्ही इतके काही बेचैन बनलो आहोत की, देशात आम्ही कायमची आणीबणी पुकारली असून नवा प्रत्येक कायदा तात्पुरता असावा यासाठी डोळ्यात तेल घालून जपत आहोत. हे कायदे अगदी उघडपणे क्रांतीच्या उद्दिष्टांच्या विरोधी आहेत. क्रांतीपूर्व काळात राहाणीमानाची जी पातळी होती तिच्यापेक्षाही आजचे राहणीमान खाली घसरले आहे. कामगारांची एकूण स्थिती आणि काबाडकष्टाची परिस्थिती पूर्वीपेक्षाही दयनीय झाली आहे. शिस्तीला छळाचे स्वरूप आले असून शिस्त अत्यंत अमानुष बनली आहे. साम्रज्यवादी देशांमधे कामगारांना कामाचा आनंद मिळत नाही. एकाच प्रकारचे काम त्यांना वर्षानुवर्षे करीत राहावे लागते. काम ही शिक्षा वाटावी अशी परिस्थिती तेथे असते असे आम्ही म्हणत होतो. परंतु साम्राज्यवादी देशातील मजुरापेक्षाही आपल्याकडच्या मजुराची परिस्थिती अधिक बिकट आहे. फाशीच्या शिक्षेसाठी किमान वय आम्ही बारापर्यंत खाली आणले आहे. स्त्री–पुरुष संबंधांविषयीचे आमचे कायदे इंग्लंडमधल्या कायद्यांपेक्षासुध्दा कर्मठ, प्रतिगामी व संकुचित मनोवृत्तीचे निदर्शक आहेत. हुकूमशाही



अनुक्रमणिका

देशातील विभूतीपूजा आपण समजू शकतो. परंतु आमच्या तथाकथित कम्युनिस्ट राजवटींच्या देशातील विभूतीपूजा त्याच्यापेक्षाही अनाकलनीय आहे. आमच्या वृत्तपत्रसंस्था आणि शिक्षणसंस्था सर्रास लष्करशाही, एकांतिक मताग्रह, सांप्रदायिकता, एकछापीपणा, पोकळ देशाभिमान आणि दारुण अज्ञान यांचे संगोपन करण्यासाठी झटत आहेत. सरकार 'हम करोसे कायदा' असे वागत आहे. नि आमच्या सरकारच्या हातात आज इतकी सत्ता एकवटली आहे की इतिहासात पूर्वी तसे कधीही घडले नव्हते. वृत्तपत्रस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य, देशात कोठेही जाण्याचे व राहाण्याचे स्वातंत्र्य ही स्वातंत्र्ये त्यानी नामशेषच केली आहेत व ते पाहून एखाद्याला असे वाटावे की 'मानवी स्वातंत्र्याचा जाहीरनामा' यासारखी गोष्ट कधी घडलीच नव्हती. आमच्या देशात आम्ही अवाढव्य पोलीस खाते तयार केले आहे, आणि पोलीस खबऱ्यांची तर आम्ही जणू नवी राष्ट्रीय संस्थाच बनविली आहे. शारीरिक व मानसिक छळाच्या आधुनिक क्लुप्त्या आणि अद्ययावत यंत्रणा आम्ही पोलीस खात्याच्या हवाली केल्या आहेत. मूक, गरीब आणि दुःखाने आक्रोश करणाऱ्या जनतेला चाबकाखाली बडवीत आम्ही सुखाकडे चालवले आहे. परंतु दुर्दैव असे की हे सुख कोणते आहे नि त्याचा प्रकार काय आहे यापैकी काहीही त्या जनतेला समजत नाही. कारण सुख कशास म्हणावे नि कशास नाही याची व्याख्या देशातल्या आम्हा विद्वान मंडळींनी केली आहे. चालू पिढीची सगळी शक्ती केवळ क्रांती यशस्वी करण्यात खर्ची पडली आहे. या पिढीपाशी आता शक्ती अजिबात उरलेली नाही. जनता निःसत्व आणि शक्तीहीन झाली आहे. तिच्या अंगात त्राण म्हणून अजिबात उरलेले नाही. दुःखाने आर्त स्वरात विव्हळणारा, शरीर व मनाने पंगू झालेला, जीवनाबद्दल उदासीन बनलेला, यज्ञाच्या वेदीवरचा मांसाचा लिबलिबित थंड गोळा या पलीकडे या जनतेत आता काहीही अधिक उरलेले नाही. महाशय ऐव्हानॉव्ह, साध्य नजरेसमोर ठेवून जो हेतुवाद (कॉन्झिक्वेन्शिॲलिझम, टिलिऑलॉजी) किंवा साध्य विचारात घेऊन जो कार्यक्रम जारी केला होता त्याचे हे परिणाम आपण पाहू शकत नाही काय ? यालाच तुम्ही तुमची प्राणी व्यवच्छेदन नीतिमत्ता म्हणना ना ! माझ्या दृष्टीला मात्र काही वेगळेच दिसत आहे. मला तर वाटते की ज्याला बळी देण्यात आले आहे त्या बळीच्या अंगावरची कातडी तुमच्या प्रयोगकर्त्यांनी सोलून बाजूला काढली आहे नि तो मुका प्राणी स्वतःच्याच रक्ताच्या थारोळ्यात मरणाची वाट पाहात तडफडत तडफडत पडला आहे.....'

(ऐव्हानॉव्ह) : 'वा ! त्यात काय झाले ? तुला अद्‌भूत आश्चर्यकारक असे यात काही दिसत नाही काय ? याच्यापेक्षा आधिक आश्चर्यकारक असे आजवर जगात काही घडले होते काय ? मानवजातीच्या अंगावरची जीर्ण कातडी सोलून काढून मानवजातीला आम्ही नवी कातडी देत आहोत. हळव्या मनाच्या लोकांचे ते काम नाही.



अनुक्रमणिका

परंतु मला आठवते की एकेकाळी तुला स्वतःलासुद्धा या कामात प्रचंड उत्साह होता. अलिकडेच तुझ्यात असा कोणता बदल घडून आला आहे की ज्याच्यामुळे तू एखाद्या आजीबाईसारखा वागू लागला आहेस ? पूर्वी कधीच तू असा नव्हतास !'

यावर 'ज्या दिवशी माझे नाव घेऊन बोग्रॉव्हने ती आर्त किंकाळी फोडली त्या दिवसापासून मी असा बनलो असे उत्तर देण्याचा रुबाशॉव्हचा विचार होता. परंतु त्या उत्तरामधे काही राम नाही असे त्याचे त्यालाच जाणवले म्हणून ते उत्तर न देता तो बोलू लागला की, 'तुझेच रूपक चालू ठेवून बोलायचे तर मी असे म्हणेन की या पिढीच्या शरीरावरची त्वचा सोलून काढण्यात तुम्ही यशस्वी झाला आहात आणि तुमचा तो पराक्रम माझ्या डोळ्याने मी पाहात आहे. परंतु जुन्या त्वचेवर ज्या नव्या त्वचेचे रोपण आपण केले असे तुम्ही सांगत आहात ती नवी त्वचा मी तर कोठे पाहू शकत नाही.

प्रयोगशाळेतील प्रयोग तुम्ही हाताळता तसाच इतिहाससुद्धा तुम्हाला हाताळता येईल अशी तुमची कल्पना दिसते. परंतु तुमच्या प्रयोगशाळेत केले जाणारे प्रयोग आणि इतिहासाच्या प्रयोगशाळेतले प्रयोग या दोन प्रयोगांमधे प्रचंड फरक आहे. तुमच्या प्रयोगशाळेत एकच प्रयोग तुम्ही पुन्हा पुन्हा करू शकता, नि प्रयोग बिघडला वा फसला तरी कोणाचे काही फारसे बिघडत नाही. परंतु इतिहासाच्या प्रयोगशाळेत एक प्रयोग फक्त एकदाच केला जाऊ शकतो. एकदा प्रयोग फसला की फसला. तो प्रयोग मागे घेता येत नाही अथवा फिरूनही करता येत नाही. मात्र त्या प्रयोगामुळे जे नुकसान घडून येते ते कायमचे असते. मानवी प्रयोगशाळेतले प्रयोग नि इतिहासाच्या प्रयोगशाळेतले प्रयोग यातला मुख्य फरक हा होय. दाँताँ आणि सेंट झुस्त यांना फक्त एकदाच फासावर चढविता येते आणि देशाच्या रक्षणासाठी छोट्या पाणबुडयांऐवजी मोठ्या पाणबुड्याच अधिक चांगल्या हे मागाहून लक्षात आले तरी त्याचा कॉम्रेड बागोरॉव्हला फायदा काय ? त्याचा जीव गेला तो गेलाच. तो काही पुन्हा भरून येत नाही.'

रुबाशॉव्हच्या भाष्यावर ऐव्हानॉव्ह प्रश्न विचारतो की, 'आपल्या वक्तव्यावरून असा निष्कर्ष काढायचा का की सगळे कर्मच वाईट ? नि म्हणून कर्मसंन्यास घेऊन माणसाने हात जोडून स्वस्थ बसावे. आपल्या कृतीचे सर्वच्या सर्व गर्भित परिणाम आपण आधी पाहू शकत नाही किंवा त्या परिणामांचे गणित मांडता येत नाही म्हणून सर्वच कर्म त्याज्य ठरते काय ? प्रत्येक कर्म करीत असताना आम्ही आमचे डोके पणास लावतो. याच्यापेक्षा आधिक आम्ही काहीच करू शकत नाही. आमच्या प्रतिस्पर्ध्यांच्या डेऱ्यात (म्हणजे लोकशाही देशात) इतकी सुद्धा नीती कोणी पाळत नाही. तेथे कोठलाही मूर्ख म्हातारा सेनापती हजारो सैनिकांच्या प्राणांशी अगदी सहजासहजी खेळ करू शकतो.



अनुक्रमणिका

समजा त्याची चूक उघडकीस आली तरी त्याचे स्वतःचे नुकसान त्यात काहीच होत नाही. त्याला सेवेतून कमी करतात नि घरी बसवतात. पूढे काही नाही. प्रतिगाम्याना आणि क्रांतीच्या विरोधकांना नीती अनीतीची चाड तर नसतेच परंतु नैतिक प्रश्नसुध्दा त्याना कधी पडत नाहीत. एखादा सुल्ला (लुसिअेस कॉर्नलिअस ख्रि. पू. १३८-७८ - रोमन हुकूमशहा आणि सेनानी. सामान्य जनतेचे राजकीय अधिकार कमी करून सिनेटचे अधिकार त्याने वाढवून दिले.) एखादा **कोलशाहक** (अलेक्झांडर व्हॅसिलेविच १८७५ - १९२०- रशियन राज्यक्रांतीनंतर रशियाचा ॲडमिरल म्हणून बोल्शेविकांबरोबर झगडला. बोल्शेविकांनी त्याला फाशी दिले.) किंवा एखादा **गालिफेत** डोस्टोव्हस्कीची क्राइम ॲंड पनिशमेंट कादंदरी व त्यातील रास्कोलनिकॉव्ह या पात्राचे चरित्र वाचत आहे अशी कल्पना करून बघ. पहिली गोष्ट म्हणजे अशी कल्पनाच तुला करता येणार नाही. कारण ही मंडळी असली कादंबरी वाचणारच नाहीत ते तुला माहित आहे. आणि जर का त्यानी ती वाचली तर तुला जे नैतिक प्रश्न पडले ते त्याना कधीही पडणार नाही. तुझ्यासारखे विचित्र प्राणी फक्त क्रांतीच्या बनातच आढळायचे. इतरांना असल्या नैतकि कल्पनांची फारशी मातबरी वाटत नाही.'

'पक्षात इतकी वर्षे घालविलेल्या तुझ्यासारख्या अनुभवी इसमाला असल्या रोगाबद्दल अकस्मात तिटकारा वाटू लागावा हे मला तरी अगदीच भोळसटपणाचे वाटत आहे. दरवर्षी साथीच्या रोगात आणि नैसर्गिक प्रकोपात काही कारण नसता लाखो माणसे मृत्यूमुखी पडतात. असे असता इतिहासातला कधी नव्हे असा आशादायक प्रयोग करताना लाख माणसे बळी जाणार म्हणून आम्ही पाऊल मागे घ्यावे ? छे ! तशी तर कुपोषणाने आणि क्षयासारख्या रोगाने कोळशाच्या व अन्य खाणीत, भाताच्या खाचरात, कापसाच्या मळ्यातून कित्येक लक्ष मनुष्ये प्रतिवर्षी मरतच असतात. त्यांच्यासाठी कोणी रडत नाही की, इनकी माणसे कशासाठी मेली, का मेली, कशाने मेली याचीही कोणी दखल घेत नाही. परंतु आमच्या प्रयोगात खरोखरच उपद्रवकारक ठरणारी हजार पाचशे माणसे जर का आम्ही गोळया घालून ठार केली तर लगेच जगभरच्या मानवतावाद्यांच्या तोंडाला संतापाने अगदी फेस येतो. देशात दांडगुळाप्रमाणे जगणाऱ्या कित्येक निरुपयोगी शेतकऱ्यांचा आम्ही निकाल लावला नि त्याना उपासमारीने मरू दिले ही गोष्ट अगदी खरी आहे. परंतु ती शस्त्रक्रिया होती व ती शस्त्रक्रिया अटळ होती आणि आम्ही ती फक्त एकदाच केली. झालेल्या गतवर्षीच्या अवर्षणाच्या वर्षात याच्यापेक्षाही कितीतरी माणसे केवळ निरर्थकपणे मरत. त्याचा विचार कोणीच करीत नाही. चीनमधल्या पीतनदीला पूर आला की हजारो, नव्हे लाखो माणसे पटापट मरतातच की नाही ? मानवजातीवर प्रयोग करताना त्यात किती माणसे प्राणास मुकतात याची पर्वा निसर्ग कधी करतो काय ? मग मानवजातीला

स्वतःवर प्रयोग करायच्या हक्क का असू नये ?'

'सजीव प्राण्यांवर प्रयोग करावयास विरोध करणाऱ्या संस्था ज्या प्रचारपत्रिका प्रसिध्द करतात त्या तू कधी वाचल्या आहेस काय ? त्यातील वर्णने खूपच हृदयद्रावक आणि डोळ्यात पाणी उभी करणारी असतात. रस्त्यावरच्या एखाद्या कुत्र्याचे पित्ताशय शस्त्रक्रियेने कापून काढल्यावर ते कुत्रं कसं करुण केकाटते आणि त्याच्यावर शस्त्रक्रिया करणाऱ्या शस्त्रवैद्याचेच हात कसे चाटते याचे वर्णन वाचल्यावर बोग्रॉव्हची अवस्था पाहून तुला जशी शिसारी आली तशीच शिसारी कुणालाही येईल. परंतु सजीव प्राण्यांवर प्रयोग करता कामा नयेत असे म्हणणाऱ्या मंडळींचे बोलणे ऐकून जर कुणी कॉलरा, विषमज्वर, घटसर्पादि रोगांवरची रोगप्रतिबंधक लसच तयार करायचे थांबविले तर काय होईल याचा विचार तू कधी केला आहेस काय ?

एवढ्या प्रवचनानंतर ऐव्हानॉव्ह थांबतो. त्याला खात्री असते की रुबाशॉव्ह परत एकदा वळणावर येईल आणि गुन्ह्यांचा कवुलीजबाब देईल.

दुसरी सुनावणी संपते.

## तिसरी सुनावणी :—

केव्हा केव्हा सत्य उघडून दाखविण्याऐवजी ते अस्पष्ट, अध्याहृत ठेवण्यासाठी शव्दांचा उपयोग करावा लागतो. तथापि ही गोष्ट इतक्या सफाईने करावी लागते की असे काही केले आहे याचा संशयसुद्धा कोणाच्या मनात उद्‌भवता कामा नये. यदाकदाचित बिंग फुटले नि खरी गोष्ट बाहेर आली तर खऱ्या गोष्टीवर पांघरून घालण्यासाठी आपल्या पोतडीत हजार सबबी आणि दहा हजार स्पष्टीकरणे हजर असावीत.' माकियावेली : (राफेल्लो गिरोलामीला दिलेल्या सूचनांमधून)

'शपथ घेऊच नका. स्वर्गाची नाही की पृथ्वीची नाही. जेरुसलेमची नाही की स्वतःच्या डोक्याची नाही. जो बोलायचे ते स्पष्ट बोला. 'होय' असेल तर 'होय' म्हणा,'नाही' असेल तर 'नाही' म्हणा. याच्यापेक्षा जो कोणी अधिक बोलतो त्याच्या मनात काही काळेबेरे असले पाहिजे हे निश्चित' (नवा करार — मॅथ्यू ५ श्लोक ३७)

तिसऱ्या सुनावणीतला महत्त्वाचा संघर्ष वरील दोन परिच्छेदांमधून व्यक्त होतो.

एन्. एस्. रुबाशॉव्हच्या रोजनिशीतली काही पाने. तुरुंगातला विसावा दिवस.

'इतिहास हा एखाद्या झोक्यासारखा आहे. हा झोका कधी या बाजूला वर जातो,

कधी त्या बाजूला. व्लादिमिर बोग्राव्ह झोक्यावरून बाजूला सरकला. दीडशे वर्षांपूर्वी फ्रेंच क्रांतीकारकानी बास्टियचा तुरुंग फोडला नि आतले कैदी मुक्त केले इतिहासाचा झोका पुन्हा एकदा हलू लागला. खूप काळ तो एका जागी थबकून होता. जुलमी राजवटीला लाथ मारून तो दुसऱ्या टोकाकडे निघाला. वरवर तरी असे दिसत होते की मिळालेल्या धक्क्यामुळे मधे कुठेही न थांवता झोका आता पार मानवी स्वातंत्र्याच्या उत्तुंग निळ्या आकाशात प्रवेश करणार. पुढील शंभर वर्षे उदारमतवाद आणि लोकशाहीच्या प्रांगणात तो वरवर चढतच राहिला. परंतु, पाहा, पुन्हा एकदा झोक्याची गती कमी होऊ लागली. झोका जवळपास शिखरापाशी पोहोचला. इतिहासाचा नवा क्रांतीक्षण आला. झोका काही क्षण जागच्या जागी स्थिर राहिला आणि त्याने उलटी दिशा घेतली. खूप खूप वेगाने ज्या झपाट्याने आधी तो वर गेला होता त्याच झपाट्याने आता तो खाली येऊ लागला, दुसऱ्या टोकाकडे जाऊ लागला. नव्हे, प्रवाशांना त्याने स्वातंत्र्याकडून नव्या जुलमी राजवटीकडे नेऊन पोहोचविले. झोका घट्ट पकडून ठेवण्याऐवजी जे कुणी वर उंच आकाशाकडे पाहात राहिले त्याना घेरी आली नि ते खाली कोसळले.'

'इतिहासाच्या झोक्यावर असताना घेरी येऊन तोल जाऊ नये असे ज्यांना वाटत असेल त्याना झोक्याच्या गतीचा कायदा अवगत करून घ्यावा लागेल. असे वाटते की मानवी इतिहासाचा झोका एकतंत्री हुकूमशाहीकडून लोकशाही स्वातंत्र्याकडे आणि लोकशाही स्वातंत्र्याकडून एकतंत्री हुकूमशहीकडेच धावत असतो.'

'एखादा लोकसमुदाय किती प्रमाणात मानवी स्वातंत्र्य कमावू शकतो आणि राखू शकतो हे तो लोकसमुदाय राजकीयदृष्ट्या किती प्रगल्भ झाला आहे याच्यावर ठरते. ही राजकीय प्रगल्भता कधीही एका सलग रेषेत निष्पन्न होत नाही. ती कोणामधे कमी असते, कोणामधे जास्त असते. वर जो इतिहासाच्या झोक्याचा कायदा सांगितला त्याच्यावरून हे अगदी स्पष्ट होत आहे. व्यक्ती राजकीयदृष्ट्या अधिकाधिक परिपक्व होऊ शकते. समुदायाच्या बावतीत तसेच घडले याची खात्री नाही. याचा साधा अर्थ हा की समुदायाची राजकीय वाढ कशी होते हे ठरविणारा क़ायदा अधिक गुंतागुंतीचा आहे.'

'आपले खरे हित कशात आहे हे ओळखण्यावर समुदायाची राजकीय प्रगल्भता अवलंबून असते. याचा अर्थ समाजातील उत्पादित संपत्ती कशी उत्पादित होते आणि तिचे वाटप कसे होते याचे काही ना काही ज्ञान आवश्यक ठरते. हे ज्ञान असेल तरच स्वतःचे खरे हित आणि खरे हितसंबंध कोणते हे तो लोकसमुदाय ओळखू शकेल. याचा अर्थ असा की संपूर्ण समाजव्यवस्थेचे एकूण स्वरूप आणि त्या समाजव्यवस्थेची कार्यपद्धती समजून घेण्यावर लोकशाही पद्धतीने स्वतःचे नियंत्रण करण्याची लोकसमुदायाची क्षमता अवलंबून आहे. लोकसमुदायाचे हे आकलन व्यापक असेल तर तो समुदाय लोकशाही राजवट

अंमलात आणील. उलट हे आकलन मुळीच नसेल अथवा अगदीच जुजबी असेल तर तो हुकूमशाहीच्या अंमलाखाली जाईल.'

'आता असे आहे की तंत्रवैज्ञानिक सामग्रीमधे होणारा हरएक बदल ताबडतोब अर्थव्यवस्थेमधे गुंतागुंत निर्माण करतो आणि नव्या घटकांच्या जन्माला कारणीभूत होतो. समाजव्यवस्थेची मांडणी बदलून टाकतो. प्रारंभी काही काळ तरी जनतेला हे बदल अजिबात समजत नाहीत. तंत्रवैज्ञानिक प्रगती एक पाऊल पुढे जाते तर लोकसमुदायाचे बौद्धिक आकलन आणि प्रगती जागच्या जागी राहाते. एका शब्दात तंत्रवैज्ञानिक प्रगती आणि लोकांची बौद्धिक प्रगती यात नेहमी एका पावलाचे अंतर असते. परिणामी राजकीय आकलनाच्या पाऱ्यामधे काही अंशांचा फरक तयार होतो. हा फरक दूर करण्यासाठी आणि राजकीय आकलन व तांत्रिक प्रगती या दोघातील अंतर भरून काढण्यासाठी कधी कधी दशके उलटावी लागतात. कधी कधी तर अनेक पिढ्यासुद्धा जाव्या लागतात. तेव्हा कोठे तो समाज राजकीय आकलनाच्या आणि तांत्रिक प्रगतीच्या समान पातळीवर येतो. म्हणजेच राजकीय दृष्टया प्रौढ बनतो. संस्कृतीच्या खालच्या पायरीवर असताना स्वतःचा कारभार स्वतः चालविण्याला जितका लायक होता तितका आता संस्कृतीच्या वरच्या पायरीवरचा कारभार चालविण्यासाठी लायक बनतो. सारांश जनतेची राजकीय परिपक्वता अबाधित आणि परिस्थितीनिरपेक्ष परिमाणाने मोजता येत नाही. ती नेहमी सापेक्ष परिमाणानेच मोजावी लागते. उदा. ज्या विशिष्ट सांस्कृतिक स्तरावर तो समाज असेल त्या स्तराच्या तुलनेवर ती मोजावी लागते.'

'एकूण बाह्य भौतिक परिस्थिती आणि जनतेची जाण ही दोन्ही जेव्हा समपातळीत येतात, म्हणजेच स्वतःचे आर्थिक हितसंबंध कोणते, समाजातील उत्पादनव्यवस्था आणि वितरणव्यवस्था कशी काम करीत आहेत इत्यादी गोष्टींचे जनतेचे ज्ञान जेव्हा तांत्रिक प्रगतीच्याच पातळीला येते तेव्हा साहजिकच शांततेच्या मार्गाने अथवा बळाच्या साहाय्याने लोकशाही कारभार प्रस्थापित केला जातो. हा लोकशाही कारभार सामान्यतः तांत्रिक विद्येतील नव्या उडीपर्यंत टिकतो वा टिकावा. तांत्रिक विद्येने नवी उडी मारली- उदा. हाताने चालविल्या जाणाऱ्या मागाऐवजी यंत्राने चालविता येणाऱ्या मागाचा शोध लागला- की लगेच राजकीय परिपक्वतेच्या दृष्टीने जनता एक पायरी खाली राहाते. साहजिकच अशावेळी या ना त्या स्वरूपातील अनियंत्रित नेतृत्वाच्या प्रस्थापनेला पोषक परिस्थिती उत्पन्न होते. कधी कधी असे नेतृत्व आवश्यकसुद्धा बनते.'

'एखाद्या देशातील वरच्या स्तरावरील गुंतागुंतीची भौतिक परिस्थिती व अर्थव्यवस्था आणि बौद्धिकदृष्ट्या खालच्या अप्रगल्भ स्तरावरची जनता यांच्यातला संबंध



अनुक्रमणिका

कसा असतो किंवा हा प्रकार काय आहे हे एका उदाहरणाने स्पष्ट करता येईल. कालव्यातून बोटी वर चढविण्यासाठी किंवा खाली उतरविण्यासाठी झडपवाले पाण्याचे कमरे असतात. बोट वर चढविण्यासाठी जेव्हा झडपवाल्या कमऱ्यात घेतात तेव्हा त्या कमऱ्यातील पाण्याची पातळी आवश्यक पातळीपेक्षा कमी असते व म्हणून ती बोट खालच्या पातळीवर राहाते. हळूहळू त्या विशिष्ट कमऱ्यात पाणी सोडले जाते. पाणी सोडले गेले की त्या कमऱ्यातील पाण्याची पातळी वाढू लागते. ही पातळी आवश्यक तितकी वाढली की ती बोट उचलली जाते आणि पलिकडच्या कमऱ्यात पोहोचते. परंतु बोटीचे वर उचलणे आभासात्मक असते. कारण त्याच्याही पलिकडच्या कमऱ्यातील पाण्याची पातळी आणखी वर असल्याने बोट तेथपर्यंत पोहोचविण्यासाठी पुन्हा एकदा ज्या कमऱ्यात बोट थांबलेली असते त्या कमऱ्यात पाणी सोडून त्यातल्या पाण्याची उंची वर न्यावी लागते. झडपांच्या कमऱ्याच्या भिंती म्हणजे तंत्रवैज्ञानिक सांस्कृतीची पातळी. उत्पादन साधनांवरील नियंत्रणाची प्रत्यक्ष स्थिती. तर त्या कमऱ्यातील पाण्याची पातळी म्हणजे जनतेच्या बौद्धिक आकलनाची स्थिती. जनतेच्या बौद्धिक स्थितीचाच फक्त विचार करणे चूक आहे. कारण झडपवाल्या कमऱ्यातील पाण्याची तुलनात्मक पातळी काय आहे याला वरील गणितामध्ये सर्वात अधिक महत्त्व आहे. ही पातळी खूप वरची असेल नि जनतेच्या आकलनाची पातळी खूप खाली असेल तर राजकारणाचे सगळे गणित बिघडू शकते. वाफेच्या इंजिनाचा शोध लागताच भौतिक प्रगतीचा वेग वाढला. पण भौतिक प्रगती जोराने होऊ लागली तरी बौद्धिक प्रगती मागे पडत गेली. लोकांचे राजकीय व्यवहाराचे आकलन फारसे सुधारले नाही. इतिहासाच्या दृष्टीतून भौतिक प्रगतीचा विचार केल्यास औद्योगिक युग अद्यापी ऐन तारुण्यात आहे असे म्हणता येईल. या औद्योगिक युगाची आर्थिक रचना अतिशय गुंतागुंतीची आहे. प्रस्तुत आर्थिक रचना समजण्याची क्षमता विद्यमान जनतेपाशी नाही. आर्थिक रचना आणि जनतेची आकलनशक्ती या दोघात फार मोठी दरी तयार झाली आहे. यावरून असे ध्यानात येईल की ख्रिस्तपूर्व दोनशे वर्षांच्या दरम्यान किंवा सरंजामशाही संपता संपता जनतेची सापेक्ष राजकीय आकलनशक्ती जेवढी होती तेवढीसुद्धा ती आता नाही. त्या वेळच्या आकलनशक्तीशी तुलना करता ती खूपच कमी आहे.

जनतेची आकलनशक्ती एका ठाम आणि निश्चित वेगात वाढत राहाते असे गृहीत धरण्यात समाजवाद्यांनी फार मोठी चूक केली होती. परिणामतः ऐतिहासिक लंबकाने जेव्हा अलिकडचा झोका घेतला तेव्हा ते पूर्णपणे संभ्रमित झाले. कारण त्यांची अपेक्षा अशी होती की जनता स्वतःचा राज्यकारभार स्वतःच्या मनाने करणार आहे. एका शब्दात तिला लोकशाही राज्यव्यवस्था हवी आहे. प्रत्यक्षात मात्र क्रांतीनंतर जनता हुकूमशहांच्या तालावर नाचत होती, स्वेच्छेने नाचत होती. हे स्वतःच स्वतःचे हातपाय

तोडून घेणे समाजवाद्यांच्या आकलनाच्या पलिकडचे होते. आम्हाला असे वाटत होते की बाहेरची भौतिक परिस्थिती बदलत आहे नि त्या बदलत्या परिस्थितीला अनुरूप अशा प्रकारे जनतेचे आत्मचित्रसुद्धा बदलत आहे; जनतेची जाण बदलत्या जगाशी संधान ठेवून आहे. ही एक अगदी साधी व सरळ अशी प्रक्रिया आहे. फार तर या दोन प्रक्रियांमधे काही वर्षांचे अंतर राहील. प्रत्यक्षात हे अंतर शतकांच्या हिशेबात मोजावे लागेल. वाफेच्या इंजिनाचे एकूण परिणाम काय आहेत हे युरोपच्या जनतेला आज देखिल पूर्णपणे कळलले नाहीत आणि पचलेले सुद्धा नाहीत. भांडवलशाही हा खरोखरच काय प्रकार आहे हे जनतेला समजून येण्याच्या पूर्वीच भांडवलशाही अर्थव्यवस्था बुडालेली असेल.

क्रांतीच्या पितृदेशाबद्दल म्हणाल तर विचार करण्याचे जे नियम इतर देशातल्या जनतेला लागू आहेत तेच तेथल्याही जनतेला लागू आहेत. शरीराने ते वरच्या स्तरावर पोहोचले आहेत ही गोष्ट खरी. परंतु मनाने ते अजून खालच्याच स्तरावर आहेत. जुनी अर्थव्यवस्था निदान त्याना थोडीबहुत तरी समजत होती. पण ज्या नव्या अर्थव्यवस्थेने त्या जुन्या व्यवस्थेची जागा घेतली आहे ती तर त्याना अजिबातच कळत नाही. खालच्या बौद्धिक स्तरावरून वरच्या बौद्धिक स्तरावर जाण्याची ही कष्टप्रद आणि क्लेषदायक प्रक्रिया पुन्हा नव्याने सुरू झाली पाहिजे.

'बहुधा अनेक पिढ्या गेल्यानंतर वस्तुस्थिती एकूण काय व कशी आहे याचा उलगडा जनतेला होऊ लागेल. खरे तर क्रांती घडवून आणून खुद्द याच जनतेने ही नवी वस्तुस्थिती जन्माला घातली होती. परंतु वस्तुस्थिती आणि जनतेचे आकलन या दोहोत नेहमी जो फरक राहातो त्याचा हा परिणाम असून त्याच्यावर तातडीचा इलाज नाही.

'जनतेची बौद्धिक पातळी उंचावून नव्या अर्थव्यवस्थेचा उलगडा तिला होइस्तवर लोकशाही राज्यकारभार ही एक अशक्य गोष्ट आहे; आणि व्यक्तीला देता येणारे नागरिक स्वातंत्र्य तर इतर देशातील स्वातंत्र्यापेक्षा आणखीच कमी असणार आहे. असो तर हे सगळे घडून येईस्तवर आमच्या पुढाऱ्यांना जनतेला हिशोबात न घेताच राज्य करावे लागेल. जुन्या उदारमतवादी राज्यकारभाराचे निकष विचारात घेतल्यास हा प्रकार कोणाला आवडण्यासारखा नाही. परंतु त्याला इलाज नाही. प्रचलित राज्यव्यवस्थेकडे पाहात असताना जे काही क्रौर्य, ढोंग, अधःपात चटकन नजरेस पडत आहे तो केवळ वर ज्या ऐतिहासिक प्रक्रियेतल्या कायद्याचा निर्देश केला त्या कायद्याचा अटळ दृश्य परिणाम आहे. हे कसे घडले हा प्रश्न विचारणारे अनेक आहे. परंतु हे का घडले हा प्रश्न विचारणारे कोणी नाहीत. हे कसे घडले हा प्रश्न विचारणाऱ्या त्या सर्व मूढांचा आणि सौंदर्यवाद्यांचा धिक्कार असो. परंतु एकूण आर्थिक व्यवस्थेच्या तुलनेत जनता आजच्यासारखी बौद्धिकदृष्ट्या मागासलेली असताना प्रस्थापित राज्यकारभाराला नि



अनुक्रमणिका

सत्ताधाऱ्यांना जे विरोध करतात त्यांचासुद्धा तसाच धिक्कार असो.

जनता जेव्हा बौद्धिकदृष्ट्या प्रगल्भ असते, अर्थव्यवस्थेचा कारभार कसा चालला आहे, त्यात आपले स्थान कोणते, भूमिका कोणती, सहभाग किती व कसा इत्यादी गोष्टी जेव्हा तिला व्यवस्थित समजत असतात, तेव्हा प्रस्थापित सत्तेविरुध्द जनतेकडे कौल मागणे हे विरोधकांचे निहित कर्तव्य आणि कामच आहे. परंतु जनता अप्रगल्भ असताना जनतेच्या अंतिम निर्णयाच्या नावाने जनतेला आवाहन करण्याचे काम फक्त झुंडीचे पुढारीच करू शकतात. कारण त्याना जनतेच्या बुद्धीला आवाहन करायचे नसते. त्याना फक्त जमावाच्या हलक्या भावना पेटवायच्या असतात. अशा परिस्थितीत क्रांतीवादी विरोधकांपुढे फक्त दोनच पर्याय उरतात. जनतेचा पाठिंबा मिळणार नाही हे मनाशी पक्के करून दंड उभारून तडाफडकी सत्ता काबिज करणे किंवा आपल्या हातून काही होणार नाही हे ओळखून निराशेच्या भरात ऐतिहासिक प्रक्रियेच्या फेरीतून सरळ बाहेर पडून जाणे. दुसऱ्या शब्दात "एकही शब्द न उच्चारता देह ठेवणे."

'आणखी तिसरा सुद्धा पर्याय आहे. वरील दोन पर्यायांइतकाच हा तिसरा पर्यायदेखिल तर्कसंगत आहे आणि आमच्या देशात त्याचे एक खास तत्त्वज्ञानच बनविले गेले आहे. आपली स्वतःची मते प्रत्यक्षात आणता येण्याची शक्यता मुळीच नाही असे दिसून येताच सरळ स्वतःची तत्वेच नाकारणे किंवा दडपून टाकणे. सामाजिक उपयुक्तता हा आमचा नैतिक दंडक असल्याने आणि आपल्या कृत्याचे सामाजिक परिणाम काय होतात याच्यावरच आमचे वर्तन ठरत असल्याने पक्षाच्या संघटनेत टिकून राहाणे किंवा यशाची शक्यता नसताना निरर्थक विरोध करीत राहाणे या दोन पर्यायांपैकी पहिला पर्याय आम्हाला अधिक प्रतिष्ठेचा वाटतो. म्हणून आम्ही आमची खरी मते नाकारून वा दडपून टाकून आम्ही पक्षात राहाणे पसंत करतो. यशाची खात्री नसताना जीवाचा आटपिटा करणे हे आम्हाला हास्यास्पद वाटते.

स्वतःचा मानापमान, प्रतिष्ठा, काही काही प्रकारच्या मानभंगांबद्दल इतर ठिकाणी असणारे पूर्वग्रह, मानसिक थकव्याची वैयक्तिक भावना, घृणा, शरम, खंत या प्रकारच्या भावनाना मूळापासून चाट द्यावयास हवी......'

* * *

रुबाशॉव्हच्या उलटतपासणीचे काम पुढे ग्लेटकिन नावाच्या अधिकाऱ्याकडे जाते. ऐव्हानॉव्हला गोळी घालून ठार करण्यात आले होते. त्याच्यावरचा आरोप : रुबाशॉव्हला सहानुभूती दाखविण्याचा प्रयत्न.

मधे रुबाशॉव्ह आणि कैदी नं. ४०२ संदेशाची देवाणघेवाण करतात.

(रुबाशॉव्ह) : 'मी माफी लिहून द्यायचे ठरविले आहे.'

(नं. ४०२) : 'त्यापेक्षा फाशी जाणे चांगले.'

(रुबाशॉव्ह) : 'हा ज्याच्या त्याच्या वैयक्तिक तत्त्वाचा प्रश्न आहे.'

(नं. ४०२) : 'मला वाटले होते तू असे करणार नाहीस. तू अपवाद आहेस, नियम नाहीत. परंतु तू सुध्दा त्यातलाच निघालास. काय हो, तुम्हाला जरासुध्दा स्वाभिमान नाही काय ?'

(रुबाशॉव्ह) : 'स्वाभिमानाच्या तुमच्या माझ्या कल्पनेमधे फरक आहे.'

(नं. ४०२) : 'स्वतःच्या मताच्या रक्षणासाठी प्राणार्पण करण्याची तयारी दाखविणे म्हणजे स्वाभिमान दाखविणे.'

(रुबाशॉव्ह) : 'मानसन्मानाच्या सार्वजनिक कल्पनांमधे अडकून न पडता सतत समाजाच्या उपयोगी पडणारी कृत्ये करत राहाणे यातच मनुष्याचा खरा मान साठविला आहे.'

* * *

(नं. ४०२) : 'मान म्हणजे औचित्यपूर्ण वर्तन. उपयुक्त वर्तन नव्हे.'

(रुबाशॉव्ह) : 'औचित्यपूर्ण वर्तन या शब्दांचा अर्थ काय ?'

(नं. ४०२) : 'तुझ्या जातीच्या लोकांना ते कधीच कळणार नाही.'

(रुबाशॉव्ह) : 'औचित्याच्या जागी आम्ही चिकित्सक बुद्धीची स्थापना केली आहे.'

* * *

रुबाशॉव्ह माफीचे पत्र देतो. पत्रात लिहिलेले असते की, 'पक्षाच्या मध्यवर्ती मंडळाचा एक माजी सभासद, माजी लोकनियुक्त मंत्री, क्रांतीसेनेच्या दोन क्रमांकाच्या विभागाचा सेनपती, जनतेच्या शत्रूच्या विरुद्ध शौर्य गाजविल्याबद्दल सरकारकडून क्रांत्युत्तर सन्मानदर्शक किताब मिळविणारा एन्. एस्. रुबाशॉव्ह वर दिलेल्या कारणांसाठी आपली क्रांतीविरोधी भूमिका पूर्णपणे टाकून देत आहे आणि स्वतःच्या चुका जाहीरपणे



अनुक्रमणिका

कबूल करीत आहे.

* * *

रुबाशॉव्ह स्वतःशीच विचार करीत असतो. 'ऐव्हानॉव्हने बहुधा आपला तुलनात्मक राजकीय परिपक्वतेविषयीचा सिद्धांत वाचला असावा.... क्रांतीच्या आधी आणि नंतरही काही काळपर्यंत हा सिद्धांतकार, हा प्रत्यक्ष राजकारणपटू अशा प्रकारचा फरक अस्तित्वात नव्हता. कोणत्या प्रसंगी कोणती कारवाई करायची या गोष्टी त्या काळात क्रांतीची भूमिका समोर ठेवून उघड चर्चेतून ठरविल्या जात. अंतर्गत यादवीच्या काळात लष्करी डावपेच कोठले आखायचे किंवा शेतकऱ्यांचे धान्य ताब्यात घेताना पिकाची मागणी कशी करायची, जमिनीचे विभाजन आणि फेरवाटप कसे घडवून आणायचे, नवीन चलनाचा प्रसार करताना कोणती दृष्टी ठेवायची, उद्योगधंद्याची पुनर्रचना कोणत्या तत्त्वावर करायची ह्या आणि अशाच प्रश्नांवर निर्णय घेताना क्रांतीचे तत्त्वज्ञान समोर ठेवून कार्यकारी समितीने आपले कर्तव्य पार पाडले होते. त्या काळात ज्या राजकीय चर्चा होत असत. त्या चर्चांवर लाखोंचे जीवित आणि स्वास्थ्य अवलंबून होते नि क्रांतीचे भवितव्यसुद्धा त्याच्यावर अवलंबून होते.

'आता ते बहुतेक नेते दिवंगत झाले आहेत. शिवाय क्रांतीचे तत्त्वज्ञानच असे सांगते की, क्रांतीनंतर प्रस्थापित झालेली राजवट जसजशी अधिकाधिक स्थिरावत जाते तसतसे राज्यकारभार चालविताना राज्यकर्त्यांना अधिकाधिक कठोर उपाय योजावे लागतात आणि जर का कठोर उपाय ते योजणार नाहीत तर क्रांती घडत असताना ज्या शक्तींना त्यानी मोकळे केलेले असते, त्या शक्ती वरचढ बनून क्रांतीवर उलटतात आणि क्रांतीचा घात करतात.

नंबर एक हा जुलूमशाहीच्या विषयातला तज्ज्ञ आहे. म्हणून तो 'जसा हुकूम तसा विचार' या प्रकारची शिस्त जनतेला लावू शकतो आणि जनतेच्या विचारशक्तीवर स्वतःची हुकूमत आणू शकतो. त्याच विषयातले आजवरचे सगळे तज्ज्ञ नंबरच्या एकच्या पुढे केवळ नवशिके विद्यार्थी आहेत. निव्वळ नामधारी तज्ज्ञ. त्यांनी जनतेच्या फक्त कृतींवर हुकूमत गाजविता आली. 'जसा हुकूम तशी क्रिया' एवढेच फक्त ते साध्य करू शकले.

* * *

रुबाशॉव्हने माफीपत्र दिल्यावर आणखी तीन दिवस उलटतात. दोन वाजता दोन गणवेषधारी अधिकारी त्याला झोपेतून जागे करतात. त्यांच्या कमरेला रिव्हॉल्वर

असते. आपल्या मागे येण्याची आज्ञा त्याला ते देतात. मात्र त्याल ते कोठे घेऊन जात आहेत हे सांगत नाहीत. ऐव्हानॉव्हच्या कारकीर्दीत असे कधीही घडले नव्हते.

कबुलीजबाबावर सही करायचे रुबाशॉव्ह ठरवितो. गणवेषधारी अधिकारी रुबाशॉव्हला एका खोलीत नेऊन उभे करतात. खोलीत तीव्र प्रकाशाचे दिवे आहेत. टेबलाच्या मागे ग्लेटकिन आहे. रुबाशॉव्ह खोलीत शिरताच दरवाजा बंद होतो. रुबाशॉव्हची इच्छा, त्याची जबानी ऐव्हानॉव्हने घ्यावी. ग्लेटकिन डाफरतो, 'ते शक्य नाही.' जबानी घेणाऱ्या मॅजिस्टेटची नेमणूक वरिष्ठा अधिकारी करतात. जबाब देण्याचं तुम्ही नाकारले तर त्याचा वेगळाच अर्थ होईल ..... तुम्ही माफीपत्र दिले आहे. ...... ''

रुबाशॉव्हच्या डोळ्यावर मुद्दाम प्रखर प्रकाशझोत पाडण्यात येतो. त्याचा छळ करण्यासाठी. रुबाशॉव्ह तक्रार करतो. ग्लेटकिन त्याची तक्रार उडवून लावतो. रुबाशॉव्हच्या डोक्यात विचार येतात की, ............. या ग्लेटकिनचे वय काय बरे असावे ? असेल छत्तीस, सदतीस. यादवी युद्धात त्याने भाग घेतला असावा. पण जेव्हा क्रांतीला प्रारंभ झाला तेव्हा हा केवळ छोकरा असेल. क्रांतीचा महापूर ओसरून गेल्यावर ही पिढी वयात आली. विचार करावयास शिकली. या पिढीला कुठली आली आहे परंपरा? भूतकाळाशी बांधून ठेवतील अशा स्मृती तरी तिच्याशी कुठल्या आल्याहेत ? नाळीशिवाय जन्माला आलेली ही पिढी.... परंतु असं असलं तरी आज याच पिढीचं खरं ठरत आहे. आपल्या स्वाभिमानाच्या कल्पना खोट्या आहेत. जुन्या जमान्याबरोबरची, जुन्या कल्पनाबरोबरची आमची नाळ तोडूनच टाकली पाहिजे. आत्मप्रतिष्ठेच्या पोकळ कल्पना, जुन्या जगातील दांभिक सभ्यता सर्व टाकून द्यावयास हवे. खोटा अहंकार टाकून देऊन, स्वतःची यत्किंचितही गय न करता शेवटपर्यंत पक्षाच्या उपयोगी पडेल असे वागणे यातच खरी प्रतिष्ठा आहे.'

प्रथम रुबाशॉव्हच्या मनाचा संताप होतो. हळूहळू संताप ओसरतो. त्याला शांत वाटू लागते. इतकी विलक्षण मानसिक शांती आजवर त्याने केव्हाच अनुभविली नव्हती.

रुबाशॉव्ह उद्‌गारतो, ''पक्षाला ज्याच्यापासून फायदा होईल असे काहीही करावयास मी तयार आहे..... माझ्यावरचे आरोप एकदा तपशीलवार वाचून दाखवा पाहू. आजपर्यंत मला ते वाचून दाखविण्यात आलेले नाहीत.'

ग्लेटकिनची हालचाल पाहून रुबाशॉव्हच्या ध्यानात येते की आपण जबानी देणार हे ऐकून ग्लेटकिन स्वतःवर अत्यंत खूष झाला आहे. आयुष्यात मोठ्यातला मोठा विजय आपण आज मिळविला असे त्याला वाटत आहे. वरची जागा मिळविण्यासाठी

त्याला या विजयाचा फायदा होणार होता. त्याचवेळी रुबाशॉव्हच्या हे सुद्धा ध्यानात येते की आपली मान जशी त्याच्या ताब्यात आहे, तशी त्याचीही मान आपल्या ताब्यात आहे. 'तुझ्या नाड्या आता माझ्या हातात आहे' असे तो स्वतःशीच म्हणतो देखिल. कबुलीजबाब द्यायचे मी नाकारले नि मरण पत्करायचे ठरविले तर माझ्या बरोबर तुला सुद्धा मी खाली खेचू शकतो. पण पुढील क्षणी हा विचार तो बाजूला सारतो.

ग्लेटकिन आरोपपत्राचे वाचन सुरू करतो. रुबाशॉव्हची कल्पना हा एक सरकारी कामाचा भाग असेल अशी. केवळ फार्स. परंतु ग्लेटकिन जसजसा आरोपपत्र पुढे वाचत जातो तसतसे रुबाशॉव्हचे आश्चर्य वाढत जाते. एकापेक्षा एक भयंकर आरोप त्याच्यावर केलेले असतात. रुबाशॉव्हच्या मते खुळसटपणाचे. तरी आरोपच नंबर एकच्या, जिवावर रुबाशॉव्ह उठला. त्याला ठार मारण्याचा कट त्याने केला. क्रांतीशी द्रोह करून क्रांतीचा विध्वंस करण्याचा त्याचा बेत होता. अनेक ठिकाणी रुबाशॉव्हला 'सैतानी' हे विशेषण लावण्यात आले होते.

आरोपपत्राचे वाचन संपते. वाचन संपताच ग्लेटकेन रुबाशॉव्हला म्हणतो की, 'तुमच्यावरचे आरोप तुम्ही ऐकले. आता कबुलीजबाब द्या.'

रुबाशॉव्ह ग्लेटकिनच्या चेहऱ्याकडे पाहाण्याचा प्रयत्न करतो. परंतु त्याच्या डोळ्यावर सोडण्यात आलेल्या प्रखर प्रकाशझोतामुळे त्याला ते जमत नाही. उलट त्याला पापण्या मिटून घ्याव्या लागतात. काहीतरी खरमरीत उत्तर द्यावे असेही त्याच्या मनात येते. पण तो मन आवरतो आणि अगदी हलक्या आवाजात बोलू लागतो.

'सरकारने जे धोरण जाहीर केले त्या धोरणावाचून गत्यंतरच नव्हते हे माझ्या ध्यानात न आल्याने मी आजवर विरोधी भूमिका धारण केली; हा माझा गुन्हा झाला हे मी कबूल करतो. मी भावनेच्या आहारी गेलो आणि भावनेच्या आहारी गेल्याने ऐतिहासिक अपरिहार्यतेच्या मी विरोधी वागू लागलो हाही माझा गुन्हा मला कबूल आहे. सरकारने ज्या विरोधकांना गोळी घालून ठार केले त्यांचा आक्रोश ऐकून माझ्या मनात दया उत्पन्न झाली. त्यामुळे त्यांना ठार मारणे हे सयुक्तिकच नव्हे तर क्रान्तीच्या यशासाठी अटळ होते ही गोष्ट मी विसरून गेलो. क्रांतीकार्यामध्ये कोण किती उपयुक्त आहे आणि कोण किती उपद्रवकारक आहे हे पाहाण्याऐवजी कोण कितपत दोषी आणि कोण निर्दोष या प्रश्नाला मी अधिक महत्त्व दिले. हा माझा अपराध मी मान्य करतो आणि शेवटी मी हे मान्य करतो की, अखिल मानवजातीच्या कल्याणापेक्षा व्यक्तीच्या कल्याणाला मी अधिक महत्त्व दिले हा माझा सर्वात मोठा अपराध होता.'

पुढे 'माझ्या चुकीचे रूपांतर जर प्रत्यक्ष कृतीत घडून आले असते तर तो क्रान्तीवर मोठाच आघात झाला असता नि क्रांतीला त्याच्यामुळे धोका उत्पन्न झाला असता. इतिहासामधे काही प्रसंग मोठे आणीबाणीचे असतात. अशाप्रसंगी प्रत्येक विरोधाचा अर्थ पक्षात फूट आणि शेवटी यादवी युद्ध असा असतो. जनता जेव्हा राजकीय दृष्ट्या परिपक्व झालेली नसते तेव्हा मानवतावादी दौर्बल्य आणि उदारमतवादी लोकशाही म्हणजे क्रान्तीचे मरणच होय. दुर्दैवाने पक्षाला विरोध करताना याच दोन गोष्टींची मागणी मी करीत होतो. वरवर पाहता या दोन्ही गोष्टी हव्याहव्याशा वाटणाऱ्या असल्या तरी प्रत्यक्षात त्या अगदी मारक होत्या. देशात व्यापक लोकशाही प्रस्थापित व्हावी, दहशतीच्या वातावरणाचे उच्चाटण व्हावे, पक्ष संघटनेतील शिस्तीचा अतिरेक कमी व्हावा, सभासदांना थोडेबहुत मतस्वातंत्र्य मिळावे. थोडक्यात हुकूमशाही राजवटीचे रूपांतर उदारमतवादी राजवटीत व्हावे म्हणून मी मागणी करीत होतो. सद्यःस्थितीत या मागण्या क्रांतीला अपायकारक ठरणाऱ्या होत्या आणि स्वभावतः क्रांतीविरोधी होत्या हेही मी मान्य करतो........'

'याच अर्थाने आणि फक्त याच अर्थाने माझे वागणे क्रांतीविरोधी होते असे तुम्ही म्हणू शकाल. याच्या उपर जे भलतेसलते गुन्हेगारी आरोप माझ्यावर तुम्ही ठेवले आहेत त्यांच्याशी माझा काहीही संबंध नाही.'

(ग्लेटकिन) : 'तुम्हाला जे काही सांगायचे होते ते सांगून संपले काय ?' हे शब्द ग्लेटकिनने इतक्या काही कठोर आवाजात उच्चारले की रुबाशॉव्ह त्याच्याकडे पाहातच राहिला.

ग्लेटकिनच्या मताने 'माझे वागणे क्रान्तीविरोधी होते, पण इतर जे अनेक गुन्हे माझ्या नावाला तुम्ही चिकटवू पाहात आहात ते मी केलेले नाहीत' हे रुबाशॉव्हचे म्हणणे खोटे होते. पूर्वी दोन खेपेला त्याने असेच सांगून स्वतःची मान बचावली होती आणि याही खेपेस तो तेच करू पाहात होता. म्हणून या खेपेस रुबाशॉव्हवर पक्षाची दिशाभूल करण्याचा प्रयत्न केला असा नवा जादा आरोप ठेवण्यात येतो.

पूर्वी रुबाशॉव्हने खोटे का सांगितले या प्रश्नाला रुबाशॉव्हचे उत्तर 'स्वतःची मान बचाविण्यासाठी नव्हे तर आपले हेतू साध्य करण्यासाठी अवसर मिळावा म्हणून हे केले असे असते.'

ग्लेटकिन आणि रुबाशॉव्ह या दोघांमध्ये आणखी प्रश्नोत्तरे झडतात. ग्लेटकिनचे प्रश्न एकापेक्षा एक कठोर असतात. भरीस रुबाशॉव्हच्या डोळ्यांवरचा प्रखर प्रकाशझोतांचा मारा सुरूच असतो. रुबाशॉव्हला स्वस्थ झोपही मिळू दिलेली नसते. मेंदू



अनुक्रमणिका

थकल्याने रुबाशॉव्हचे डोळे मधूनमधून मिटतात. त्याच्या डोक्यातील गोंधळ वाढतो. सत्य कोठले आणि असत्य कोठले हेच त्याला कळेनासे होते. विरोधविकासवादी नाटके आणि हिरोदी असत्ये यांच्या कचाट्यात तो अडकतो. सत्य आणि आभासांच्या संधीप्रकाशात त्याला खरे काय हे ओळखता येईनासे होते. जो जो अंतिम सत्याकडे पोहोचण्यासाठी पाऊल पुढे टाकावे, तो तो सत्याची चाकरी करण्यासाठी पाऊल पुढे टाकलेल्या असत्याशी गाठ पडावी तसे त्याचे होते. या खेपेस तो सत्य सांगत होता. परंतु आपण सांगत आहोत ते सत्य आहे, ती बनावट थाप नाही हे ग्लेटकिनला पटवून कसे देणार हा त्याच्यापुढचा खरा प्रश्न होता. 'आपली बाजू मांडा, बोलत राहा, शब्द उच्चारत राहा. शब्द, शब्द, शब्द. समोरच्याला आपले म्हणणे पटवून देण्याचा प्रयत्न करा. एकमेव खरी इच्छा झोपी जावे. झोप मिळाली तर. झोप, शांत झोप. आणखी काही नको.'

अखेरीस थकून रुबाशॉव्ह ग्लेटकिनला सांगतो की, 'पक्षाशी मी एकनिष्ठ आहे एवढेच मला शेवटी सिध्द करायचे आहे.'

त्यावर ग्लेटकीन त्याला म्हणतो की, 'त्यासाठी तुम्हाला संपूर्ण कबुलीजबाब द्यावा लागेल. असा कबुलीजबाब तुम्ही दिला तरच आमची खात्री पटेल की, तुम्ही पक्षाशी एकनिष्ठ आहात. तुम्ही जे भयंकर स्वरूपाचे गुन्हे केले आहेत त्याची स्पष्ट आणि जाहीर कबुली तुम्ही द्या. ही कबुली तुम्ही दिली की पक्षाच्या धोरणाला विरोध केला म्हणजे त्याचे परिणाम काय होतात हे तुमच्या उदाहरणावरून लोकांना समजेल.'

(रुबाशॉव्ह) : 'पण जे गुन्हे मी केले नाहीत त्याची कबुली मी केव्हाच देणार नाही.'

(ग्लेटकिन) : ' छे, छे, असं तुम्ही कसं कराल ?' ग्लेटकिनच्या उद्‌गारात तीव्र उपहास होता आणि रुबाशॉव्हलाही ते जाणवले.

येथून पुढे रुबाशॉव्हला केसबद्दल फारसे व्यवस्थित काहीच आठवत नाही. आपण झोपी गेलो असे मधेच त्याला वाटत राहते. तेवढ्यात त्याला एक स्वप्नही पडते. नंतर जेव्हा तो जागा होतो, तेव्हा चौकशी कमऱ्यात आणखी एकजण उभा असतो. हा नवा इसम म्हणजे ओट-फाटका. रुबशॉव्हविरुध्द साक्ष देण्यासाठी त्याला आणलेले असते. तो साक्ष देतो की, नंबर एकवर विषप्रयोग करण्यासाठी रुबाशॉव्हने त्याला चिथावणी दिली होती. प्रथम रुबाशॉव्ह त्याला ओळखत नाही. ग्लेटकिन आणखी तपशील देतो. रुबाशॉव्हला ओळख पटते की, हा ओट–फाटका म्हणजे त्याच्या प्रोफेसर मित्राचा मुलगा. ओटफाटका रुबाशॉव्ह आणि त्याचा बाप या दोघात झालेला संवाद ग्लेटकिनला म्हणून दाखवतो.

(रुबाशॉव्ह) : 'तुम्हाला वाटत आहे की, नंबर एकच्या पापाचा घडा कधीतरी भरेल नि त्याचे सहकारीच त्याला सत्तेवरून दूर करतील किंवा त्याला राजीनामा द्यावयास भाग पाडतील. परंतु असे घडणार नाही. ही तुमची कल्पना खुळेपणाची आहे. नंबर एक सत्तेवर आहे हा केवळ ऐतिहासिक अपघात नव्हे. नंवर एकच्या स्वभावाचे काही विशेष आहेत. आपल्या हातून चूक कधी घडूच शकणार नाही हा त्याचा ठाम विश्वास आहे आणि हा विश्वास इतका अढळ आहे की, आपण काही केले तरी चालेल असे त्याला त्यामुळे वाटते. तो उलट्या काळजाने वागू शकतो याचा उगम त्याच्या या विश्वासात आहे. साहजिकच स्वतः होऊन सत्ता तो कधीच सोडणार नाही. त्याला जबरदस्तीने, प्रसंगी हिंसात्मक उपायांनीही तिथून हलवावयास हवे. या बाबतीत पक्षाकडून काही मदत मिळेल असेही मानावयास नको. पक्षाच्या सगळ्या नाड्या त्याच्या हातात आहेत आणि नोकरशाहीला त्याने त्याच्या हातातील खेळणे बनविले असल्याने नंबर एक मेला तर त्याच्याबरोबर आपलेसुध्दा मरण ओढवेल हे नोकरशाहीला माहीत आहे.'

ओठफाटक्याचे शब्द ऐकून रुबाशॉव्ह अत्यंत दुःखी होतो. दुःखाने तो विव्हळ बनतो. विचाराच्या भरात त्याची मान खाली जाते. त्याला शंका येते की या तरुण मुलाच्या वडिलांवरोबर संभाषण करीत असताना आपण जे काही बोललो त्याचा या मुलाने चुकीचा अर्थ लावून नंबर एकच्या जीवावर उठण्याचा प्रयत्न केला असावा. मनातल्या मनात रुबाशॉव्हला वाटते की, 'या तरुणाच्या रूपाने माझे तर्कशास्त्रच जणू माझ्या पुढ्यात उभे होते.'

'वीष देऊन नंबर एकला यमसदनास पाठविण्यासाठी चिथावणी देणे' हे आरोपपत्रकातील शब्द आता रुबाशॉव्हला आठवतात नि ओठफाटक्याच्या वडिलांबरोबर गप्पा मारीत असतानाचा संपूर्ण प्रसंग त्याला जसाच्या तसा आठवतो. ओठफाटका समोरच उभा असतो. रुवाशॉव्ह मनात म्हणतो की, 'होय, त्या प्रसंगी जे काही मी बोलले त्याचाच हा तार्किक परिणाम आहे.' हा दुर्दैवी तरुण म्हणजे आपले साक्षात तर्कशास्त्रच होय हा विचार रुवाशॉव्हच्या मनात येतो आणि त्या तरुणाने नंबर एकचा जीव घेण्याचा प्रयत्न खरच केला होता की नव्हता की जीव घेण्याची नुसती योजनाच त्याने आखली होती, की अशी योजनासुध्दा नव्हती आणि त्याला धाकदपटशा दाखवून व त्याचा छळ करून आणि भीती दाखवून माझ्या विरुध्द खोटी साक्ष देण्यासाठी त्याला येथे आणले गेले आहे. यापैकी कोठल्याच प्रश्नात आता त्याला स्वारस्य राहात नाही. सगळ्या चौकशीबद्दल एकाएकी तो बेफिकीर बनतो. या क्षणापर्यंत त्याला ठामपणे वाटत होते की, खोटा शब्दच्छल करून त्याच्या अंगाला गुन्हा चिकटविण्याचा प्रयत्न ग्लेटकिन करीत आहे. परंतु ओठफाटक्याची साक्ष ऐकताच त्याची खात्री पटते की, खरा शब्दच्छल ग्लेटकिन करीत

नव्हता. खरा शब्दच्छल आपण करत होतो. तोवर जो आरोप त्याला बनावट, खोटा वाटत होता तोच आता त्याला खरा, संशयातीत वाटू लागतो. तर्काच्या साखळीतला हरवलेला दुवा त्याला सापडला होता. ओठफाटका हाच तो दुवा होता.

अपराध आपलाच आहे, आपल्याच शब्दामुळे ओठफाटका या कृत्यामधे पडला हे रुबाशॉव्हला पटले तरी एका बाबतीत आता सुध्दा आपल्यावर अन्याय होत आहे असे त्याला वाटत होते.

दरम्यान ओठफाटक्याला ग्लेटकिन त्याच्या कोठडीत धाडतो नि पुन्हा रुबाशॉव्हबरोबर त्याची प्रश्नोत्तरे सुरू होतात.

(ग्लेटकिन) : 'जो आरोप मी तुमच्यावर केला होता तो या किफरच्या (ओठफाटक्याचे नाव) मुख्य मुद्यांच्या बाबतीत सिद्ध होत आहे हे तुम्हाला कबूल आहे काय ?'

(रुबाशॉव्ह) : 'मुख्य मुद्याच्या बाबतीत कबूल आहे. ...... फक्त एका बाबतीत मला शंका आहे ...... आणि ही बाब मला महत्त्वाची वाटत आहे....... त्या काळात ज्या तत्त्वांवर माझा विश्वास होता त्या तत्त्वांना अनुसरून हिंसात्मक कारवाईची गरज आहे व बंड करून सत्ता घेणे भाग पडेल असे मी बोललो ही गोष्ट खरी आहे. परंतु मला राजकीय कारवाई अभिप्रेत होती. व्यक्ती विरुध्दचा दहशतवाद अभिप्रेत नव्हता. कुणाचा खून करावा आणि सत्ता हाती घ्यावी असे मी म्हटले नव्हते.'

(ग्लेटकिन) : 'म्हणजे यादवी युध्दाला तुमची संमती होती.'

(रुबाशॉव्ह) : 'नाही. जनतेने उठाव करावा असे मला वाटत होते.'

(ग्लेटकिन) : 'परंतु त्याची परिणती शेवटी अपरिहार्यपणे अंतर्गत यादवी युध्दातच झाली असती. सत्तेवरच्या व्यक्तीचा खून करून सत्ता हस्तगत करणे किंवा जनतेचा उठाव घडवून आणून सत्ता काबीज करणे या दोन कार्यक्रमांमध्ये तुम्हाला जो फार मोठा फरक वाटत आहे तो हाच काय ? वस्तुतः त्यात फरक काय आहे ? कारण कसेही वागले तरी यातून शेवटी यादवी युद्ध उत्पन्न होणार हे तर उघड आहे.'

ग्लेटकिनच्या उद्गारांवर रुबाशॉव्ह गप्प राहातो. काही क्षणापूर्वी हा मुद्दा त्याला फार महत्त्वाचा वाटला होता. परंतु आता त्याच्याबद्दलही त्याला काही वाटेनासे झाले. किंबहुना आता खुद्द त्याला स्वतःलाच असा प्रश्न पडला की, फक्त यादवी युद्धाचा अवलंब करूनच जर का पक्षीय नोकरशाही आणि तिच्या हातातील प्रचंड यंत्रणा विरोधकांना दूर करता येणार असेल, तर हा मार्ग आणि नंतर एकच्या अन्नात वीष घालून त्याला दूर

करण्याचा मार्ग या दोन मार्गांमधे मोठा फरक तो कोणता ? उलट नंबर एकला वीष घालून ठार केले तर प्रस्थापित जुलमी राजवट लवकर कोसळू शकेल आणि रक्तपातसुद्धा कमी होईल. यादवी युद्धामुळे घडून येणाऱ्या प्रचंड रक्तपातापेक्षा राजकीय हेतूने प्रेरित होऊन घडवून आणलेला खून अधिक निंद्य वा तुच्छ कसा ? त्या दुर्दैवी तरुणाने आपल्या शब्दांचा अर्थ चुकीचा लावला ही गोष्ट खरी. परंतु त्याच्या त्या चुकीमध्ये जेवढी तर्कसुसंगतता होती तेवढी गेल्या काही वर्षातल्या आपल्या वागण्यात नव्हती हेही खरे आहे.

हुकूमशाहीला विरोध करताना त्यातून अंतर्गत यादवी युध्द निर्माण होणार आहे हे आपण लक्षात घेतलेच पाहिजे. ज्यांना हुकूमशाही नको असेल त्यांनी यादवी युद्धाला तयार राहिले पाहिजे. साहजिकच ज्यांना यादवी युध्द नको असेल, यादवी युद्धाची कल्पनासुद्धा ज्यांना सहन होत नाही, त्यांनी विरोधी भूमिका टाकून देऊन हुकूमशाहीला मान्यता दिली पाहिजे.

खूप मागे रुबाशॉव्हने ही वाक्ये लिहिली होती. नेमस्तांच्या विरुद्ध युक्तिवाद करताना त्याने हा मुद्दा वापरला होता. परंतु तोच मुद्दा वापरून ग्लेटकिनने आज त्याचा बौध्दिक पराभव केला होता आणि त्याला गुन्हेगार ठरविले होते. ग्लेटकिन बरोबरचा वाद पुढे चालविण्याची इच्छाच त्याला राहिली नाही. ग्लेटकिनबरोबरच्या वादात आपला पूर्ण पराभव झाला आहे हे त्याला एकापरीने बरेच वाटले. त्याने सुटकेचा निःश्वासही सोडला. क्षणभर त्याला असा भास झाला की, टेबलापलीकडच्या खुर्चीवर बसलेला इसम ग्लेटकिन नसून तो खुद्द नंबर एक आहे नि त्याच्या चेहऱ्यावर मी सर्व काही ओळखतो हे नेहमीचे औपरोधिक हास्य झळकत आहे. मग त्याला आठवण झाली ती सेंट जुस्त, रोबेस्पिअर आदि फ्रेंच राज्यक्रांतीतल्या प्रारंभीच्या खंद्या लढवैय्यांची. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर लगेच जी दलदल माजली, दहशतीचे जे साम्राज्य पसरले आणि बळीचे सत्र सुरू झाले, त्या सत्रामधे सेंट ज्युस्त, रोबेस्पिअर आणि त्याचे सोळा सहकारी या सर्वांची जी आहुती पडली नि त्यांचे देह ज्या एरानसिसच्या स्मशानात गाडले गेले त्या सर्व घटनेची. कारण सेंट जुस्त, रोबेस्पिएर आणि त्यांच्या सोळा सहकाऱ्यांच्या थडग्यावरील शीलालेखावर कोरले होते. Dormir - to sleep - झोप घेणे.

येथून पुढे रुबाशॉव्हचे डोके काम करीनासे झाले. त्याला फारसे काही आठवेना. बहुध त्याला झोप लागली होती.

* * *

मधे किती दिवस उलटून गेले हे सुद्धा रुबाशॉव्हला आठवेना. कधी त्याला ग्लेटकिनबरोबरचे त्याचे संभाषण आठवे. संपूर्ण नाही. तुकड्या तुकड्यात. कितीतरी



अनुक्रमणिका

दिवस हे संभाषण चालले होते. दिवस की आठवडे ? रात्री आणि दिवसा. आरोपीला शरीर आणि मनाने नामोहरम करण्याच्या पद्धतीबद्दल रुबाशॉव्हने ऐकले होते. पण प्रत्यक्ष पाहिले नव्हते. आता मात्र तो त्याचा प्रत्यक्ष अनुभवच घेत होता.

आणखी अठ्ठेचाळीस तास उलटले. रात्र कुठली दिवस कुठला हे देखिल रुबाशॉव्हला समजेनासे झाले. तासभर झोपला न झोपला एवढयात राक्षसी पहारेकऱ्याने त्याला जागे करून ग्लेटकिनपुढे नेऊन उभे केले होते.

ग्लेटकिनपुढच्या पहिल्या जबानीच्या वेळी कबुलीजबाबावर रुबाशॉव्हने सही केली नि त्याला वाटले की हे प्रकरण एकदाचे संपले. दुसऱ्या जबानीच्या वेळी त्याच्या ध्यानात आले की आता कुठे या प्रकरणाची सुरूवात होते आहे. त्याच्यावर सात प्रकारचे आरोप ठेवण्यात आले होते. त्यापैकी फक्त एकाचाच कबुलीजबाब त्याने दिला होता. मनुष्यप्राण्याची जेवढी म्हणून मानहानी होणे शक्य आहे तेवढी आपली झाली आहे असे त्या खेपेस त्याला वाटले. झाले हे काहीच नव्हे, सर्व पुढेच व्हायचे आहे असे त्याला आता वाटू लागले. जितक्या पायऱ्या सत्तेच्या असतात, तितक्याच सत्ताहीनतेच्याही असतात हे त्याला प्रकर्षाने उमजते. विजय जसा डोक्यात जातो तसाच पराभव सुद्धा डोक्यात जातो नि नशा आणतो हेही त्याला उमजते. ग्लेटकिन त्याला पायरीपायरीने खाली ढकलत होता.

अर्थात सगळ्याच्या सगळ्या कबुलीपत्रावर न पाहाता त्याने सही केली असती तर तो सगळ्या त्रासातून एव्हाना मुक्त झाला असता किंवा सगळ्याच्या सगळ्या आरोपांना त्याने नकार दिला असता तरीसुद्धा तेच घडू शकले असते. म्हणजे असे की, दोन्ही पैकी काहीही घडले असते तरी त्याला हात जोडून स्वस्थ बसता आले असते. एका चमत्कारिक, अनाकलनीय भावनेपोटी त्याने या मोहाला नकार दिला होता. रुबाशॉव्हच्या कोशात आजवर 'मोह' हा शब्द ही एक पुस्तकी कल्पना होती. अशी काही खरोखरीची वस्तू असते हेच त्याला तोवर माहित नव्हते. परंतु आता मात्र प्रत्येक वेळी रात्री आणि दिवसा तुरुंगातल्या कोठड्यांच्या मधल्या लांबच लांब कॉरिडॉरमधून पाय ओढत अडखळत प्रवास करताना मोह त्याला साक्षात भेटत होता. 'झोपेचा मोह'. फ्रेंच राज्यक्रांतीनंतरच्या यादवी युद्धामध्ये ज्यांनी डोकी गमावली होती नि ज्या थडग्यात ती डोकी पुरली गेली होती, त्या थडग्यावरचे शब्द-डॉर्मिर-झोप - त्याचा पाठपुरावा करीत होते.

मोह त्याला आवरत नव्हता. एक निरुपद्रवी, मूक मोह. 'झोपी जाणे'. झोपेचा मोह. या मोहाला कसलेही भडक रंग नव्हते आणि तो वैषयिक मोहातही मोडत नव्हता. नि कसल्याही प्रकारच्या बौध्दिक वादाशी त्याचा संबंध नव्हता. मोक्याचे सगळे मुद्दे ग्लेटकिनच्या भात्यात होते. रुबाशॉव्हला जो मोह छळत होता त्या मोहाच्या नामफलकावर



अनुक्रमणिका

फक्त एक संदेश लिहिलेला होता. 'मुकाट्याने मृत्यूला शरण जा.'

कधी रुबाशॉव्हचे मन आणि शरीर जड बने, तर कधी तो पूर्ण शुद्धीवर असे. कधी त्याचे ओठ हलत. मात्र त्याचे शब्द ग्लेटकिनला कधीच ऐकू गेले नाहीत. ग्लेटकिन आपल्या बाह्या सावरी. रुबाशॉव्ह चष्म्याच्या काचा बाहीला घाशी आणि अर्धवट गोंधळलेल्या अवस्थेत मान डोलवी. आपल्याला मोह कोण घालीत आहे हे त्याच्या ध्यानात आले होते. ज्याला रुबाशॉव्ह 'व्याकरणातील कल्पित वस्तू' म्हणत होता तीच कल्पित वस्तू त्याला मोह घालू पाहात होती. त्याला समजेना की आपल्या मूक भागीदाराचे येथे, या खोलीत काय काम ? आणि आपण इतके दिवस या वस्तूचे अस्तित्व विसरून गेलो होतो त्याचे काय झाले ?

ग्लेटकिनची उलटतपासणी चालूच होती. ग्लेटकिन प्रश्न विचारत होता, रुबाशॉव्ह उत्तर देत होता. नवा नवा पुरावा पुढे आणला जात होता. मधेच ग्लेटकिन रुबाशॉव्हला म्हणतो,

'बरे झाले, आम्ही तुम्हाला वेळीच पकडले. कारण त्यामुळे सगळा अनर्थ टाळता आला. तुम्हाला आम्ही पकडले नसते तर एव्हाना देशद्रोहाचे सगळे परिणाम दिसू लागले असते.'

यावर रुबाशॉव्हपाशी उत्तर नव्हते. कारण त्याला माहीत होते की ग्लेटकिनने जर का समजून घ्यायचा प्रयत्न केला असता तर ग्लेटकिनलाही कळले असते की, या वयात रुबाशॉव्ह क्रांती घडवून आणू शकत नाही. तो आता खूप खूप म्हातारा झाला आहे, थकला आहे. पार्टीच्या परंपरेत आणि पार्टीच्या चळवळीत भाग घेण्यासारखे त्याचे वय राहिलेले नाही. मग तो क्रांती कशाची करणार ? विरोधक क्रांतीच्या गोष्टी करीत होते. पण ते केवळ शब्दांचे बुडबुडे होते. वायफळ गप्पांपलीकडे त्या शब्दांना महत्त्व नव्हते. विरोधकांची सगळी चळवळ म्हणजे शब्दांची व्यर्थ वटवट होती. शब्दांपलीकडे त्यात काहीही नव्हते. सत्ताधाऱ्यांशी संघर्ष करण्यात, भूमिगत राहून पक्ष कार्य करण्यात, तुरुंगातल्या दमट कोठड्यातून वर्षेच्या वर्षे काढण्यात त्या सर्वांचे ऐन तारुण्य खर्ची पडले होते. त्यामुळे आता त्यांनी जरी आम्ही बंड करणार असे कितीही रुबाबात म्हटले असले तरी त्यांच्या अंगी ती जुनी शक्ती नि तो उत्साह अजिबात शिल्लक नव्हता. कोठल्याही क्षणी आपला विश्वासघात होईल आणि आपण शत्रुपक्षाच्या हाती सापडू ही अखंड भीती शब्दात बोलून न दाखविता कायम मनातल्या मनात दडपून टाकत राहिल्याने त्यांच्या ठिकाणी पक्षातल्या प्रभावी नेत्याला विरोध करण्याची मानसिक शक्ती अजिबात उरली नव्हती. परागंदा अवस्थेत घालविलेली अनेक वर्षे पक्षसंघटनेतले आपापसातले हेवेदावे

नि झगडे, नीतीअनीतीची चाड न बाळगता सहकाऱ्यानी काढलेला आपल्याच सहकाऱ्यांचा काटा, सतत सहन करावे लागलेले पराभवाचे घाव आणि अंतिम विजयानंतर अल्पावधीत झालेला पक्षाचा अधःपात, या सर्व गोष्टी मुकाट्याने सहन कराव्या लागलयानंतर नंबर एकशी झुंज देण्याइतकी शक्ती तरी जुन्या नेत्यांमधे शिल्लक राहिली असती का ? त्यामुळे फक्त मुकाट्याने मरण पत्करणे एवढी एक गोष्ट रुबाशॉव्ह आणि त्याच्या बरोबरीच्या जुन्या दुजुर्गांच्या हाती उरली होती. तेव्हा बंडाचे त्यांचे सगळे मनसुबे म्हणजे निरर्थक चर्पटपंजरी होती. कारण त्याना देण्यासारखे होते ते सर्व त्यानी पक्षाला देऊन टाकले होते. त्यांच्या रक्ताच्या शेवटच्या थेंबापर्यंत पक्षाने त्यांच्याकडून आपली किंमत वसूल केली होती. आता ते फक्त मरणाची वाट पाहू शकत होते आणि नंतर चिरनिद्रा किंवा कदाचित भावी पिढ्यांनी पुढे मागे त्याना न्याय दिला तर त्या न्यायाची !

* * *

रुबाशॉव्ह त्या ग्लेटकिनरुपी जडबुद्धी आदिमानवाला कोठलाच प्रश्न विचारू शकत नाही. ग्लेटकिनचे सगळे म्हणणे बरोबर होते. परंतु त्याने एक महत्त्वाची चूक केली होती. तो असे समजत होता की, त्याच्यासमोर बसलेला रुबाशॉव्ह हा जुनाच परिचित रुबाशॉव्ह आहे. परंतु तो रुबाशॉव्ह केव्हाच संपला होता. आताचा रुबाशॉव्ह हा त्या जुन्या रुबाशॉव्हची केवळ पडछाया होती. त्या सगळ्या चौकशीचा शेवट हा होता की, चौकशी संपताच रुबाशॉव्हला गोळी घालून ठार करण्यात येणार होते. पण जी कृत्ये त्याने केली होती त्या कृत्यांसाठी नव्हे तर ती जी त्याने करायची बाकी ठेवली होती, जी त्याने केली नव्हती, त्या न केलेल्या कृत्यांसाठी त्याला ठार करण्यात येणार होते. शेवटी हेच खरे की, 'ज्या झेंड्याच्या नावाने तुम्ही घराबाहेर पडता त्या झेंड्यासाठीच तुम्हाला सुळावर चढविण्यात येते.'

* * *

एक दोन दिवसाआड कबुलीपत्रकावर रुबाशॉव्ह सही करीत असतो. अशीच एक सही केल्यानंतर रुबाशॉव्ह ग्लेटकिनला म्हणतो की,

'तुम्हाला मी एक प्रश्न विचारू काय ? कैद्यांना मारझोड करून त्यांच्याकडून कबुलीजबाब मिळविण्याच्या पद्धतीवर तुमचा खूप विश्वास आहे असे मी ऐकले होते. परंतु मला तुम्ही मारझोड केली नाही किंवा माझा प्रत्यक्ष छळही तुम्ही केला नाही हे कसे ?'

(ग्लेटकिन) : 'तुमचा शरीरिक छळ मी का केला नाही असे तुम्हाला विचारायचे आहे काय ? आमच्या फौजदारी कायद्यात ते बसत नाही...... शिवाय काही काही कैदी

असे चिवट असतात की मारहाण केल्यावर ते आपला गुन्हा कबूल करतात. परंतु प्रत्यक्ष कोर्टात मात्र तोच गुन्हा नाकबूल करतात. तुम्ही असल्या लोकांपैकी आहात हे मला माहीत आहे. तुम्ही स्वखुषीने दिलेल्या जबाबाला आमच्यादृष्टीने खरी राजकीय उपयुक्तता आहे.'

* * *

खूप वाद घातल्यानंतर रुबाशॉव्ह कबुलीजबाबावर सही करी. प्रत्येकवेळी असेच घडे. प्रथम बराच वेळ वाद, नव्या गुन्ह्याची कबुली, मग खूप थकून गादीवर पडणे. पण एक प्रकारच्या विचित्र समाधानाने. आणखी तासाभराने आपणाला उठविले जाणार आहे हा विचार डोक्यात बाळगून. प्रत्येक वेळी रुबाशॉव्हच्या डोक्यात फक्त एक आणि एकच इच्छा असे. केव्हातरी एकदा ग्लेटकिन आपणाला मनसोक्त झोपू देईल. अर्थात मनाच्या आत खोल कुठेतरी त्याला हे नक्की माहीत होते की दोघातल्या लढाईचा शेवट झाल्यावाचून तो क्षण उगवणार नाही. त्याला हे सुद्धा नक्की माहीत होते की प्रत्येक नव्या लढाईचा शेवट नव्या पराजयामध्ये होणार आहे आणि या सगळ्या प्रकरणाचा अंतिम शेवट काय होणार आहे ? पण असे होते तर तो स्वतःचा असा छळ तरी का करून घेत होता ? मी लढाई हरलो असे एकदाच तो का म्हणत नव्हता ? मृत्यूची कल्पना त्याच्यासाठी आता पूर्वीपेक्षा अधिक घन बनली होती. पूर्वी ती त्याला इतकी खरी वाटत नसे. त्या काळात मृत्यू त्याला अतिभौतिकी कल्पनेसारखा दूरचा वाटे. काहीतरी शाब्दिक, अमूर्त, अपरिचित. आता मृत्यू तितका अपरिचित राहिला नव्हता. तो निकट आला होता. मृत्यूच्या कल्पनेला आता निद्रेचा गंध येऊ लागला होता. चिरनिद्रेचा. ऊबदार, शरीराशी संबंधित, मोह घालणारा गंध. मात्र एका विचित्र, अतिशय गुंतागुंतीच्या कर्तव्यापोटी ही लढाई तो शेवटपर्यंत झुंजत होता, आणि त्याच्याकरिता डोके शुद्धीवर राहावे म्हणून स्वतःशीच झगडत होता. आपले हे वागणे डॉन क्विझोटच्या पठडीतले आहे हे त्याला कळत नव्हते अशातलाही भाग नाही. त्याला सर्व कळत होते. तरीसुद्धा ग्लेटकिन आपणावर शेवटचा आरोप करेस्तोवर आणि होय, मी हा अपराध केला आहे हे शब्द नकळत आपल्या मुखातून बाहेर पडेस्तवर झुंजत राहायचे असे त्याने ठरविले होते. रस्त्याचा अंतिम टप्पा येईस्तवर वाट चालत राहाणे त्याला भाग होते. रस्ता संपला. स्वतःच्या पायानी अंधाऱ्या गुहेत त्याने प्रवेश केला. निवांत झोपण्याचा, काही झाले तरी यापुढे झोपमोड होणार नाही या अटीवर झोप घेण्याचा हक्क प्राप्त झाला की मगच तो झुंज संपविणार होता.

* * *

ग्लेटकिन रुबाशॉव्हवर अनेक प्रकारचे आरोप ठेवतो. ॲल्युमिनिय्मच्या कारखान्यात घातपात घडवून आणण्याचा प्रयत्न केला असाही एक आरोप त्या आरोपात

असतो. रुबाशॉव्ह आरोप नाकारतो. हो ना करता शेवटी ग्लेटकिन आरोप मागे घेतो. पुढे ते दोघेच एकत्र असताना ग्लेटकिन रुबाशॉव्हला विचारतो की,

(ग्लेटकिन) : 'सरकारी विरोधाचे एकूण स्वरूप विचारात घेता, कारखान्यात वगैरे घातपात घडवून आणणे हा सरकारला विरोध करण्याचा खात्रीचा मार्ग असताना तुम्ही हा मार्ग चोखळला नाही असे का म्हणाला ? कारण कामगारांमधे असंतोष निर्माण करण्याचा हा अगदी खात्रीचा मार्ग आहे.'

(रुबाशॉव्ह) : 'कारण तांत्रिकदृष्ट्या ते हास्यास्पद आहे. कारखान्याचा मुख्य व्यवस्थापकच कारखान्यामधे घातपात घडवून आणतो हे म्हणणे हा शुद्ध पोरकटपणा आहे. शिवाय घातपाताचा बागुलबुवा उभा केला की त्यात अनेक निरपराध लोकांना गोवले जाते, नि मग अनेक निरपराध्यांवर खापर फोडण्याच्या खेळाला ऊतच येतो. मला त्याचा तिटकारा आहे.'

(ग्लेटकिन) : 'घातपाताची गोष्ट तुम्हाला बनावट वाटत असेल तर मग आमची कारखानदारी मागासलेली का ? कशामुळे आमची औद्योगिक प्रगती इतकी खुंटली ?'

(रुबाशॉव्ह) : 'कामगारांच्या मेहनतीच्या मानाने आम्ही त्यांना खूप कमी पैसे देतो. त्यांना गुलामांप्रमाणे वागवतो. शिस्तीच्या आमच्या कल्पना रानटीपणाच्या आहेत. ज्या कारखान्याचा मी प्रमुख तेथली अशी कितीतरी उदाहरणे मी सांगू शकेन. अतिश्रमाने खूप थकलेल्या कामगाराच्या हातून बारीकशी चूक झाली तरी त्याला घातपाती ठरवून गोळ्या घालून ठार मारलेले मी पाहिले आहे.

एखादा कामगार कामावर फक्त दोन मिनिटे उशीरा आला तर त्याच्या ओळखपत्रावर तसा शिक्का मारून आयुष्यात त्याला पुन्हा कुठे नोकरी मिळणार नाही अशी तजवीज केल्याची उदाहरणे मी आमच्या कारखान्यातून पाहिली आहेत.'

हे सगळे ऐकूनही ग्लेटकिनचा चेहरा मात्र मख्ख राहातो. रुबाशॉव्हला वाटते की नव्या पिढीतले हे सगळे आदिमानव थेट जुन्या आदिमानवासारखे आहेत. त्यांना मोकळ्या मनाने हसणे जणू माहीतच नाही. हसणे ही त्यांना चेष्टा वाटते वेळाचा अपव्यय वाटतो.

कारखान्यात कामगारांना बळीचा बकरा बनवितात इत्यादी विषयाबद्दल ग्लेटकिन व रुबाशॉव्हचे आणखी बोलणे होते.

(रुबाशॉव्ह) : 'न घडलेल्या घातपाताचा आरोप कुठल्यातरी कामगारावर ठेवून

त्याला गोळी घालून ठार मारणे या गोष्टी तुम्ही कशासाठी करता ते मला तरी समजत नाही. कामगार अडाणी आहेत. त्यांना वेळाचे महत्त्व समजत नाही. यंत्रयुगात आवश्यक असणारी वेळेवर कामावर येण्याची सवय त्यांना लागली पाहिजे. इतर देशात यंत्रयुग येऊन दोन शतके उलटून गेली. इथं यंत्रयुग येऊन फक्त दहाच वर्षे झाली आहेत. आमच्या कडक उपाययोजनेमुळे आम्ही कामगारांना एवढ्या थोड्या काळात ती शिस्त लावू शकलो. प्रत्येक लहानसहान चुकांसाठी मजुरांना शिक्षा केली नाही तर देशातले उद्योगधंदे बंद पडतील इत्यादी, इत्यादी तुमच्या म्हणण्यात थोडेबहुत तथ्य जरी असले, तरी उठसूठ कोणाला तरी बळीचा बकरा बनवून त्याला फासावर चढविण्याचा जो तडाखा तुम्ही चालविला आहे त्याचा अर्थ काय ?'

(ग्लेटकिन) : 'याचा अर्थ अगदी साधा आहे. संख्येला जर गुंतागुंतीच्या प्रश्नांची उत्तरे द्यायची असतील तर ती गुंतागुंतीची असून चालणार नाहीत. ती साधी, सरळ, सोपी, अल्पाक्षरी, ऐकताक्षणी बुद्धीला पटतील अशी असावी लागतील. जगाचा इतिहास मी सुद्धा वाचला आहे. हा इतिहास वाचून माझ्या असे ध्यानात आले की, अजापुत्राशिवाय मानवजातीचे काम भागत नाही. सर्व काळी आणि सर्व ठिकाणी बळीच्या बकऱ्याची संस्था जारी होती. एकाने चूक करायची नि दुसऱ्याने त्याच्याऐवजी बळी जायचे हे कायम अटळपणे घडत आहे. आपले मित्रवर्य ऐव्हानॉव्ह त्यानी मला सांगितले की जुन्या धार्मिक परंपरेचा हा अवशेष आहे. यज्ञात बोकडाचा बळी देत असतात. माणसांच्या पापासाठी बोकडाचा बळी अशी ही प्रथा होती. ऐव्हानॉव्हने मला सांगितले की प्राचीन हिब्रू लोकांनी ही प्रथा प्रथम सुरू केली. जमातीच्या पापासाठी ते आपल्या देवाला बोकड बळी देत असत. शिवाय इतरांच्या पापासाठी स्वतःहून बळी गेल्याची उदाहरणेसुद्धा इतिहासाला माहीत आहेत. माझ्या लहानपणी आमच्या खिस्ती पाद्र्याने मात्र सांगितले की जीजस खिस्त स्वतःला निष्पाप कोकरू म्हणवून घेत असे नि अखिल मानवजातीचे पाप त्याने स्वतःच्या शीरावर घेतले होते. ठीक आहे. परंतु मी संपूर्ण मानवजातीचे पाप माझ्या डोक्यावर घेतले असून मानवजातीच्या पापासाठी मी सुळावर जात आहे असे म्हणून कोणी सुळावर गेला तर त्याचा फायदा स्वतः सुळावर न जाणाऱ्या मानवजातीला कसा मिळतो हे रहस्य मला आजतागायत उलगडलेले नाही. अर्थात मला जरी ते रहस्य उलगडले नाही तरी गेली दोन हजार वर्षे माणसे त्याच्यावर विश्वास ठेवीत आहेत नि त्याना ते स्वाभाविक वाटते यात कसलीही शंका नाही.'

(रुबाशॉव्ह) : ' ते काही का असेना. आमचे तत्त्वज्ञान जाहीरपणे सांगते की लोकांच्या अंधश्रद्धा दूर केल्या पाहिजेत, धर्म ही अफू आहे, धर्म एक थोतांड आहे, तेव्हा प्रत्येक बाबतीत जे खरे ते लोकांना सांगण्यातच लोकांचे कल्याण आहे. अशा परिस्थितीत

मला वाटते की देशभर सगळीकडे घातपातवाले फैलावले आहेत. सैतान फिरत आहेत नि त्यांच्या दुष्ट कारवायांमुळे आमची आर्थिक प्रगती खालावत आहे असे खोटेच सांगत फिरण्यापेक्षा जे खरे आहे ते उघड केलेले अधिक श्रेयस्कर ठरेल.'

(ग्लेटकिन) : ' हे पाहा मी जर माझ्या गावक-यांना सांगितले की क्रांती झाली, देशात मोठमोठे कारखाने निघाले आणि तरीही तुम्ही अद्यापी आळशी आणि मागासलेले आहात हे बरे नाही. तर त्याचा त्यांच्यावर कसल्याही प्रकारचा परिणाम होणार नाही. परंतु मी जर त्यांना सांगितले की तुमच्या कामात तुम्ही प्रतिवाघ आहात, अमेरिकेतले कामगारसुद्धा तुमची बरोबरी करू शकणार नाहीत. दुदैवाने देशात घातपात आणि प्रतिक्रांतिकारक सैतानांचा धुडगूस सुरू आहे, त्यांच्यामुळे तुमचे काही चालत नाही. तर त्याचा काही ना काही चांगला परिणाम निश्चित होईलही. शेवटी सत्य, सत्य असे तुम्ही म्हणता ते काय असते ? जे मानवी प्रगतीला उपकारक ठरते ते सत्य, जे उपकारक ठरत नाही ते असत्य. बस्स. संपली सत्याची व्याख्या. रात्रीच्या साक्षरतेच्या वर्गात शिकणाऱ्या प्रौढांसाठी पक्षाने नुकतेच 'इतिहासाची ओळख' नावाचे पुस्तक तयार केले आहे हे तुम्हाला माहीत आहेच ! ख्रिस्ती धर्माच्या प्रसारामुळे जगाच्या प्रगतीला खूप मदत झाली असे हे पुस्तक ठासून सांगते. ख्रिस्ती धर्मामुळे पहिली काही शतके जगाचा फायदा झाला ही गोष्ट जर खरी असेल तर जीजस म्हणतो त्याप्रमाणे तो परमेश्वरापासून कुमारी मातेला झालेला पुत्र होता की नव्हता या गोष्टीत शिरण्याचे आपणालाही काही कारण नाही. आपल्या दृष्टीने फायद्याला महत्त्व आहे. आता विद्वान असे म्हणतात की, 'आपण परमेश्वराचा पुत्र आहोत' हे ख्रिस्ताचे बोल अलंकारिक होते. ते शब्दशः घेता नयेत. पण त्याचे शेतकरी कामकरी मंडळीना काय ? त्यानी ते बोल वाच्यार्थाने घेतले होते. नि ख्रिस्ती धर्मामुळे त्यांचा भौतिक फायदा झाला होता. या परिस्थितीत लोकांच्या फायद्यासाठी असे एखादे उपयुक्त कल्पित आम्ही तयार करू नये असे का तुम्हाला म्हणायचे आहे ? आम्हालाही तो हक्क आहे असे मला वाटते.'

(रुबाशॉव्ह) : 'आपली युक्तिवाद करण्याची एकूण पद्धती ऐव्हानॉव्हच्या पद्धतीसारखीच आहे.'

(ग्लेटकिन) : 'तुमच्या प्रमाणेच ऐव्हानॉव्ह हे देखिल जुन्या जमान्यातील बुद्धिवंतामधे मोडत होते. आम्हा लोकांना शाळेत जाऊन शिकता आले नाही. परंतु ऐव्हानॉव्ह यांच्याशी बोलून इतिहासाचे बरेच ज्ञान आम्ही गोळा केले आहे. ऐव्हानॉव्ह आणि मी या दोघातला मुख्य फरक हा की मला मिळालेले ज्ञान मी फायद्यासाठी वापरू पाहातो, ऐव्हानॉव्ह तात्विक किंवा तुच्छतावादी असल्याने तसे करीत नसत.'

(रुबाशॉव्ह) : 'मघापासून ऐव्हानॉव्ह यांच्याबद्दलचे सगळे उल्लेख ते होते, ते अमुक करीत असत, तसे वागत असत असे भूतकालदर्शक करीत आहात. पण असे का हे माझ्या ध्यानात आले नाही.'

(ग्लेटकिन) : ' सरकारी निर्णयाप्रमाणे काल रात्री ऐव्हानॉव्ह याना गोळी घालून ठार करण्यात आले.'

* * *

वरील संभाषणानंतर दोन तास रुबाशॉव्हला स्वस्थ झोप घेऊ दिली गेली. ऐव्हानॉव्हला गोळी घालून ठार करण्यात आले या बातमीचा आपल्यावर कसलाच परिणाम कसा झाला नाही हाच विचार रुबाशॉव्हच्या डोक्यात येत होता. कदाचित आपण पूर्ण थकून गेल्याचा तो परिणाम असावा असे त्याला वाटले. .. ऐव्हानॉव्ह युक्तिवाद करीत असे तोच युक्तिवाद ग्लेटकिननेही केला होता. पण दोघांच्या स्वरात फरक होता. हा फरक कोठून आला याचा विचार रुबाशॉव्ह करू लागतो. तेव्हा त्याच्या ध्यानात येते की ऐव्हानॉव्हसकट आपण सगळेजण जुन्या जमान्यात वाढलो आहोत. तो जमाना जरी आता गेला तरी त्याच्या आठवणी आणि संस्कार अजून शिल्लक आहेत. आपल्या बालपणाकडे आपण पाठ फिरवू शकतो. परंतु आपले बालपण आपण पुसून टाकू शकत नाही. ऐव्हानॉव्ह जे सिध्दांत सांगत असे तेच ग्लेटकिन सांगत आहे. परंतु दोघांच्या सांगण्यात फरक इतका की ग्लेटकिनच्या तोंडात ऐव्हानॉव्हचे सिद्धांत अत्यंत क्रूर आणि घातकी बनतात. याचा अर्थ ऐव्हानॉव्हच्या सुसंस्कृतपणाने त्याचा शेवटपर्यंत पाठपुरावा केला होता. ऐव्हानॉव्ह जुन्या पिढीतला असल्याने त्याच्यावर जे संस्कार झाले होते त्यामुळे त्याच्या आवाजात मार्दव दिसे, त्याचा आवाज कधी कातर तर कधी विषण्ण होत होता. तर कधी चेष्टेखोर बनत होत आणि म्हणून ग्लेटकिन त्याला 'सिनिक' समजत होता. ग्लेटकिन आणि ग्लेटकिनच्या भाईबंदांना आधी कधी भूतकाळच नसल्याने भूतकाळ पुसला जाण्याचा, तो मागे टाकण्याचा असले प्रश्नच त्यांच्या बाबतीत मुळी उद्भवू शकत नाहीत. ही मंडळी नाळेशिवायच जन्माला आली आहेत. जीवनात थट्टामस्करीला स्थान असू शकते हेच त्यांना कळण्यासारखे नाही. समोर काही कारण नसताना एकाएकी मन दुःखाने भरून येणे म्हणजे काय हे सुद्धा त्यांना कळण्यासारखे नाही. जन्माला येताना यापैकी काहीच त्यानी बरोबर आणले नव्हते.

* * *



अनुक्रमणिका

## रुवाशॉव्हच्या डायरीतील एक उतारा.........

'.......... आमच्या आयुष्याची अखेर आता जवळ आली. रंगमंच सोडून आम्ही आता दूर निघालो. ही सगळी ग्लेटकिन मंडळी आता आमच्या मागे उरणार. आम्हाला त्यांच्या एकूण वागण्याचालण्याबद्दल तुच्छता वाटत आहे. परंतु त्यांच्याबद्दल तुच्छता वाटण्याचा आम्हाला हक्क आहे का ?

पहिला आदिमानव जेव्हा पृथ्वीतलावर अवतरला तेव्हा एप जातीच्या माकडांच्या साम्राज्यामधे हास्याची खसखस पिकली असेल. माकडाच्या जातीतील अत्यंत पुढारलेली ती माकडे अतिशय सफाईने या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारीत. उलट तुलनेने बोजड शरीराचा नि उड्या मारण्यात मागासलेला आदिमानव मात्र जमिनीला घट्ट बांधला गेला होता. आयुष्यात जेवढी प्रगती करता येण्यासारखी होती तेवढी प्रगती त्यानी साधली होती आणि ती सुखाने कालक्रमणा करीत होती. एकमेकांच्या खोड्या काढीत आनंदाने दिवस घालवीत होती किंवा एखाद्या दिवशी काहीच करायचे नसे तेव्हा तत्त्ववेत्त्याच्या आव आणून मोठ्या खुपीत माश्या पकडीत होती. आमचे भाऊबंद मात्र त्याचवेळी रखडत, खरडत, पडत झडत, चेहरा वाईट करीत जमिनीवरून कसेबसे पुढे सरकत असत. झाडावर बसलेल्या सुखी माकडांना या आदिमानवांची मोठी गंमत वाटे. त्यांच्याकडे आढ्यतेने पाहात केवळ करमणूक म्हणून ती माकडे आदिमानवांच्या अंगावर चारदोन फळे फेकून मारत.

आदिमानवांची करामत पाहून कधी कधी माकडांच्या अंगावर भीतीचा काटा उभा राहात असे. माकडे फळे खात होती, झाडाचे कोवळे अंकुर खात होती. अगदी नजाकतीने खात होती. आदिमानव कच्चे मांस खात होता, कचाकचा खात होता. इतर प्राण्यांची तो कत्तल करीत होता. कधी कधी स्वतःच्या भाईबंधांचीही कत्तल करीत होता. शतकानुशतके घट्ट खांबासारखी उभी असलेली झाडो तो धडाधड तोडून टाकीत होता. इकडच्या शिळा तिकडे हालवीत होता आणि असे करून जंगलाचा अलिखित कायदा पायाखाली तुडवीत होता. माकडांच्या मानाने अत्यंत पुढारलेल्या, सुसंस्कृत माकडांना त्यांचे हे वागणे अगम्य, असंस्कृत, रानटी, क्रूर वाटत होते. सभ्यतेच्या नियमाना सोडून आहे असे वाटत होते. इतिहासाला मिळालेली रानटी आणि उलटी कलाटणी जणू. चिंपाझींच्या जमातींपैकी मागे उरलेले शेवटचे चिंपांझी मनुष्य प्राण्याकडे पाहून आजही नाक मुरडताना दिसतात .......'

• • •

चौकशीचे पाचसहा दिवस उलटले आणि एका प्रसंगी प्रश्नोत्तरे चालू असता

रुबाशॉव्हला चक्कर आली, तो बेशुद्ध झाला. चौकशीचा शेवट आला होता. रुबाशॉव्हच्या राजकीय हेतूची चौकशी सुरू होती नि ते घडले. आरोपपत्रात लिहिले होते की, 'क्रांतीला विरोध करण्याच्या भूमिकेतून' रुबाशॉव्हने या सगळ्या गोष्टी केल्या होत्या आणि परकीय देशासाठी पैसे घेऊन आरोपीने ती कृत्ये केली होती. हे सर्व स्वयंसिद्ध आहे. वेगळ्या पुराव्याची गरज नाही. असेही आरोपपत्रात नमूद करण्यात आले होते. पण रुबाशॉव्ह त्याला प्राणपणाने विरोध करतो. त्याला हा आरोप अजिबात मान्य होत नाही. जबाबी पहाटे पहाटे सुरु झाली नि सकाळ उलटली तरी सुरुच होती आणि आता एका अगदी रुक्ष क्षणी रुबाशॉव्हला घेरी आली आणि तो खुर्चीवरून जमिनीवर कोसळला.

डॉक्टर आले. काही मिनिटांनी रुबाशॉव्ह शुद्धीवर आला. जबानी पुन्हा सुरू झाली. नंबर एकला विरोध करण्यात रुबाशॉव्हचा हेतू कोणता होता हे ग्लेटकिनला शोधून काढायचे होते.

(ग्लेटकिन) : 'क्रांतीला विरोध करण्याचे जे प्रयत्न आपण चालविले होते त्याच्याबद्दल आपण बोलत होतो.'

रुबाशॉव्हला नुकतीच घेरी येऊन गेली होती. थोडा वेळ त्याला बाहेर उघडयावर नेण्यात आले होते. बाहेर बर्फ पडत होता रुबाशॉव्हने आत येताना हातातून एक छोटासा बर्फाचा खडा आणला होता. ग्लेटकिनने प्रश्न विचारला, नि त्याचे लक्ष रुबाशॉव्हच्या हातातील बर्फाच्या त्या छोट्या खड्याकडे गेले. ग्लेटकिन बघतो म्हणून रुबाशॉव्हसुध्दा हातातल्या बर्फाच्या खड्याकडे पाहू लागला. खडा विरघळत होता.

(ग्लेटकिन) : 'हा आता शेवटचाच प्रश्न. तुम्ही त्याचे उत्तर दिले आणि कबुलीजबाबावर सही केली की तुम्ही सुटला आणि मीही सुटलो. तर क्रांतीला विरोध करण्यात तुमचा हेतू कोणता होता ?'

एकाएकी प्रकाशाचा झोत प्रखर झाला. रुबाशॉव्हने पापण्या मिटल्या.

(ग्लेटकिन) : 'या प्रश्नाचे उत्तर तुम्ही दिले की तुम्हाला निवांतपणे विश्रांती घेता येईल.'

रुबाशॉव्ह मस्तकावरून हात फिरवतो. 'विश्रांती' हा शब्द त्याच्या कानात घुसतो. आजूबाजूला शांत होते. त्या शांततेत 'विश्रांती' हा शब्द जणू अधांतरी लोंबकळत होता. विश्रांती आणि झोप. त्याला जुन्या करारातील एक प्रसंग आठवतो. फारोच्या जुलमातून मोझेसने ज्यूंची सुटका केली आहे. परंतु अद्याप ते 'आश्वासित भूमीप्रत' येऊन

पोहोचलेले नाहीत. ते केवळ वाटेतल्या वाळवंटातच वर्षानुवर्षे फिरताहेत. अशा वेळी काही मंडळी मोझेसविरुध्द बंड करतात. त्यांचे म्हणणे 'आपण नवा नेता निवडू आणि इजिप्तच्या भूमीकडे परत जाऊ'. रुबाशॉव्हच्या पापण्या जोरात फडफडल्या. ग्लेटकिनकडे पाहात रुबाशॉव्ह बोलला,

'माझे हेतू काय होते हे माझ्याइतकेच तुम्हालासुध्दा माहीत आहे. मी क्रांतीलाही विरोध करीतनव्हतो आणि मी कुणा परकी शक्तीच्या सेवेत देखिल नव्हतो. माझ्या बुद्धीला आणि सद्सद्विवेकबुद्धीला जे पटले ते मी करीत होतो.'

यावर ग्लेटकिन एक शब्दही बोलत नाही. तो समोरची कागदपत्रे उलटसुलट करतो. एक फाईल पुढे ओढतो आणि निर्विकार आवाजात त्यातील एक कागद वाचू लागतो.

''..... आम्हाला व्यक्तिनिष्ठ सद्‌तहेतुंशी काहीही कर्तव्य नाही. ज्याचे चूक ठरेल त्याला चुकीची भरपाई म्हणून शिक्षा भोगणे क्रमप्राप्त आहे. जो बरोबर असेल त्याला इतिहास क्षमा करील हे आमचे एकमेव तत्त्व होते....'' अटकेनंतर अगदी काही दिवसातच तुम्ही तुमच्या रोजनिशीत हे लिहून ठेवले आहे.

प्रकाशझोत तीव्र झाला. रुबाशॉव्हच्या पापण्या फडफडतात. ग्लेटकिनच्या तोंडून त्याची स्वतःचीच वाक्यं परकी बनली होती; कानाला विचित्र, नग्न वाटू लागली होती. अनोळखी पाद्र्यापाशी दिलेल्या पापाच्या कैफियतीचे रूपांतर ग्रामोफोनच्या तबकडीत घडून यावे आणि कर्कश आवाजात ती तबकडी वाजत राहावी तसे त्याला ती वाक्ये वाटली.

रुबाशॉव्ह काहीच उत्तर देत नाही; तेव्हा ग्लेटकिन दुसरे पान काढून रुबाशॉव्हवर नजर स्थिर करून त्यातील फक्त एक ओळ वाचतो,

''खोटा अहंकार टाकून देऊन काही झाले तरी पक्षाची सेवा करीत राहाणे यातच खरी प्रतिष्ठा आहे.''

आता रुबाशॉव्ह ग्लेटकिनच्या डोळयाला डोळा भिडवतो.

(रुबाशॉव्ह) : 'पक्षाच्या सभासदांची जगात पुरती नाचक्की झाल्याने पक्षाचा फायदा कसा होणार हे मला समजले नाही. तू दिलेल्या कागदावर मी सही केली आहे. मी जे काही करू पाहात होतो त्यामुळे पक्षाचे अहित होणार असून माझा मार्ग चुकीचा होता या दोन्ही गोष्टी मी कबूल केल्या आहेत. आता आणखी तुम्हाला काय हवे ?' 'शेवटी

हे लक्षात घ्या की, एन्. एस्. रुबाशॉव्ह या नावाला पक्षाच्या इतिहासात बरीच किंमत आहे. अशा परिस्थितीत हे नाव चिखलात तुडवल्याने क्रांतीच्या इतिहासालाच लांछन लागणार आहे.'

ग्लेटकिन फाइलीतून वाचतो.

"राजकारणात प्रत्येक गोष्ट सोपी करून सांगावी लागते तरच ती संख्येला कळते. एकच गोष्ट वारंवार सांगितली आणि सोपी करून सांगितली तरच ती संख्येच्या डोक्यात उतरते. जे बरोबर म्हणून संख्येला सांगायचे असते ते शंभर नंबरी सोने वाटले पाहिजे. जे चूक ठरवायचे असेल ते कोळशाहून काळे वाटले पाहिजे. राजकीय तत्त्वज्ञान जेव्हा संख्येला खपवायचे असते, तेव्हा ते जत्रेत विकतात तसल्या आलेपाकाच्या वड्यांसारखे आकर्षक वाटले पाहिजे."

स्वतःच्याच रोजनिशीतील ही वाक्ये ऐकल्यावर प्रथम काही क्षण रुबशॉव्ह निःशब्द बनतो. मग एकाएकी उदगारतो की, ' तुम्ही काय चालवले आहे ते माझ्या ध्यानात आले. देशातल्या पोराबाळांसाठी तुम्ही जे विनोदी नाटक दाखवू पाहात आहात त्यात मी राक्षसाची भूमिका वठवावी अशी तुमची इच्छा दिसते. तुम्हाला वाटते की मोठमोठ्याने मी गर्जना कराव्यात, दात ओठ खावेत, जीभ हासडून प्राण द्यावा आणि ते सुद्धा स्वतः होऊन; तुम्ही जुलूम जबरदस्ती न करता असेच ना ! फ्रेंच राज्यक्रांतीमधल्या दाँताँ आणि त्याच्या सहकाऱ्यावरसुद्धा असला प्रसंग कोणी आणला नव्हता.'

ग्लेटकिन फाईल बंद करतो. थोडा पुढे वाकतो नि रुबाशॉव्हला बोलतो की, ' खटल्याच्या वेळी तुमच्या साक्षीमुळे पक्षाची सेवा घडणार आहे. तुम्ही केलेली पक्षाची ती अखेरची सेवा ठरेल.'

रुबाशॉह एकही शब्द उच्चारीत नाही. खूप थकल्याप्रमाणे नुसता जागेवर पडून राहतो. प्रकाशाचा प्रखर झोत त्याच्या डोळयावर पडला होता. ग्लेटकिनचे बोलणे सुरूच असते. 'तुमचा तो दाँताँ आणि त्याने स्थापन केलेले राष्ट्रीय मंडळ (फ्रेंच कन्व्हेन्शन २९ सप्टें. १७९२ ते २६ ऑक्टो. १७९५ पर्यत फ्रान्सच्या प्रजासत्ताकाचा कारभार पाहणारे मंडळ) मला त्यांचे काहीही सांगू नका. जे काही आज पणास लागले आहे त्याच्याशी तुलना करता फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी जे घडून गेले तो केवळ पोरखेळ होता. फ्रेंच राज्यक्रांतीबद्दल मी खूप पुस्तके वाचली आहेत. ही फ्रेंच मंडळी कृत्रिम केसांचे टोप डोक्यावर मिरविण्यात आणि स्वतःच्या वैयक्तिक नावलौकिकासाठी पराक्रम करण्यात मशहूर होती. वैयक्तिक नावलौकिकासाठी आत्मबलिदानाची त्यांची तयारी असे. परंतु या बलिदानामुळे देशाचे भले झाले, की देशाला धोका पोहचला याची त्यांना पर्वा नसे. असल्या लोकांचे मला सांगू नका.



अनुक्रमणिका



रुबाशॉव्ह गप्पच होता. डोक्यावर घण बसताहेत असे त्याला वाटत होते. ग्लेटकिनचे शब्द जणू चारी बाजूंनी त्याच्या कर्णेंद्रियात शिरत होते. त्याच्या मस्तकात घुमत होते. त्याचे डोके प्रचंड दुखू लागले.

ग्लेटकिन बोलतच होता. ' या क्षणी काय पणास लागले आहे त्याची तुम्हाला कल्पना आहे काय ? जागतिक इतिहासातील ही पहिली खेप की जेव्हा राजकीय सत्ता मिळविण्यात क्रांती यशस्वी झाली आहे. एवढेच नसून ती सत्ता स्वतःपाशी टिकवून धरण्यातही ती यशस्वी झाली आहे. आमच्या देशाला आम्ही नव्या युगाचा बालेकिल्ला बनविला. सगळया लढाया आम्ही या बालेकिल्ल्यच्या आत राहून करीत आहोत. आमच्या बालेकिल्ल्याने जगाचा सहावा हिस्सा आणि जागतिक लोकसंख्येचा दहावा हिस्सा अडवला आहे.

बोलता बोलता ग्लेटकिन अतिशय उत्तेजित झाला आणि उठून खोलीतल्या खेली फेऱ्या मारू लागला. फेऱ्या मारताना त्याचे भाषण सुरूच होते. तो म्हणत होता की, 'आमच्या देशात क्रांती जेव्हा यशस्वी झाली तेव्हा आम्हाला वाटले की आता बाकीचे सगळे जग स्वतः होऊन आमच्या मागे येईल. पण ते तर झाले नाहीच परंतु त्याच्या उलट प्रतिगामी चळवळीची लाट मात्र सर्वत्र उमटली आणि त्या लाटेत आम्ही बुडतो की काय असे वाटू लागले. पक्षामधे सुद्धा दोन प्रकारचे विचार प्रवाह निर्माण झाले. एक विचारप्रवाह साहसी चळवळयांचा होता. या गटाला वाटत होते. आहे ते सर्व धोक्यात घालून जागतिक क्रांतीसाठी प्रयत्न करावेत. महाशय, आपण त्या गटाचे प्रतिनिधी होता. ही विचारसरणी आमच्या नेत्याला धोकादायक आणि हानीकारक वाटली सतत साहजिकच आम्ही त्या लोकांची वात लावली.'

ग्लेटकिनच्या भाषणावर उत्तर द्यावे असे क्षणमात्र रुबाशॉव्हला वाटते. परंतु तो काही न बोलता गप्प बसतो. ग्लेटकिन पुढे सांगू लागतो. ' आमच्या पक्षाच्या नेत्याचा दृष्टीकोन खूप व्यापक होता आणि त्याची चिकाटीसुद्धा दांडगी होती. आमच्या पुढाऱ्याने हे जाणले की सध्या धीराने काम केले पाहिजे. सध्याचा काळ असा आहे की आपल्या विरुद्धची जागतिक प्रतिक्रिया विरुन जाईस्तवर काही करून तगून राहिले पाहिजे नि गड सांभाळला पाहिजे. हे करू शकलो की आपण वाचलो. यात कदाचित दहा वर्षे जातील, कदाचीत वीस किंवा पन्नास वर्षेसुद्धा जातील. परंतु कधीतरी क्रांतीच्या नव्या प्रयत्नासाठी जग पक्व झालेले असेल. आमच्या पुढाऱ्याची ही धारणा होती. तेव्हा तो दिवस उजाडेपर्यंत या जगात आम्हाला कोणीही नाही. आम्ही पूर्णपणे एकटे आहोत; नि तो दिवस उजाडेपर्यंत आमचे एकमेव कर्तव्य टिकून राहणे, हार न जाणे हे आहे.'

ग्लेटकिनचे वक्तव्य ऐकत असता एकाएकी रुबाशॉव्हच्या डोक्यात

क्रांतीकारकांच्या कर्तव्यासंबंधीची सूचना उमटते. 'हर प्रयत्न करून जीव बचावणे, जीवंत राहणे हे प्रत्येक क्रांतीकारकाचे एकमेव कर्तव्य असते.' हा विचार डोक्यात येतो तोच त्याला प्रश्न पडतो की आता या क्षणी हे वाक्य कोण बोलला ? मी की ऐव्हानॉव्ह ? कारण हाच सिद्धांत पुढे करून त्याने आर्लोव्हाचा बळी दिला होता. आणि आता तो सध्याच्या गतीला येऊन पोहचला होता.

अकस्मात ग्लेटकिन पुढे बोलू लागतो, 'काही झाले तरी हार खाता कामा नये. टिकून राहिले पाहिजे. काहिहि किंमत द्यावी लागली तरी हरकत नाही आणि कसलाही त्याग करावा लागला तरी चालेल परंतु टिकाव धरून रहायचे. आमच्या पक्षाच्या प्रमुखाने हे नेमके ओळखले होते. विलक्षण दूरदृष्टीने जाणले होते नि म्हणून शक्य तेवढे प्रयत्न करून त्याने ते धोरण अमलातही आणले होतेः आंतरराष्ट्रीय धोरण राष्ट्रीय धोरणाच्या हिताचे हवे. राष्ट्राला फायदा होईल अशाच प्रकारे आंतरराष्ट्रीय धोरण राबवायचे. ज्याना या धोरणाची अपरिहार्य गरज उमजली नाही त्यांचा आम्हाला काटा काढावा लागला. याच कारणाने युरोपातील आमचे उत्तमोत्तम कार्यकर्ते आम्हाला मृत्युमुखी लोटावे लागले. आमच्या बालेकिल्ल्याचे हित धोक्यात आहे असे दिसताच परदेशातल्या खुद्द आमच्या स्वतःच्याच संघटना चिरडून टाकावयास आम्ही मागेपुढे पाहिले नाही. चुकीच्या वेळी सुरू करण्यात आलेल्या क्रांतीकारक चळवळी त्या त्या प्रतिगामी राष्ट्रातील पोलीसांच्या मदतीने खाली बसवायासही आम्ही अनमान केले नाही. बालेकिल्ला सांभाळून ठेवण्यासाठी मित्रांचा विश्वासघात आणि शत्रूबरोबर हातमिळवणी दोन्ही करताना आम्ही यत्किंचितही खंत बाळगलेली नाही. जगातील पहिल्या वहिल्या यशस्वी क्रांतीचे आम्ही प्रतिनिधी असल्याने खुद्द इतिहासानेच आमच्याकडे क्रांती वाचविण्याचे हे काम सोपविलेले आहे. परंतु आमच्या अदूरदृष्टी विरोधकांना, न्यायान्यायाचा आणि युक्तयुक्ताचा काथ्याकूट करणाऱ्या नीतीवाद्यांना आणि सगळया गोष्टीत सत्यम, शिवम, सुंदरमचा गोंगाट करणाऱ्या या सौंदर्यवाद्याना नेमकी हीच गोष्ट कधी कळली नाही. परंतु क्रान्तीच्या आमच्या प्रमुख पुढाऱ्याने 'काही झाले तरी शेवटपर्यंत टिकून रहाणे हेच सद्यस्थितीत शहाणपणाचे आहे' हे बरोबर ओळखले होते नि त्याप्रमाणे त्याने आपली योजना आखली होती.'

बोलता बोलता ग्लेटकिन रुबाशॉव्हच्या खुर्चीमागे थांबला. त्याने दिव्याची प्रखरता थोडी कमी केली नि तो पुढे बोलू लागला. 'पक्षाचे धोरण पहिल्यापासून स्पष्ट होते. साध्य महत्त्वाचे, साधनाला किंमत नाही. साधन कोणतेही वापरा, साध्य हस्तगत झाले की संपले. तेव्हा या तत्त्वाला अनुसरून तुम्हाला फाशी देण्यात यावे असा आग्रह सरकारी वकील धरणार आहे हे विसरू नका.'

'रुबाशॉव्ह, महाशय, तुमच्या गटाचा पुरता बीमोड झाला आहे. तुम्हाला

पक्षामध्ये दुही माजवायची होती. वस्तुतः पक्षात दुही माजली तर देशात यादवी युद्ध सुरू होईल हे तुम्हाला माहीत असावयास हवे. शेतकरी वर्ग आमच्यावर नाराज आहे हे तुम्हाला माहीत आहे. त्यागाचे महत्त्व या वर्गाला अद्याप समजले नसल्याने त्यांच्यावर आम्ही जी बंधने लादली आहेत ती त्याना मान्य नाहीत नि ते आमच्यावर चिडले आहेत. लवकरच जागतिक महायुद्ध सुरू होण्याची शक्यता आहे. अशा परिस्थितीत पक्षातील दुहीमुळे महासंकट ओढवले म्हणून पक्षात एकजूट असणे आवश्यक आहे. सर्वांनी एकमताने आणि डोळे झाकून पुढाऱ्याच्या मागे जावयास हवे. पक्षाच्या पुढाऱ्यावर सर्वांचा संपूर्ण विश्वास हवा. मतभेदाचा एकही सूर ऐकू येता कामा नये. दुर्दैवाने रुवाशॉव्ह तुम्ही व तुमच्या मित्रांनी पक्षामधे भगदाड पाडले आहे. तुम्ही म्हणता की तुम्हाला पश्चात्ताप होत आहे. तुमचा पश्चात्ताप जर मनापासून असेल तर हे भगदाड बुजविण्यासाठी तुम्ही आम्हाला मदत केली पाहिजे. मी तुम्हाला आधीच सांगितले की तुम्ही पक्षासाठी करू शकाल असे हे शेवटचे काम होय. हा त्याग तुम्ही केला की पक्षासाठी शेवटचे कर्तव्य तुम्ही दजावले असे होईल. पक्ष तुमच्याकडून या सेवेची अपेक्षा करीत आहे.'

'तुमचे काम अगदी सोपे आहे. तुम्ही स्वतःच पूर्वी ते म्हणून राहिला आहातः जे बरोबर त्याला सोनेरी मुलामा देऊन ते आहे त्यापेक्षा अधिक आकर्षक आणि चकचकीत बनविणे. उलट चूक त्याला काळाकुट्ट रंग देऊन आहे त्यापेक्षा जास्त काळे दाखवणे. थोडक्यात पक्षाच्या जे फायद्याचे असेल त्याची तोंड फाटेस्तवर स्तुती करणे; पक्षाच्या तोट्याचे असेल त्याचा पूर्ण धिक्कार करणे. तेव्हा तुमचे काम एकच. तुम्ही असे दाखवून द्यायचे की विरोधक नीच व दुटप्पी आहेत. संख्येला तुम्ही असे पटवून द्यायचे की पक्षाला विरोध करणे हा नैतिक गुन्हा असून पक्षाचे विरोधक हे साक्षात नरराक्षस आहेत. संख्येला साधी, सोपी, सरळ भाषा समजते. हे देव, हे दैत्य. तेव्हा ती भाषा वापरायची. जर का तुमची ती तात्त्विक उदात्त उदिष्टांची भाषा तुम्ही सुरू केली तर संख्येच्या डोक्यात गोंधळ माजेल. कॉम्रेड रुवाशॉव्ह, तुमचे मोठ्यात मोठे कर्तव्य हे आहे की संख्येच्या मनात विरोधकांबद्दल सहानुभूती आणि दया उत्पन्न होणार नाही याची काळजी घेणे विरोधकांबद्दल जनतेच्या मनात सहानुभूती आणि दया उत्पन्न होणे याचा अर्थ देशाला धोका आहे. पक्षाला तुमच्याकडून काय हवे आहे हे तुम्हाला समजले असेल असे मी मानतो.'

त्याच्या दिवसात ग्लेटकिनने रुवाशॉव्हचा उल्लेख 'काम्रेड' रुवाशॉव्ह असा प्रथमच केला होता. 'कॉम्रेड' हा शब्द ऐकून रुवाशॉव्ह डोके जरा वर करतो. संतापाची तीव्र लाट त्याच्या मनात उमटते. तो फक्त दोन शब्द बोलतो, 'मला समजले.'

(ग्लेटकिन) : 'कॉम्रेड रुवाशॉव्ह, ही सौदेबाजी नाही. आम्ही तुम्हाला कोणत्याही

प्रकारचा शब्द देत नाही.'

(रुवाशॉव्ह) : 'मला समजले.'

(ग्लेटकिन) : तुमच्या रोजनिशीत तुम्ही जो एक परिच्छेद लिहिला आहे तो मला फार फार आवडला. तुम्ही लिहिले आहे की माझ्या बुद्धीला ज्या प्रसंगी योग्य वाटले ते मी त्या प्रसंगी केले आहे. मी बरोबर वागलो असेन तर माझ्यावर पश्चात्तापाची पाळीच येणार नाही. मी चुकलो असेन तर शिक्षा भोगून प्रायश्चित्त घेणे माझे कर्तव्य आहे.' तुम्ही चूक केली आहे असे आता सिद्ध झाले आहे. तेव्हा चूकीची भरपाई केलीच पाहिजे. पक्ष तुमच्यासाठी फक्त एकच गोष्ट करू शकेल नि तेवढा शब्द आम्ही तुम्हाला देऊ. आम्ही विजयी झालो की गुप्त फाईलीतली माहिती आम्ही उघड करू. कारण त्यावेळी पक्षाला त्यामुळे कसलाही धोका नसेल. या गुप्त फाइली उघड झाल्या की, ज्याला तुम्ही विनोदी नाटके म्हणत आहात त्या नाटकांमागील खरी पार्श्वभूमी जगाला समजेल. ही नाटकेसुद्धा आम्हाला इतिहासाच्या पाठ्यपुस्तकाने सक्ती केल्यानेच जगासाठी करावी लागली आहेत... '

आज तुम्हाला आणि जुन्या जमान्यातील काही मित्रांना आम्ही सहानुभूती, दया वगैरे नाकारली आहे . पण सरकारी दफ्तरखान्यातील गुप्त कागदपत्रे उद्या प्रसिद्ध होतील, तेव्हा आज नाकारलेली सहानुभूती आणि दया तुम्हाला मिळेल.

बोलता बोलता ग्लेटकिन निवेदन टेबलावर ठेवतो. बाजूला पेनही ठेवतो.

(रुवाशॉव्ह) : 'आदिमानव भावनावश झाले की कसे वागतील याचे इतके दिवस मला कुतूहल होते. आज त्याचे उत्तर मिळाले.'

(ग्लेटकिन) 'तुम्ही काय म्हणत आहात ते मला समजले नाही. रुवाशॉव्ह यावर फक्त पेन उचलतो आणि कबुलीपत्रावर सही करतो. परकी सत्तेचा पगारी हस्तक म्हणून आपण क्रांतीविरोधी कारवाया केल्या असे त्या कबुलीपत्रात म्हटले होते. नंतर विरोधकांबद्दल रुवाशॉव्ह 'मी काय म्हणालो ते तुम्हाला कळले नाही तरी काहीही बिघडत नाही. गेल्या पिढीतले ऐव्हॉनाव्ह व रुवाशॉव्ह आणि किपर यांच्यासारख्यानाच फक्त ते काय ते काळू शकेल. ते दिवस संपले आहेत. तुम्हाला आणखी काही हवे आहे काय ?

(ग्लेटकिन) 'तुमच्यावरचा खटला उभा राहीपर्यंत तुम्हाला कोणी त्रास देऊ नये अशा आज्ञा मी देऊन ठेवतो. तुम्हाला आणखी काही हवे आहे काय ?'

(रुवशॉव्ह) : 'झोप. मला फक्त शांत झोप हवी आहे.'



अनुक्रमणिका

(ग्लेटकिन) 'तुमची कोणी झोपमोड करता कामा नये असा आदेश मी आताच देऊन ठेवतो.'

सगळे सोपस्कार आटोपल्यावर आणि रुबशॉव्ह आपल्या कोठडीत निघून गेल्यावर ग्लेटकिनची चिटणीस त्याचे अभिनंदन करते. तेव्हा ग्लेटकिन म्हणतो की, ' डोक्यावरचा हा दिवा, अधिक झोपेत व्यत्यय नि शारीरिक थकवा या तिघानी हा चमत्कार घडवून आणला. शेवटी हा ज्याच्या त्याच्या सहनशक्तीचा प्रश्न असतो. (येथे तिसरी सुनावणी संपते.)

* * *

## व्याकरणातील कल्पित वस्तू

"फक्त ध्येय दाखवून थांबू नकोस, ध्येयाबरोबरच ते ध्येय गाठण्याचा मार्गसुद्धा आम्हाला दाखव. कारण या भूतलावर साध्य आणि साधन एकमेकांमधे इतकी गुरफटलेली असतात की एकामधे बदल घडताच त्यच्या पाठोपाठ दुसऱ्यामधेही बदल घडून येतो."

"प्रत्येक नवा मार्ग येताना स्वतःबरोबर नवा न अपेक्षिलेला शेवट बरोबर घेऊन येत असतो." फर्डिनान्ड लासाल (१८२५-६४, जर्मन-ज्यू सोशॅलिस्ट. लायबझिगमधे याने एक कामगार संघटना स्थापन केली होती.)

रुबाशॉव्हवरचा सार्वजनिक खटला उभा राहातो. सरकारी वकील रुबाशॉव्हला विचारतो की गुन्हा केला हे त्याला कबुल आहे काय ? प्रश्नाचे उत्तर रुबाशॉव्ह होकारार्थी देतो. पुढे सरकारी वकील त्याला विनंती करतो की प्रथम तुम्ही पक्षाच्या धोरणाचे फक्त विरोधक होता, ते नंतर प्रतिक्रांतीकारक बनला; तर हे कसे घडले ? रुबाशॉव्ह कोर्टात उपस्थित असलेल्या सर्वांना उद्देशून सांगतो की,

'न्यायाधीश महाशय, या देशातील न्यायाचे आपण सर्वोच्च प्रतिनिधी आहात. प्राथमिक चौकशी करणाऱ्या अधिकाऱ्यासमोर माझ्या गुन्हाचा कबुलीजबाब द्यावयास मी का तयार झालो याचे स्पष्टीकरण मी प्रथम देतो. पक्षाच्या धोरणापासून कोणी थोडा जरी बाजूला झुकला तरी त्याची परिणती पक्षविरोधी कारवाईत आणि प्रतिक्रांतिकारी दरोडेखोरीत कशी होऊ शकते हे तुम्हाला माझ्या कथेवरून समजून येईल.

पक्षाच्या धोरणाला प्रथम आम्ही विरोध केला. परंतु त्यचा अपरिहार्य परिणाम असा झाला की दिवसेंदिवस आम्ही विरोधाच्या चिखलात अधिकाधिक रुतत गेलो. मी

माझे नैतिक पतन कसे झाले हे जाहिरपणे अशासाठी सांगत आहे की, त्याच्यावरून धडा घेऊन जे वाट चुकण्याच्या मार्गावर आहेत त्यानी आपली वाट सुधारावी. कारण ही वेळ महत्त्वाची आहे. आणीबाणीची आहे. अशा वेळी पक्षाच्या नेत्यावद्दल ज्यांच्या मनात शंका असतील आणि पक्षीय धोरणाच्या युक्ततेबद्दल ज्यांना अविश्वास वाटत असेल त्याना धोक्याचा इशारा देण्यासाठी माझे निवेदन मी करीत आहेत. आज माझी छी : थू झाली आहे. शरमेने माझी मान खाली गेली आहे. मी मरणाच्या दारात उभा असून राष्ट्रद्रोही बनण्याइतके माझे पतन कशामुळे झाले हे मी तुम्हास सांगू इच्छितो. माझ्या उदाहरणावरून आमच्या देशातील कोट्यवधी जनतेने धडा घ्यावा असे...'

* * *

रुबशॉव्हवरचा खटला चालतो. साक्षीपुरावे होतात. त्याला व त्याचा साथीदार म्हणून कीपर अशा दोघांना देहन्ताची शिक्षा होते. रुबाशॉव्हचे अखेरचे भाषण अगदीच छोटे असते. सरन्यायाधीश आणि न्यायालयातील गर्दीला उद्देशून तो म्हणाला की, हे मरण मी कशासाठी कवटाळत आहे असा प्रश्न जेव्हा मी स्वतःला विचारू पाहातो तेव्हा त्याच्यावर मला उत्तर सापडत नाही. तथापी पश्चात्ताप व्यक्त न करता आणि पक्ष व पक्षाची चळवळ यांच्याशी समझोता न करता मी जर मरून गेलो, तर माझे मरण व्यर्थ ठरेल अशी भीती वाटल्याने आयुष्याच्या या अखेरच्या क्षणी माझा देश, जनता आणि समस्त नागरीक या सर्वांना मी अखेरचा प्रणाम करीत आहे. राजकीय लांड्यालबाड्या, लपवा छपवी, चर्चांची खोटी सोंगेढोंगे आणि कटकारस्थाने यांचे दिवस आता संपले आहेत. सरकारी वकील आमच्या मुंडक्यांची मागणी करीत आहेत. परंतु आम्हाला फासावर चढविण्यापूर्वीच आम्ही मरून गेलो आहोत. राजकीयदृष्ट्या आम्ही केव्हाच मृतात जमा झालो आहोत. जे लढाई हरतात, त्यांच्यासारखे दुदैवी तेच. इतिहास त्याना धुळीत जमा करतो. न्यायाधीशमहाराज माझ्या वतीने मी फक्त एकच गोष्ट सांगू इच्छितो. माझी जबाबदारी टाळण्यासाठी वा हलकी करण्यासाठी मी मुळीच प्रयत्न केला नाही. माझा अहंकार आणि माझा उरलासुरला स्वाभिमान मला परत परत सांगत होता की, 'काहीही कबूल करू नकोस. मुकाट्याने मरण पत्कर ताठ मानेने मरून जा. एखाद्या वीरासारखा हसत फासावर जा. लोकांना तुझे कौतुक करू दे. सुळावर चढण्यापूर्वी जनतेसमोर स्वतःचे हृदय मोकळे कर. ज्यानी तुला आरोपीच्या पिंज-यात उभे केले त्यानाच उलट आव्हान दे. मी खंदा बंडखोर आहे. जुना लढवैय्या. माझ्या दृष्टीने त्याच्याइतके सोपे दुसरे काहीच नव्हते. परंतु तो मोह मी बाजूला सारला. आणि त्याच्याच बरोबर माझे जीवितकार्य संपले आहे. माझे देणे मी फेडले आहे. इतिहासाबरोबरचा माझा हिशेब मी पुरा केला आहे. तुमच्याकडे दयेची याचना करणे ही न्यायाची विटंबनाच होय. झाले, मला आणखी काहीही



अनुक्रमणिका

सांगायचे नाही...'

सर्व संपले होते. मध्यरात्र उलटण्यापूर्वी आपली प्राणज्योत मालवलेली असेल हे रुबाशॉव्हला कळून चुकले.

* * *

रुबाशॉव्ह खोलीतल्या खोलीत येरझाऱ्या घालतो. साडेसहा पावले पुढे खिडकीकडे. साडेसहा पावले मागे, मागच्या भिंतीकडे. बाहेर सर्वत्र निस्तब्ध शांतता. तशीच शांती रुबाशॉव्हच्या मनातदेखील. रुबाशॉव्हला खात्री. काही झाले तरीही मानसिक शांती आता ढळणार नाही.

कोठडीत रुबाशॉव्हच्या येरझाऱ्या चालूच. आता त्याला फक्त दोन प्रश्न सतावत आहेत. मृत्यू गाठण्याच्या अगोदर या प्रश्नांची उत्तरे मिळाली तर त्याला बरे वाटणार होते. तसे पाहिल्यास दोन्ही प्रश्न अगदी भाबडे होते. जगात दुःख का आहे ? विशेषतः निरर्थक, मानवी मूर्खपणामुळे उत्पन्न होणारे जे दुःख अटळ आहे, मानवी आयुष्याचा भाग म्हणून आहे त्याच्याबद्दल आपण तक्रारच करू शकत नाही. कारण मानवी प्रकृतीचा तो अपरिहार्य भाग आहे. पण दुसरे टाळता येण्यासारखे, सामाजिक परिस्थितीमधून उत्पन्न होणारे दुःख हा केवळ अपघात असतो. ही दुःखे का असावीत? मनुष्य शहाणा व समंजस असता तर ही दुःखे जगात असूच शकली नसती. ही निरर्थक, मूर्खपणाची दुःखे आहेत. क्रांतीचे एकमेव उद्दिष्ट ह्या अर्थशून्य दुःखाचे उच्चाटण हेच नाही का ! परंतु ही दुःखे दूर करण्याचा जो प्रयत्न झाला त्यातून हे दिसून आले की, पहिल्या प्रकारच्या दुःखांची एकूण गोळाबेरीज तात्पुरती तरी मर्यादेबाहेर वाढली तरच ही दुसऱ्या प्रकारची दुःखे कमी होतात. हे का ? टाळता येण्यासारखी दुःखे कमी करायची झाल्यास प्रथम जनतेच्या हालअपेष्टात आणि यातनात भर पाडावी लागते असा याचा अर्थ. तेव्हा आता प्रश्न असा की जर का समाजाच्या आणि मानवजातीच्या चुकीमुळे उत्पन्न होणारी व म्हणून टाळता येण्यासारखी दुःखे कमी करायची झाल्यास प्रथम मानवी जीवनातील अटळ दुःखांच्या एकूण गोळाबेरजेत प्रचंड भर घालावी लागत असेल, तर हा प्रयोग करून पहावा की पाहू नये ? एका शब्दात, हा प्रयोग समर्थनीय ठरतो काय? प्रत्यक्ष हाडामासाच्या मनुष्यप्राण्याचा विचार न करता मानवजात ही एक तात्विक कोटी आहे असे गृहीत धरून जर का वरील प्रश्नाचा विचार केला तर प्रयोग करावा असेच उत्तर आपण देऊ. म्हणजे 'मानवजातीचा' केवळ तात्त्विक अर्थाने विचार केला तरच वरील प्रयोग क्षम्य, नव्हे आवश्यकच ठरतो. परंतु मानवजातीचा विचार करताना एकदम सगळ्याच्या सगळ्या मनुष्यप्राण्यांचा एकत्रित विचार न करता किंवा कालच्या, आजच्या

आणि उद्याच्या संपूर्ण मानवजातीचा एकदम विचार न करता, ज्या एकेकट्या मनुष्यप्राण्याची मिळून ती मानवजात तयार होते त्या एकेकट्या मनुष्यप्राण्याचा, हाडामांसाच्या, प्रत्यक्ष व खऱ्याखुऱ्या मनुष्यप्राण्याला हिशेबात घेऊन विचार केला आणि मग हे तत्त्व लावण्याचा प्रयत्न केला तर ते लगेच हास्यास्पद वाटू लागते. बालपणी पक्षासाठी काम करताना रुबाशॉव्हला वाटे की पक्षात काम करताना या सगळया प्रश्नांची उत्तरे आपणास मिळतील. परंतु पक्षाचे काम जवळपास चाळीस वर्षे सुरूच होते नि ज्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी तो पक्षात शिरला होता तो प्रश्नच मुळात पक्षात शिरताच तो विसरुन गेला होता. आता पक्षात शिरून चाळीस वर्षे उलटून गेली होती नि फिरून एकदा बालपणीच्या त्याच जुन्या प्रश्नाने त्याला गोंधळात टाकले होते. देण्यासारखे त्याच्यापाशी जे जे होते ते ते त्याने पक्षाच्या सेवेत खर्च केले होते नि पक्षाने मात्र त्याच्या प्रश्नाचे उत्तर आजही त्याला दिले नव्हते. पक्षाने त्याचे सर्वस्व त्याच्याकडून घेतले. पण त्याचा प्रश्न मात्र अनुत्तरितच ठेवला. रुबाशॉव्हला वाटे की त्याचा मूक भागीदार - त्याचा अंतरात्मा तरी प्रश्नाचे उत्तर देईल. परंतु छे, तो सुद्धा गप्पच. खरे तर कोठल्याच उघड उघड प्रश्नाला हा मूक भागीदार उत्तर देत नाही. मग हे प्रश्न किती का तातडीचे आणि निकराचे असोत. तो आपला गप्प.

तथापी त्याला गाठता येत नव्हते असे मात्र नाही. अंतरात्म्याला, रुबाशॉव्हच्या आयुष्याच्या मूक भागीदाराला ज्याचा नामोल्लेख तो 'मी' या सर्वनामाने करीत होता, त्या 'मी' ला गाठण्याचेसुद्धा काही मार्ग होते. हा त्याचा 'मी' कधी कधी अकस्मात बाहेर पडे नि त्याला भेटे. कधी गाण्याच्या गुणगुणण्याला तर कधी केवळ गाण्याच्या सूराच्या आठवणीलाही तो दाद देत असे. किंवा चर्चमधील मेरी मातेचे चित्र प्रथम आठवे किंवा बालपणातला एखदा प्रसंग आठवे आणि हा मूक भागीदार बाहेर पडे. कोणी तंबो-याची तार छेडावी तसा. एकदा का ही तार छेडली गेली की या 'मी' ची तंद्री लागे. मनाची अवस्था अननुभूत होऊन बसे. जगभरचे साधुसंत या अवस्थेला 'ब्रम्हानंद' म्हणतात किंवा 'समाधि' म्हणतात. जगातील मोठ्यात मोठे आणि विचारी मानसशास्त्रज्ञसुद्धा या अवस्थेची सत्यता मान्य करतात. त्याला ते `oceanic sense' 'विश्वतादात्म्य' असे नाव देतात. हे नाव जणू खरेच होते. मिठाचा कण विशाल सागरात विरघळावा तसे व्यक्तिचे व्यक्तित्व त्या अनुभवात विरघळते. उलट त्याच वेळी तो विशाल सागर त्या छोट्या कणात सामावून राहावा तसेही घडते. ''पिंडी ते ब्रह्मांडी, ब्रम्हांडी ते पिंडी'' अशी ती अवस्था होती. स्थळ आणि काळाचे संदर्भ जणू अदृश्य होऊन बसले होते. विचाराच्या दिशा हरवल्या होत्या. नि तो शून्याभोवतीच घुमू लागला होता. उत्तरध्रुवावर होकायंत्राच्या काट्याचे होते तशा प्रकारे .....

रुबाशॉव्हच्या येरझाऱ्या चालूच होत्या. पूर्वीच्या काळी या गोष्टीची त्याने स्वतःच चेष्टा केली असती. त्याला या अनुभवाची लाज वाटली असती. आता त्याला त्याची लाज वाटत नव्हती. मृत्यू जवळ येताच अतिभौतिक भौतिकाइतके वास्तव बनते. मृत्यू दूर असता ज्या गोष्टी पारमार्थिक म्हणून दूरच्या व तात्विक वाटतात त्याच मृत्यू निकट येताच स्वतःच्या जीवापेक्षाही निकट आणि जिव्हाळयाच्या बनतात...

रुबाशॉव्हला मागच्या गोष्टी आठवू लागतात. जर्मनीत त्याला पहिल्याने अटक झाली तेव्हाचे दिवस त्याला आठवतात.

पक्ष बेकायदेशीर ठरला होता. पण पक्षाचे मुखपत्र चालूच होते. वार्तापत्राचे एक पान रुबाशॉव्हच्या सहकाऱ्यांनी तुरुंगात धाडले होते. त्यात एक बातमी गिरणीकामगारांच्या संपाची होती. परंतु त्याच पानात एका कोपऱ्यात, विश्व मर्यादित आहे, या अर्थाची खगोलशास्त्र व पदार्थविज्ञानशास्त्र ह्या दोन शास्त्रातील महत्त्वाच्या शोधाची बातमी छापलेली होती. ही बातमी आठवताच रुबाशॉव्हला त्याचे बालपण आठवते. बालपणातील पुढील आयुष्याबद्दल केलेले बेत आठवतात. बालपणी त्याला खगोलशास्त्र हा विषय भारी आवडे. त्याच शास्त्राचा अभ्यास करायचा असे त्याने मनाशी ठरविले होते. परंतु ते शेवटी सगळे मनातल्या मनातच राहिले. आज चाळीस वर्षे तो निराळेच काहीतरी करीत होता. त्याच्या मनात विचार आला की, 'आरोपी रुबाशॉव्ह, इन्फिनिटीच्या - अनंताच्या तत्त्वाचे काय ? खगोल शास्त्रज्ञ बनण्याच्या तुमच्या त्या बेताचे काय झाले ?' असा प्रश्न न्यायालयात का विचारण्यात आला नाही ? जर का सरकारी वकीलाने त्याला हा प्रश्न विचारला असता तर रुबाशॉव्हपाशी त्या प्रश्नाचे उत्तर नव्हते. एकाएकी त्याला त्याच्या अपराधी भावनेचे मूळ सापडले...... यापेक्षा अपराध कोणता असू शकेल ? त्याने स्वतःच आयुष्याला फसविले होते. जीवितध्येयाशी प्रतारणा केली होती. जणू दुसऱ्याचे आयुष्य तो जगला होता.

मागे तुरुंगात असताना 'विश्वाला मर्यादा आहेत' ही बातमी जेव्हा त्याने वाचली होती, तेव्हाही त्याची ब्रम्हानंदी टाळी लागली होती नि मागाहून त्याला स्वतःची लाजही वाटली होती. आपण आध्यात्मात वाहून गेलो असे त्याला वाटले. कारण अशा प्रकारांवर पक्षाचा कटाक्ष असे. पक्ष असल्या अवस्थांना सुखासीन मध्यमवर्गाची थेरं म्हणे. हस्तीदंती मनोऱ्यात बसून केलेल्या कल्पनाविलास या शब्दात त्याची संभावना करी. पक्षाच्या दृष्टीने 'ती कर्तव्यच्युती होती', 'वर्ग संघर्षाला दिलेली सोडचिठी' होती. विश्वतादात्म्याची अवस्था पक्षाला प्रतिक्रांतीकारकतेचे लक्षण वाटे.

प्रतिगामी शक्तींशी मुकाबला करायचा तर दोन्ही पाय भक्कमपणे जमिनीवर रोवत असे पक्ष सांगत असे आणि ते कसे साधायचे याचे शिक्षण देत असे. पक्षाच्या मते



अनुक्रमणिका



राजकीयदृष्ट्या 'अनंताची कल्पना' आणि मीचा उल्लेख दोन्ही संशयास्पद होती. पक्षाला 'मी' चे किंवा व्यक्तीचे स्वतंत्र अस्तित्वच मुळी मान्य नव्हते. एक लाख लोकसमुदायाला तितक्याच संख्येने भागल्यानंतर जो भागाकार येतो तो म्हणजे व्यक्ती अशी पक्षाची व्यक्तीसंबंधीची व्याख्या होती. थोडक्यात व्यक्ती म्हणजे एक फक्त गणितातला आकडा असे पक्ष मानत होता. केवळ शून्य.

व्यक्तीला स्वतंत्र इच्छाशक्ती असू शकते ही गोष्ट पक्षाला मान्य नाही. मात्र त्याच वेळी प्रत्येक व्यक्तीने पक्षासाठी स्वेच्छापूर्वक आत्मत्याग करावयास हवा असेही पक्ष मानी. यात काही आत्मविसंगती आहे हे पक्षाला दिसत नव्हते. दोन पर्यायातून एक निवड करण्याची बुद्धी व्यक्तीपाशी असते ही कल्पना पक्षाला मान्य नव्हती. परंतु त्याच वेळी हाच पक्ष व्यक्तीने योग्य तोच मार्ग निवडला पाहिजे असाही आग्रह धरी. पाप–पुण्य, सुक्तासूक्त यातला भेदाभेद करण्याची पात्रता व्यक्तींच्या अंगी नाही अशी पक्षाची ठाम समजूत होती. परंतु त्याचवेळी हाच पक्ष पक्षाशी द्रोह करता येतो आणि व्यक्ती अपराधी असू शकते असेही मानत होता. व्यक्तीवर प्रचलित अर्थव्यवस्थेचा शिक्का असतो. प्रत्येक व्यक्ती अपाततःच अर्थव्यवस्थेची बंदी असून अर्थव्यवस्था ही अटळ नियती आहे हे पक्षाचे व्यक्ती आणि अर्थव्यवस्थेच्या कायद्याबद्दलचे मत. व्यक्ती म्हणजे अजस्त्र आर्थिक यंत्रातील एक छोटा खिळा. हे यंत्र चिरंतन काळासाठी किल्ली देऊन ठेवले असून ते थांबू शकत नाही आणि त्याच्यावर अन्य कुणाचा प्रभावही चालत नाही हे पक्षाचे तत्त्वज्ञान. परंतु त्याचवेळी पक्षाच आग्रह हा की, खिळ्याने यंत्राविरुद्ध बंड केले पाहिजे आणि बंड करुन यंत्राची दिशा बदलली पाहीजे. पक्षाच्या गणितात कोठेतरी चूक होत होती. पक्षाने तयार केलेले समीकरण काम करत नव्हते.

गेली चाळीस वर्षे या अर्थरूपी बलाढ्य शत्रूच्या विरुद्ध तो झगडला होता. हा शत्रू म्हणजे मानवजातीला पछाडणारा जणू असाध्य आजारच. पोटाच्या कॅन्सरसारखा आजार. मानवजातीची आतडी कुरतडून खाणारा आजार. शस्त्रक्रिया करायची तर ती त्या जागी करावयास हवी. हा भाग एकदा काढून टाकला की बाकी सगळे ठीक होणार आहे. हा भाग गेला की बाकी सगळे गेले. यांच्या व्यतिरिक्त इतरांचे बोलणे हा केवळ पोरकटपणा आहे, कल्पनाविलास, वैदूगिरी आहे. मरायला टेकलेला इसम मंत्रतंत्र आणि छां, छू ने बरा करता येत नाही. तेथे शल्यविशारदाची सुरी नि नेमके निदान याच गोष्टी हव्यात. गेली चाळीस वर्षे पक्षाने त्याला या गोष्टी शिकवल्या. त्या बरहुकूम त्याच्याकडून पक्षाचे काम करून घेतले. पक्ष सांगत होता की, एकदा शस्त्रक्रिया केली, अर्थव्यवहाराचे स्वरूप बदलले की सगळे सरळ होईल. परंतु प्रत्यक्ष अनुभव मात्र अगदीच वेगळा आला. प्रत्येक वेळी शस्त्रक्रिया करुन नासका भाग काढून टाकावा नि लगेच जुन्या जागी नवा

फोड यावा असे घडले होते. पुन्हा पुन्हा शस्त्रक्रिया करण्यात येत होती नि पुन्हा पुन्हा जुना रोग नव्या रूपाने अवतीर्ण होत होता. थोडक्यात पक्षाचे समीकरण पुन्हा एकदा अयशस्वी, खोटे, फसवे ठरले होते.

पक्षात शिरताना त्याने काही शपथा घेतल्या होत्या. आज चाळीस वर्षे पक्षाच्या-पंथाच्या त्या शपथा त्याने कसोशीने पाळल्या होत्या. बुद्धिप्रामाण्यवादाच्या कायद्यांना त्याने घट्ट धरून ठेवले होते. उलट पूर्वीच्या काळी, पक्षात येण्याआधी जी काही जुनी नीती त्याने आत्मसात केली होती, नीती तर्कविसंगत नीती बुद्धिवादाच्या ॲसिडने जाणीवेतून त्याने पार जाळून टाकली होती. अंतर्यामी वावरणाऱ्या त्याच्या निःशब्द भागीदाराने अनेकवेळा त्याला खुणावले. परंतु मोठ्या प्रयत्नाने त्याने तो मोह दूर लोटला. ब्रम्हानंदसुखाशी सर्व शक्तीनिशी तो झगडला नि झगडून त्या सुखाला त्याने नकार दिला. परंतु या सगळया कर्तृत्वाचा शेवट काय झाला होता ? त्याच्या कर्तदगारीने त्याला कोठे आणून सोडले होते? बिनतोड आणि तर्कशुध्द सत्यांच्या गृहीतकृत्यांचा हात धरून तो आयुष्याच्या प्रवासाला निघाला, पण या गृहीतकृत्यांनी त्याला ॲब्सर्ड - पूर्णपणे हास्यास्पद दशेला आणून पोहोचविले होते. ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिनच्या विनतोड युक्तिवादाने त्याला थेट सार्वजनिक पोलीस खटल्याच्या भेसूर आणि राक्षसी खेळात अडकविले होते. बहुदा असे असावे की प्रत्येक तार्किक विचार तर्काच्या अंतिम टोकाला घेऊन जाण्याचा प्रयत्न करणे हेच माणसासाठी हितावह नसावे.

खिडकीच्या गजातून रुवाशॉव्ह बाहेरच्या आकाशाकडे पाहातो. मशिनगनच्या मनोऱ्याच्यावर पसरलेले निळेभोर आकाश त्याच्या दृष्टीला पडते. त्याला त्याचा भूतकाळ आठवू लागतो. तर्कशुध्द दुद्धीच्या पूर्ण नादी लागल्याने, बुद्धिप्रामाण्यवादाचा एकांगी ध्यास घेतल्याने आयुष्याचे काय झाले हे त्याला दिसू लागते. त्याच्या डोक्यात विचार येतात की गेली चाळीस वर्षे बुद्धिप्रामाण्यवादाचा आपला वारू जणू चौखूर उधळला. आपली जुनी शास्त्रे सांगत होती की 'हे करू नकोस, ते करू नकोस', 'हे बरे नाही, ते बरे नाही', पण आपण त्यांचे सांगणे जुमानले नाही. आपण त्यांचे शब्द धुडकावून लावले. आपणाला कुणाची बंधने नको होती. पण आता वाटते की आयुष्यात सगळेच बंध तोडून टाकून थेट एका दमात ध्येय गाठू पाहाणे माणसाच्या नशिबात लिहिलेले नाही. तुमच्या वेगावर कसल्या मर्यादा हव्यात. जुनी नीतीबंधने याच त्या मर्यादा. पण या मर्यादा झुगारून आम्ही नुसते ध्येयाकडे धावत सुटलो होतो.

नाही. पक्षाने मांडलेले समीकरण बरोबर नव्हते. ते खरे ठरले नाही. ते फुकट गेले. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते आणि ती ही की अंतिम ध्येय दाखविले आणि हाती दंडा व शस्त्रक्रियेचे हत्यार देऊन समाज पुरुषावर शस्त्रक्रिया करण्यासाठी माणसाला

धाडले तर ते योग्य ठरत नाही. समाजपुरुषावर माणसाने अशी शस्त्रक्रिया करणे अजिबात चूक आहे. एक तर माणूस अद्यापी अपक्व आहे. या कामात कच्चा आहे आणि दुसरे म्हणजे तो अनुभवी आहे. त्याचे वय कमी आहे. पुढे कदाचित या कामासाठी तो योग्य ठरेलही ! तेव्हा अशी शस्त्रक्रियासुद्धा योग्य ठरेल. आज मात्र तसे करणे योग्य नव्हे. क्रांतीच्या पहिल्या प्रयोगभूमीत - क्रांतीचा पितृभूत, स्वातंत्र्याच्या बालेकिल्ल्यात या प्रयोगाच्या नावाखाली माणसाने काय धुमाकूळ घातला, कोणती अनन्वित कृत्ये केली ती आपल्या डोळ्यासमोरच आहेत. परंतु असे असूनसुद्धा क्रांतीच्या आणि स्वातंत्र्याचा बालेकिल्ला काहीही करून सुरक्षित राखला पाहिजे या तत्त्वाच्या नावाखाली ग्लेटकिन त्यातील प्रत्येक अनन्वित कृत्याचे समर्थन करीत होता. स्वातंत्र्याचा बालेकिल्ला आतून हा बालेकिल्ला कसा दिसत होता हे कोणी पाहिले होते काय ? सिमेंट कॉंक्रिट वापरून कधी स्वर्ग बांधता येत नाही. क्रांतीचा हा बालेकिल्ला. सुरक्षित राखता येईल. परंतु जगाला देण्यासारख संदेश त्या बालेकिल्ल्यापाशी नाही किंवा जगाला देण्यासारखा आदर्शसुद्धा त्या बालेकिल्ल्यापाशी नाही. ख्रिस्ताने जगाला परमेश्वराच्या राज्याची कल्पना दिली. मध्ययुगीन पोपमंडळींनी आपल्या वागण्याने त्या कल्पनेला काळे फासले. आता समाजवादी राज्याच्या कल्पनेला नंबर एकच्या वागण्याने तसेच काळे फासले गेले आहे. देशातली सर्वोत्तम व्यक्ती मेली की, देशाचा ध्वज अर्ध्यावर उतरवतात. क्रांतीचा ध्वज आज अर्ध्यावर फडकत आहे.

रुबाशॉव्हच्या येरझाऱ्या चालूच होत्या. रात्र वाढत होती. काळोख दाट होत होता. सगळीकडे शांतता होती. रुबाशॉव्हचे विचार सुरूच होते. थोड्याच अवधीत आपणाला बोलावणे येईल. समीकरणात कोठेतरी गफलत राहून गेली होती - नाही. बहुतेक आपण स्वीकारली ती गणिती पद्धतीच संपूर्णपणे चूक असावी. बरेच दिवस झाले ही पद्धती अमलात आणण्यात आपले काहीतरी चुकत आहे असे त्याला वाटत होते. रिचर्डने स्वतःची हकिकत सांगितली नि दोन हात जोडलेले मेरी मातेचे चित्र त्याच्या दृष्टीस पडले तेव्हापासून त्याला तसे वाटू लागले होते. परंतु तसे मान्य करावयास त्याचे मन धजावत नव्हते. कदाचित क्रांती तिचे पूर्ण दिवस भरण्याच्या आधीच जन्माला आली असावी. त्यामुळे धडधाकड बाळाऐवजी एक मुडदूस जन्माला आले. कदाचित क्रांतीसाठी जो मुहूर्त निवडला तोच चुकीचा असावा. रोमन संस्कृतीमधे सुद्धा असेच घडले नव्हते काय ? साधारण ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या आगेमागेच तत्कालिन हुषार मंडळींना असे वाटले होते ही संस्कृती आता पूर्णपणे किडली आहे नि तिचे दिवस भरले आहेत. आज आमची संस्कृती जशी गळ्यापर्यंत चिखलात बुडाली आहे तसेच तेव्हासुध्दा घडले होते. म्हणूनच त्या काळातील उत्तमोत्तम लोकांना असे वाटले की समाजाची घडी बदलण्याचा मुहूर्त जवळ आला आहे. परंतु तसे न होता भ्रष्टाचाराने सडलेली रोमन संस्कृती आणखी पाचशे वर्षे तग धरून राहिली. आजसुद्धा तेच घडले असावे. इतिहासाची नाडी अतिशय मंद आहे.

माणूस वर्षाच्या हिशेबाने गणित करतो. इतिहास पिढ्यांच्या हिशेबाने. कोणी सांगावे क्रांतीसाठी आम्ही जी वेळ निवडली तीच कदाचित खूप आधीची असावी. तसे असेल तर सारेच चुकले आहे.

कदाचित सृष्टोत्पत्तीचा तो फक्त दुसरा दिवस असावा. 'आकाशात सूर्य तळपू या' असे शब्द अद्यापी उच्चारायचे असावेत. उत्पादन आणि अर्थव्यवस्था पुढे जाते, संख्या मागे राहते, अशी एक संख्येच्या तुलनात्मक अपरिपक्वतेबद्दलची उपपत्ती मागे त्याने स्वतःच मांडली होती. जीवंत रहिल्यास तीच उपपत्ती पुन्हा व्यवस्थित बांधावी असे त्याच्या मनात आले ! .........

कोठडीत पूर्ण स्तब्धता होती. रुबार्शोव्हच्या स्वतःच्या पावलांचा आवाज काय तो ऐकू येत होता. जेव्हा कधी ते त्याला देहान्तशासनासाठी घेऊन जातील तेव्हा साडेसहा पावले दरवाजाकडे. साडेसहा पावले खिडकीकडे. पाठीमागे रात्र वाढत होती. काळोख दाटत होता. आणखी काही घटका. मग सर्व संपलेले असेल. अकस्मात त्याच्या डोक्यात विचार आला की, 'आज या क्षणी आपण मृत्यूला कवटाळत आहोत ते कशासाठी ?' या प्रश्नाला त्याच्यापाशी उत्तर नव्हते.

ही सगळी तत्त्वप्रणालीची चूक होती. कदाचित 'साध्य उदात्त असले की साधनाची फिकीर करू नये' हा जो सिद्धांत इतकी वर्षे पवित्र आणि वादातीत मानून ज्याच्या नावाने त्याने अनेकांना बळी दिले होते नि ज्याच्यामुळे खुद्द स्वतःच आज तो बळी जात होता त्या सिद्धांताचीच ही चूक असावी. साध्य महत्त्वाचे साधन क्षुल्लक. साध्याला महत्त्व आहे. साधनसुचितेला महत्त्व नाही. साध्य महान असले की साधनाच्या शुद्धाशुद्धतेकडे लक्ष देण्याचे कारण नाही हे ते महावाक्य. ज्या वाक्याने क्रांतीच्या चळवळीतील सगळ्या बंधुतेचा घात केला होता आणि क्रांतीकारकांचे डोकेफिरवून त्याना मोकाट बनविले होते. कधीतरी आपल्या रोजनिशीत त्याने काय बरे लिहिले होते ? 'आम्ही सगळे संकेत फेकून दिले. कसल्याही प्रकारच्या नैतिक कल्पनांचे भरवाण न घेता आम्ही आमचे गलबत हाकारले. शुद्ध बुद्धिवाद, तर्काच्या अंतिम टोकावर लक्ष देणारे तर्कशास्त्र हेच आता आमचे एकमेव मार्गदर्शक तत्त्व होय.'

कदाचित सगळया नाशाचे, सगळया पापाचे बीज तेथे असावे. कदाचित भरवाण न घेता गलबत हाकारणे हेच माणसाच्या बाबतीत चूक असेल. कदाचित केवळ बुद्धिवाद हा फसवा वाटाड्या असावा. हे एक सदोष होकायंत्र असावे. बुद्धिवादाच्या आधाराने निघालेल्या मनुष्याने प्रवासात इतकी वेडीवाकडी वळणे घेतली, इतक्यांदा मार्ग बदलला की मुख्य ध्येय शेवटी धुक्यात हरवून गेले.

कदाचित लवकर अंधारयुगाची सुरवात होईल. कदाचित आणखी काही काळाने नवे युग अवतरेल. नवी चळवळ जन्म घेईल. नव्या झेंड्याखालील चळवळ, नव्या धारणांवाली चळवळ. या नव्या चळवळीला 'आर्थिक नियतिक्रम - इकॉनॉमिक फेटॅलिटी आणि 'ब्रह्मानंदाची जाण' या दोन्ही गोष्टींची मातबरी वाटेल. कदाचित हा नवा पक्ष आपल्या अंगावर महंतांची भगवी वस्त्रे चढवेल आणि 'साधन महत्त्वाचे, साध्य गौण,' 'साधनाची शुचिता सांभाळा आणि मगच साध्याची वाट धरा किंवा 'साधन शुद्ध तर साध्य शुद्ध' या प्रकारची शिकवणूक देत जगभर फिरेल. कदाचित एक लाख समुदायाला लाखाच्या संख्येने भागले की जो भागाकार येतो त्या भागाकाराला व्यक्ती असे म्हणतात. ही जुनी शिकवणूक चूक आहे असे सांगेल आणि भागाकाराऐवजी गुणकारावर आधारीत नव्या गणिताचा प्रसार लोकांमधे करेल. जेव्हा असे घडेल तेव्हा लाख लोक एकत्र आले की त्यांचा मूकबधिरांचा गठ्ठा तयार होतो हे जुने मत टाकून द्यावे लागेल आणि त्याऐवजी लाख लोक एकत्र येतात तेव्हा स्वतंत्र आत्मे एकत्र येतात आणि त्या आत्म्यातून एक महाकाय व्यक्तित्व तयार होते हे नवे तत्वज्ञान जन्मास येईल. हे नवे तत्त्वज्ञान पुढे असे सांगेल की लाख आत्मे एकत्र येऊन जे नवे व्यक्तित्व तयार होते त्या व्यक्तित्वाला स्वतंत्र बुद्धी आणि स्वतःची स्वतंत्र इच्छाशक्ती असते; हे व्यक्तित्व जितके कृतीमधे रममाण होते तितकेच ते ब्रह्मानंदसुखातसुद्धा रममाण होते.

* * *

दूरवरून पडघमचे ठोके ऐकू येतात. हळूहळू तो आवाज रुबाशॉव्हच्या कोठडीपाशी येतो. रुबाशॉव्हला आपले पाय जड झाल्यासारखे लागतात. भिंतीवर टकटक असा आवाज होतो. शेजारचा कैदी संदेश देत असतो,

(कैदी नं. ४०२) : 'ते ओठफाटक्याला घेऊन जाण्यासाठी आले आहेत. त्याने तुम्हाला शेवटचा प्रणिपात सांगितला आहे.'

रुबाशॉव्हच्या पायातला जडपणा जातो. तो दरवाजाच्या छिद्राशी येतो.

नेहमीप्रमाणे व्हरांड्यात विजेचे दिवे प्रकाशत असतात. फरशीवर फरफटल्या जाणाऱ्या पावलांचा आवाज येतो. ओठफाटका रुबाशॉव्हच्या दारापाशी येतो. त्याचे ओठ थरथरत असतात. हातात हातकड्या. हात विचित्र प्रकारे पिरगळून बांधलेले. मागे एक धिप्पाड अधिकारी. अधिकाऱ्याच्या कमरेला रिव्हॉल्वर. कदाचित ग्लेटकिनच असावा.

(कैदी नं. ४०२) : 'मोठ्या धैर्याने वागला. तुमच्या आयुष्याची आता फक्त दहा मिनिटे उरली आहेत'

रुबाशॉव्हने जाहीर कबुलीजबाब द्यायचे ठरविल्यापासून त्या दोघातले संभाषण पूर्णपणे बंद पडले होते. परंतु शेवटच्या क्षणी रुबाशॉव्हच्या मनावर ताण येऊ नये या हेतूने कैदी नं. ४०२ ने संभाषण पुन्हा सुरू केले होते.

(रुबाशॉव्ह) : 'हे सगळं एकदा संपलं असतं तर बरं झालं असतं.'

(कैदी नं ४०२) :'माझी खात्री आहे तुम्ही कशालाही दाद देणाऱ्यांपैकी नव्हेत. तुम्ही म्हणजे साक्षात सैतानाचे भाऊच आहात. सैतानाचे भाऊ. काय ? थांबा, कानोसा घेऊ नका. जेव्हा ते येतील तेव्हा मी तुम्हाला सांगेन. पण काय हो, समजा त्यानी तुम्हाला सोडून दिले तर पुढील आयुष्यात तुम्ही काय कराल ?

(रुबाशॉव्ह) : 'खगोलशास्त्राचा अभ्यास करीन.'

(कैदी नं ४०२) : 'मी सुद्धा. दुसऱ्या ग्रहावर माणसे राहातात असे मी वाचले आहे. हे बघा, मी तुम्हाला एक सूचना केली तर राग मानू नका. लघुशंका आटपून घ्या. मन तयार असलं तरी शरीर तयार नसतं. ते कच खात. काय खरं ना ! हाः हाः हाः हाः !'

रुबाशॉव्ह स्वतःशी हसतो. बादलीशी जाऊन कार्यक्रम आटपून घेतो.

(कैदी नं ४०२) : 'मला अद्याप अठरा वर्षे तुरुंगात काढायची आहेत. नेमके ६५३० दिवस.'

(कैदी नं. ४०२) :'ते येत आहेत.' ........ दुर्दैवाची गोष्ट. आपल्या गप्पा आता कोठे सुरू झाल्या होत्या. एवढ्यात ते आले.

कुलपात किल्ली फिरते. दरवाजा सताड उघडण्यात येतो. रुबाशॉव्हचे हात मागे वळवून बांधण्यात येतात. तेथे काचते, वेदना होतात.

तळघराकडे जाणारा जिना. रुबाशॉव्हच्या चालण्याचा वेग मंद होतो. रुबाशॉव्हबरोबर नागरी अधिकारी असतो. तो जिन्याच्या तोंडाशी थांबतो. रुबाशॉव्हला तो विचारतो, 'तुमची काही इच्छा आहे काय ? रुबाशॉव्ह 'नाही' असे उत्तरतो आणि पायऱ्या उतरू लागतो. पायऱ्या अरुंद आहेत. जिन्यावर दिव्याचा उजेडही फारसा नाही. रुबाशॉव्हला पायऱ्या फार काळजीने उतराव्या लागतात. पडघम वाजायचा थांबतो. गार्डसमन दराग तीन पायऱ्यांचे अंतर ठेवून उतरत आहे हे रुबाशॉव्हला जाणवते.

जिना नागमोडी बनतो. पायऱ्या पाहण्यासाठी रुबाशॉव्ह पुढे वाकतो. अकस्मात

त्याचा पिन्स-नेझ नाकावरून निसटतो नि खाली पडून त्याचे तुकडे होतात. शेवटच्या पायरीवर काड्या पडतात. रुबाशॉव्ह क्षणभर अडखळतो. पण अंदाजाने सगळ्या पायऱ्या उतरतो. पाठीमागल्या इसमाने फुटका पिन्स-नेझ उचलून खिशात घातल्याचे त्याला जाणवते. पण तो लक्ष देत नाही.

आता जवळ जवळ तो आंधळा बनला आहे. परंतु पायाखाली भक्कम जमीन होती. जिना संपला होता. व्हरांडा लागला होता. व्हरांड्याच्या भिंती पुसट दिसत होत्या. व्हरांड्यात लांबीचा अंदाज येत नव्हता. गणवेशातल्या इसमाची नजर आपल्या मानेच्या पाठीमागच्या भागावर आहे असे रुबाशॉव्हला जाणवते. परंतु रुबाशॉव्ह मान वळवून मागे पाहण्याचा प्रयत्न करीत नाही. काळजीपूर्वक तो पावलामागून पावले उचलत राहातो.

व्हरांड्यातून आपण बराच वेळ चाललो असे त्याला वाटते. परंतु काहीच घडत नाही. गणवेशधारी केसमधून रिव्हॉल्वर बाहेर काढील तेव्हा जाणवेल असे त्याला वाटले. हा इसम दंतवैद्यासारखा आहे की काय ? दंतवैद्य कसा पेशंटला बेसावध ठेवून हासभास नसता एकदम त्याची शस्त्रे बाहेर काढतो तसे हा करणार आहे की काय ? एखादा वेगळा विचार डोक्यात आणण्यासाठी रुबाशॉव्ह प्रयत्न करतो. परंतु त्याची सगळी शक्ती मागे वळून पाहण्याची इच्छा दाबून टाकण्यात खर्च होते. त्याला त्याची दाढदुखी आठवते. खटल्याच्या शेवटच्या दिवशी जेव्हा रुबाशॉव्हला शांत वाटू लागले तेव्हा त्याची दाढदुखीसुद्धा बंद झाली. कदाचित त्याक्षणी हिरडी फुटून पू बाहेर निघून गेला असावा. पण ही एक गंमतच घडली होती. खटल्याच्या वेळी तो काय बरे बोलला होता ? 'माझी जन्मभूमी, हा लोकसमुदाय आणि जगभरची असंख्य जनता या सर्वांना माझा प्रणिपात असो......' आणि पुढे या लोकसमुदायाचे काय झाले ? जनतेचे पुढे काय झाले ? त्याला परत एकदा जुन्या करारातील संदर्भ आठवतो. गेली चाळीस वर्षे ओसाड वाळवंटातून आणि काट्यातून ह्या जनतेला फरफटविण्यात येत आहे. कधी भावी भूस्वर्गलोकाची आशा दाखवून, तर कधी चाबकांच्या फटक्याचा धाक दाखवून वा भीती घालून, कधी काल्पनिक बक्षिसांची लालूच दाखवून तर कधी काल्पनिक दहशतींचा दरारा दाखवून ओसाड वाळवंटातून या जनतेला चालवण्यात येत आहे. परंतु हा आश्वासित स्वर्ग आहे तरी कोठे ? तो काही नजरेला पडलेला नाही.'

मानवजातीच्या नशिबात असा पृथ्वीवरचा स्वर्गलोक असणे शक्य आहे काय? मरण येण्यापूर्वी या प्रश्नाचे उत्तर त्याला मिळाले असते तर त्याला अत्यंत आनंद झाला असता. जुन्या करारातला मोझेस आश्वारित स्वर्गाचा उल्लेख करतो. परंतु खुद्द त्यालासुद्धा या स्वर्गात पाऊल टाकता आले नव्हते. फक्त त्याला या स्वर्गाचे दुरून दर्शन घडविले गेले होते. सिनाई पर्वताच्या शिखरावरून, पायथ्याशी पसरलेल्या भावी स्वर्गाचे दर्शन त्याने



अनुक्रमणिका

घेतले होते. त्यामुळे मोझेस सुखाने मेला. आपल्या ध्येयाची परिपूर्ती खात्रीपूर्वक होणार आहे असे जर माणसाला स्वतःच्या डोळ्यांनी पाहाता आले तर त्याला मरणाचेसुद्धा काही वाटत नाही. सिनाई पर्वतावरून मोझेसला आश्वासित स्वर्गस्थानाचे दर्शन घडल्याने त्याने सुखाने देह ठेवला. परंतु निकोलाय सालमानोविच रुवाशॉव्ह महाशयांची अवस्था काय आहे ? त्यांना पर्वताच्या शिखरावर नेण्यात आले नव्हते. त्यामुळे उंचावरूनच फक्त जी दिसतात अशी विलोभनीय दृश्येही त्यांनी पाहिली नव्हती. रुवाशॉव्ह महाशय जमिनीवर उभे राहून भोवताली पाहात होते आणि ज्या ज्या दिशेला त्यानी पाहिले त्या त्या दिशेला ओसाड मरूभूमी नि रात्रीचा काळाकुट्ट अंधार याच्याव्यतिरिक्त आणखी काहीही त्यांच्या नजरेला पडले नव्हते.

डोक्याच्या मागच्या बाजूला दद् असा फटका बसला. या फटक्याची त्याने अपेक्षा केली होती. परंतु तरीही त्या क्षणी तो बेसावध होता. त्याचे पाय लटपटले, त्याच्या शरीराने अर्ध-गिरकी घेतली. पडता पडता त्याच्या डोक्यात विचार आला की, किती नाट्यपूर्ण. पण दुःख कोठे गेले ? असे कसे ? काहीच कसे जाणवत नाही ? त्याचे शरीर जमिनीवर पसरले. गाल लादीवर टेकले. काळोख दाटला. समुद्राच्या काळ्या लाटांवर आरूढ झाल्याचा भास त्याला झाला. पाण्यावर धुके पसरावे तशा धुरकट आठवणी त्याच्या डोक्यात जमा झाल्या.

बाहेरच्या दरवाजावर कोणीतरी धक्के मारीत होते. त्याला स्वप्न पडले. आपणाला पकडून नेण्यासाठी येत आहेत. पण या क्षणी तो कोणत्या देशात होता ?

झग्याच्या बाहीत हात खुपसण्याचा प्रयत्न त्याने केला. अरे, पण आपल्या डोक्यावर आपल्याकडे नजर लावून पहाणारा हा रंगीत छापिल फोटो कोणाचा आहे ?

तो नंबर एकचा आहे की त्या दुसऱ्याचा आहे ? ओठावर औपचारिक स्मित वाळगणाऱ्याचा की निर्जीव बाहुलीवाल्या त्या दुसऱ्याचा ? एक आकारहीन आकृती त्याच्या शरीरावर ओणवली. त्याला रिव्हॉल्वरच्या पट्ट्याचा वास आला, पण तिच्या खांद्यावर ही मानचिन्हे कोणती आहेत ? आणि कुणाच्या नावाने तिने हे भेसूर पिस्तूल आपल्यावर रोखले आहे ?

दुसरा दणका उडाला आणि गोळी त्याच्या कानातून आरपार गेली. सगळे शांत झाले. समुद्राच्या लाटांचा आवाज. लाटा त्याचे शरीर वर उचलत होत्या. लाट खूप दूरवरून आली होती आणि आता शांतपणे अनंताकडे निघाली होती.

• • •



अनुक्रमणिका

# ३. आर्थर कोस्सलर आणि डार्कनेस ॲट नून – एक भाष्य

कोस्सलर यांची 'भर मध्यान्हीचा अंधार' ही एक ऐतिहासिक कथा आहे. तशीच ती राजकीय स्वरूपाचीही कथा आहे. तिच्यातील प्रसंग इतिहासात खरोखर घडलेले आहेत आणि तिच्यात चर्चिलेले प्रश्न राजकीय तत्त्वज्ञानाशी संबंधित आहेत. पण याच्याच बरोबर रुबाशॉव्ह या त्या कथेच्या नायकाच्या आत्मिक आणि बौद्धिक प्रवासाचीही ती कथा आहे. निकोल्स सालमानोविच रुबाशॉव्ह या सडाफटिंग गृहस्थाच्या आत्मिक व बौद्धिक प्रवासाची कथा. काही एका विशिष्ट कारणांमुळे रुबाशॉव्ह राजकीय आणि वैयक्तिक दोन्ही प्रकारच्या संकटात सापडलेला आहे नि आयुष्याच्या त्या विशिष्ट टप्प्यावर आपण या संकटामध्ये का सापडलो याचा शोध त्याने चालविला आहे. हा शोध घेण्यासाठी मागील संपूर्ण जीवनाचा ताळेबंद तो मांडू पाहातो. परंतु उलट सुलट अनेक प्रकारे जमाखर्च लिहून देखिल त्याच्या जमाखर्चाची बाकी शून्य येत नाही आणि ताळेबंद जमत नाही. अनेकदा तो जमेच्या नि खर्चाच्या बाजू तपासून पाहातो तरीही काही जमत नाही. शेवटी खर्चाच्या बाजूला तो एक नवी नोंद भरीस घालतो. ही नोंद भरीस घालताच त्याचा हिशोब जमतो. ताळेबंद शून्य येतो. परंतु ही नोंद आजवर त्याला कधीच महत्त्वाची वाटली नव्हती. त्यामुळे त्याने तिच्याकडे कधी फारसे लक्षही पुरविले नव्हते. आज अगदी नाईलाज म्हणून प्रथम तो त्या नोंदीची दखल घेत होता आणि तरीही ही नोंद नेमकी काय आहे, म्हणजे तिचे स्वरूप कसे आहे या प्रश्नाचे उत्तर त्याचे त्यालासुद्धा माहित नव्हते ते नव्हतेच ! बरे ही नोंद नेमकी कशात मोडते हेही त्याला समजत नव्हते. अनेक वेगवेगळ्या नावाने ती नोंद तो लिहू पाहातो. परंतु येरे माझ्या मागल्या. प्रत्येक वेळी त्या नोंदीची नेमके स्वरूप त्याला चकवते ते चकवतेच. शेवटी तो त्या नोंदीची उदाहरणे शोधू लागतो आणि त्या उदाहरणांवरून गणितातल्या समीकरणांसारखे एक समीकरण तो तयार करतो. बरे गोष्ट अशी होती की आजवर या नोंदीला त्याने यत्किंचितही महत्त्व दिले नव्हते, आणि आता जर का त्याने त्या नोंदीला महत्त्व दिले असते तर आजवर त्याने जे आयुष्य घालविले, स्वतःच्या मताने जी तथाकथित थोर थोर कृत्ये पार पाडली होती ती शुद्ध स्वतः केलेली स्वतःची वंचना ठरणार होती. रुबाशॉव्ह अशाप्रकारे फार मोठ्या शृंगापत्तीत सापडला होता. एकीकडे त्याला वाटत होते की ही नोंद जमाखर्चात घेताच कामा नये. तर दुसरीकडे त्याला हेही जाणवत होते की ही नोंद वगळली तर जमाखर्च खोटा ठरत होता. जे आयुष्य आजवर आपण जगलो त्याचा अर्थ लागत नव्हता. ही नोंद घ्यावी तर आपले संपूर्ण आयुष्य फुकट गेले हे त्याला मान्य करावे लागणार होते. नोंद न घ्यावी तर आयुष्याचा अर्थ त्याला समजणार नव्हता. कारण ही नोंद जर का त्याने हिशेबात घेतली नसती तर जीवावरची



अनुक्रमणिका

संकटे सहन करून, वाटेल तेवढे परिश्रम घेऊन, प्रसंगी खून, हिंसा, कपटकारस्थान, दहशत इत्यादींचा आश्रय घेऊन ती राजकीय क्रांती घडवून आणण्यात त्याने भाग घेतला होता. ती क्रांती सध्याच्या भ्रष्ट आणि अवनत दशेला कशी प्राप्त झाली याचा उलगडा त्याला होणार नव्हता. एवढेच नव्हे तर आजच्या त्या विशिष्ट क्षणी 'नाही श्रद्धा नाही आशा' या निराश मनोवस्थेला पोचून स्वतःच्या पायानी स्वतःच्याच मारेकऱ्यांच्या भेटीला तो जो निघाला होता, त्याचाही अर्थ त्याला स्पष्ट होणार नव्हता आणि हा अर्थ स्पष्ट होत नाव्हता तोवर इतिहास घडविण्याचे खरे, संयुक्तिक, न्याय्य मार्ग कोणते आणि त्याच्या उलट मार्ग कोणते याही प्रश्नाचा उलगडा होत नव्हता, रुबाशॉव्ह एका शृंगापत्तीत सापडला आहे नि ही शृंगापत्ती त्याने स्वतःच्याच वागण्याने उत्पन्न केली आहे. रुबाशॉव्हला त्याच्या प्राप्त परिस्थितीचे मर्म शोधायचे आहे, प्राप्त परिस्थितीचा अर्थ लावायचा आहे.

या कादंबरीवर बोलताना एक गोष्ट प्रारंभीच सांगावयास हवी आणि ती ही की संपूर्ण कादंबरी लेखकाच्या स्वतःच्या अनुभवांवर आधारलेली आहे. 'भर मध्यान्हीच्या अंधाराचा' नायक ज्या प्रकारच्या नैतिक शृंगापत्तीमधे अडकल्याचे आपण पाहतो तसल्याच शृंगापत्तीमधून खुद्द लेखकही गेलेला आहे. जर तसे नसते तर आज ही कादंबरी भावनोत्कट बनली आहे तशी ती बनलीच नसती.

रुबाशॉव्हच्या बाबतीत ही शृंगापत्ती राजकीय व तात्त्विक पातळीशीच बंदिस्त राहिली आहे. त्यामुळे निखळ खाजगी अनुभवांना तेथे फारसा वाव मिळू शकला नाही. असे असले तरी लेखकाच्या स्वतःच्या अनुभवांना या कादंबरीलेखनाच्या बाबतीत खूपच महत्त्व आहे. आयुष्याच्या एका विशिष्ट टप्प्यावर कोस्सलरनी ही कादंबरी लिहिली आहे. येथून त्यांच्या आयुष्याला नवी कलाटणी मिळाली होती. ही कादंबरी लिहिली जाईस्तोवर स्वतःच्या आयुष्यात कोस्सलर यानी जे जे भोगले ते सर्व या कादंबरीत प्रतिबिंबित झाल्याचे आपण पाहू शकतो. या कादंबरीच्या बाबतीतली दुसरी गोष्ट अशी की लेखकाचे खाजगी नि वैयक्तिक अनुभव जसे या कादंबरीत प्रतिबिंबित झाले आहेत तशाच प्रकारे लेखकाच्या समकालिन जगातील राजकीय, सामाजिक व ऐतिहासिक घडामोडींचे आणि विचारप्रवाहांचे प्रतिबिंबही तिच्यात उमटले आहे. याचे एक कारण असे आहे की शतकाच्या पूर्वार्धात सर्व युरोपभर अनेक प्रकारचे सामाजिक आणि राजकीय उत्पात घडून आले होते, नि त्यातील बऱ्याच प्रकरणात कोस्सलर यानी सक्रिय भाग घेतला होता. साहजिकच त्यानी तत्कालिन राजकारणाचा जो अनुभव घेतला त्या अनुभवाचे पडसाद त्यांच्या लेखनात न उमटणे अशक्य होते. 'भर मध्यान्हीचा अंधार' ही एक आत्मचरित्रात्मक कादंबरी आहे. परंतु वर सांगितले त्या कारणांमुळे इतर त्याच जातीच्या कादंबऱ्यांपेक्षा ती वेगळी बनली आहे. सामान्यतः आत्मचरित्रात्मक कादंबऱ्यांतील चित्रित

वास्तव संपूर्णपणे व्यक्तिनिष्ठ असते. येथे ते वस्तुनिष्ठ आहे. राजकीय व सामाजिक जातीचे आहे. कारण या कादंबरीची पार्श्वभूमीच राजकीय आहे. साहजिकच ही कादंबरी समजून वाचता येण्यासाठी विसाव्या शतकाच्या पूर्वार्धाचा राजकीय व सामाजिक इतिहास, विशेष करून संघर्षाचा इतिहास माहित करून घ्यावा लागेल. ही सगळी माहिती कोस्सलर यांच्या 'ॲरो इन द ब्ल्यू' व 'इन्व्हिजिबल रायटींग' या आत्मचरित्राच्या पहिल्या दोन खंडात आली आहे. आपण तेथूनच आपल्या अभ्यासाला सुरूवात करू.

आर्थर कोस्सलर हे जन्माने हंगेरियन आणि धर्माने ज्यू. पण असे असले तरी त्यांचे शालेय व अन्य शिक्षण हंगेरियन भाषेऐवजी जर्मन भाषेतून झाले होते. 'भर मध्यान्हीचा अंधार' ही त्यांची कादंबरी प्रथम जर्मन भाषेत निघाली. मग ती इंग्रजीत केली गेली. कोस्सलरनी जर्मन भाषेतून लिहिलेली ही अखेरची कादंबरी. पुढे त्यानी इंग्लंडचे नागरिकत्व स्वीकारले. इंग्रजीत ही कादंबरी १९४० मध्ये प्रसिद्ध झाली. इंग्लंडमधे स्थायिक झाल्यानंतर आपली पुस्तके ते मुळातूनच इंग्रजीतून लिहू लागले. कोस्सलर जरी इंग्रजीतून लेखन करीत होते तरी खुद्द त्यांचे समकालिन इंग्रज लेखक नि ते स्वतः या दोहोत एक मोठा बौद्धिक फरक आहे आणि हा फरक लेखनाकडे पाहाण्याच्या त्यांच्या दृष्टिकोनात आहे. हा दृष्टिकोन भिन्न आहे. साहित्याकडे पाहाण्याचा कोस्सलर आणि इंग्रज लेखक यांचा दृष्टिकोन भिन्न असल्याने इंग्रजी भाषिकात कादंबरीची हवी तशी दाद घेतली गेली नाही आणि त्यांना वाजवी लोकप्रियताही मिळाली नाही. आयर्लंड हा देश वगळता खुद्द इंग्लंडमधे ही कादंबरी फारशी वाचलीच गेली नाही. इंग्लंड वगळता अन्य युरोपीय देशात कोस्सलरना खूप मोठा वाचकवर्ग लाभला. इंग्रज वाचकांमधे कोस्सलर यांच्या कादंबरीस फारशी चांगली दाद मिळाली नाही हा केवळ योगायोग नव्हता. ज्या प्रकारच्या सामाजिक, राजकीय वातावरणात कोस्सलर वाढले होते नि जे वातावरण त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रतिबिंबित होत होते त्याच्याशी या वस्तुस्थितीचा निकट संबंध आहे. कोस्सलर यांच्या कादंबऱ्यातून जे वातावरण चित्रित होत होते त्याच्याशी इंग्रज लेखकांचा आणि वाचकांचा दुरूनही संबंध नसल्याने ते वातावरण, ते प्रसंग त्यांच्या मनाला भिडत नव्हते. परिणामी फक्त बौद्धिक आकलनपाशीच इंग्रज वाचक थांबत होता. एका शब्दात सांगायचे तर असे म्हणता येईल की कोस्सलर आणि इंग्रज दोघे भिन्न विश्वांमधे वावरत होते. 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीत विसाव्या शतकातील पहिल्या साधारण अर्धशतकाचा युरोपचा सामाजिक व राजकीय इतिहास प्रतिबिंबित झाला असल्याने ही कादंबरी समजून वाचण्यासाठी त्या इतिहासाची ओळख करून घ्यावी लागेल. खुद्द कोस्सलर हे स्वतःच त्या इतिहासाचे अपत्य नि साक्षीदार दोन्ही असल्याने व त्यांनी आत्मचरित्राचे बरेच खंड लिहिलेले असल्याने त्या खंडांची ओळख झाली की इतिहासाची सुद्धा ओळख होऊ शकते...... 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीत पैकी पहिल्या दोन खंडांचा वापर केला

गेला आहे. कोस्सलर यांचे व्यक्तिमत्व कसे घडले गेले याचे वर्णन याच दोन खंडांवरून पुढे दिलेले आहे. कोस्सलर कोठकोठल्या प्रसंगातून गेले नि त्यांचा स्वभाव कसा घडला हे एकदा समजले की कादंबरीची पार्श्वभूमी सुद्धा समजून येईल असा अंदाज आहे.

कोस्सलर यांचा जन्म ५ सप्टेंबर १९०५ सालचा. जन्मगाव बुडापेस्ट शहर. बुडापेस्ट तेव्हा ऑस्ट्रो-हंगेरियन राज्याचा भाग होते. ऑस्ट्रो-हंगेरियन राज्याच्या दुहेरी राजधानीपैकी एक राजधानी. कोस्सलर कुटुंब ज्यू धर्मीय. त्यांच्या वडिलांकडूनचे त्यांचे आजोबा मूळ रशियातले. रशियातून स्थलांतरित होऊन हंगेरीत स्थायिक झालेले. कोस्सलर यांची आई प्राग शहराची रहिवाशी. मातबर ज्यू कुटुंबातील मुलगी. हे सर्व सांगण्याचा हेतू हा की ज्या बौद्धिक, सामाजिक, राजकीय वातावरणामधे कोस्सलर वाढले त्या वातावरणाचा परिचय त्यावरून व्हावा. हे वातावरण शिक्षित आणि सुसंस्कृत होते. मध्य युरोपातला मध्यमवर्गीय पांढरपेशा ज्यू समाज त्या काळाच्या मानाने अनेक बाबतीत खूप पुढारलेला होता. गेल्या व चालू शतकावरचा या समाजाचा सांस्कृतिक व वैचारिक ठसा अगदी स्पष्टपणे पाहता येतो. विसाव्या शतकात ज्यांनी नाव कमावले असे अनेक संशोधक, विचारवंत, पदार्थविज्ञान शास्त्रज्ञ वगैरे ज्यू होते. फ्रॉइड, आइन्स्टीन ही त्यापैकी काही प्रसिद्ध नावे.

कोस्सलरच्या वडिलांनी शाळेत जाऊन पद्धतशीर शिक्षण घेतले नव्हते. तथापी ते निर्बुद्ध मात्र नव्हते. त्यांची बुद्धी चांगलीच तल्लख होती. खुद्द त्यांच्या मुलाइतकीच ! कोस्सलरच्या आजोबांची आर्थिक स्थिती फारशी बरी नसल्याने वयाच्या केवळ चौदाव्या वर्षी थोरल्या कोस्सलरना कामधंदा शोधण्यासाठी घराबाहेर पडावे लागले. प्रथम त्यानी हरकाम्या निरोप्याची नोकरी धरली. सकाळी सात वाजता त्याना घराच्या बाहेर पडावे लागे. पण आपण शिकले पाहिजे ही इच्छा त्याना स्वस्थ बसू देत नव्हती. म्हणून ते फ्रेंच आणि इंग्रजी या भाषांचे धडे गिरवीत. फ्रेंच, जर्मन आणि इंग्रजीचा अभ्यास करण्यासाठी जुन्या बाजारातून मिळविलेली व्याकरणाची पुस्तके ते वापरत. सातला कामावर जायचे तर अभ्यासाची पुस्तके घेऊन पहाटे चारलाच ते घराशेजारच्या बागेत हजर होत आणि चार ते सात तीन तास शब्द पाठ करीत आणि व्याकरण घोकून काढीत. सांगायची गोष्ट ही की इंग्रजी, फ्रेंच, जर्मन या तिन्ही भाषा त्याना चांगल्या प्रकारे येत असत. मात्र अवांतर वाचन करण्याची आवड त्याना नव्हती. नव्हे, वाचनाचीच आवड त्याना नव्हती असे म्हटले तर ते अधिक बरोबर ठरेल. रस घेऊन फक्त एक पुस्तक त्यानी आपल्या संपूर्ण आयुष्यात वाचले होते नि ते म्हणजे अलेक्झांडर ड्यूमा या फ्रेंच कादंबरीकाराची 'थ्री मस्केटिअर्स - तीन शिलेदार' ही रोमँटिक कादंबरी. त्या पुस्तकानंतर दुसऱ्या पुस्तकाला हयातीत पुन्हा कधी त्यानी हात लावला नाही. आर्थरची गोष्ट याच्या अगदी उलट होती असे म्हणता

येईल. वाचता येऊ लागल्यापासून तो कायम वाचत होता. विविध विषयांवरच्या पुस्तकात त्याला रस वाटे.

थोरले कोस्सलर एका कंपनीत हरकाम्या नोकर म्हणून नोकरीस लागले. तेथेच चढत चढत शेवटी ते कंपनी मॅनेजर झाले. कोस्सलर यांच्या मते त्यांचे वडील एकाच वेळी बेरकी होते आणि भोळसटही होते. अफाट योजना आखण्यात त्यांचा कोणी हात धरू शकला नसता आणि घेतलेली योजना मधेच अर्ध्यावर सोडण्यातही त्याना कोणी मागे काढू शकला नसता. एखादे काम अंगावर घेतले की चिकाटीने ते तडीस नेण्यासाठी अंगात जी चिकाटी, तडफ आणि मनाचा खंबीरपणा लागतो त्याचा त्यांच्या ठिकाणी पूर्ण अभाव होता. परिणामी धंद्यात त्यानी खूप वेळा मार खाल्ला. फार कशाला १९२२ साली तर त्याना नादारी घ्यावी लागली. त्याना इंग्रजी धर्तीच्या पोषाखाचे वेड होते. या वेडापायी एकदा त्यानी आपल्या मुलाची चांगलीच फजिती घडवून आणली. कोस्सलर कुटुंब तेव्हा बुडापेस्टमधे राहात होते नि छोटा आर्थर तेथल्याच शाळेत शिकत होता. शाळेत जाताना घालायचा पोषाख म्हणून आर्थरच्या वडिलांनी आर्थरसाठी ईटन या जगविख्यात इंग्रजी शाळेतल्या विद्यार्थ्यांच्या पोषाखासारखा पोषाख शिवून आणला. हा श्रीमंती थाटाचा पोषाख घालून आर्थरने जेव्हा का वर्गात प्रवेश केला तेव्हा वर्गातल्या पोरांनी वर्ग डोक्यावर घ्यायचे तेवढे बाकी ठेवले. धरणी दुभंगून आपणाला पोटात घेईल तर बरे असे तेव्हा छोट्या आर्थरला झाले. भपकेबाज पोषाखाची तर त्याने हायच खाल्ली. आर्थर कोस्सलर यांच्या स्वभावात पुढे जो न्यूनगंड दिसून येत असे त्याचा पाया या प्रसंगाने घातला गेला असे म्हटले तर ते चूक ठरणार नाही.

१९१५ साली आर्थर शाळेत जाऊ लागला. याच दरम्यान पहिले महायुद्ध सुरू झाले. युद्धाच्या पोटी युरोपातली अनेक व्यापारी कुटुंबे डुबली. या डुबलेल्या कुटुंबात आर्थरचे कुटुंब होते. युद्ध सुरू झाल्यापासून आर्थरचे कुटुंब स्थिर असे कधीच एका ठराविक घरात राहिले नाही. कोस्सलर कुटुंब राहाण्याची घरे सारखी बदलत असे. कोस्सलर यांच्या आईला अर्धशिशीचा त्रास होता. युद्धकाळात नोकरांची टंचाई असे. या अडचणींवर मात करण्यासाठी कोस्सलरबाईंनी कायम हॉटेलात वास्तव्य करण्याची क्लुप्ती काढली होती. दर तीन महिन्यांनी कोस्सलर कुटुंब हॉटेल बदली नि मुक्काम दुसऱ्या हॉटेलात हलवी. नव्या जागेत जायचे की आहे त्याच जागेत दिवस काढायचे याचा निर्णय बटव्यातल्या पैशावर ठरे.

कोस्सलर यांचे आर्थर हे नाव त्यांच्या आईने निवडले होते. जे जे हंगेरियन ते ते तिला नावडते असल्याने बिनहंगेरियन म्हणून या नावाची निवड तिने केली होती. हंगेरीबद्दल तिच्या मनात इतका राग होता की हंगेरी देशात पन्नासावर वर्षे वास्तव्य करून

सुद्धा तिला हंगेरियन भाषा येत नव्हती. अगदी हट्टाने तिने जर्मन भाषा कायम ठेवली होती. परिणामी खुद्द आर्थरला दोन भाषा जारी ठेवाव्या लागत. घरात जर्मन आणि घराबाहेर हंगेरियन. कोस्सलर यांची आई फक्त जर्मन भाषाच बोलू शकत असल्याने भर शहरात राहूनही एखाद्या अरण्यात पडावे तशी तिची अवस्था झाली होती. तिला मैत्रिणी अशा कुणी नव्हत्याच ! तिच्याशी बोलणाऱ्या शेजारणीसुद्धा तिला नव्हत्या. दुसऱ्या बाजूला खुद्द कोस्सलर हे सुद्धा त्यांच्या आईवडिलांचे एकमेव अपत्य असल्याने भांडण्यातंडण्यासाठी त्याना कोणी जवळचे माणूस नव्हते. त्यामुळे त्यांचाही स्वभाव एकाकी बनला. त्यांची आई तर पहिल्यापासूनच एकलकोंडी होती. समाजामधे मिसळावयास तिला कधीच आवडत नसे नि स्वतःच्या एकलकोंड्या स्वभावामुळे मुलालाही ती इतर मुलात मिसळू देत नसे. म्हणून तो सुद्धा एकलकोंडा बनला. लहानपणी शालेय वयात ज्याच्याशी बरोबरीच्या नात्याने वागता येईल, मस्ती करता येईल असा एकही मित्र त्याना नव्हता. याच्यावरून काय ते ओळखा. एक गोष्ट - आर्थरची बुद्धी अतिशय तल्लख होती. शिक्षकांना त्याच्या हुषारीचे कौतुक होते. पण ते अर्थात तेवढ्यापुरतेच. त्याच्या न्यूनगंडावर आणि बुजऱ्या स्वभावावर मात करता येण्याच्या दृष्टीने त्याचा फारसा उपयोग नव्हता.

* * *

कोस्सलर यांचा स्वभाव कसा होता नि तो तसा का झाला होता हे थोडे विस्ताराने सांगण्यासारखे आहे. कोस्सलर यांच्या जन्माच्या वेळी त्यांच्या आईचे वय पस्तीस वर्षांचे होते. लग्न झाल्यापासून तब्बल आठ वर्षे उलटल्यावर त्या जोडप्याला हे मूल झाले. जन्मतः मुलाचे वजन दहा पौंडापेक्षाही अधिक होते आणि त्यामुळे बाळंतपणात आईला खूप त्रास झाला होता. बाळंतपणात ती मरायचीच. पण आर्थरच्या सुदैवाने वाचली.

एकुलते एक तशातच मध्यम वयात झालेले मूल म्हणून कोस्सलर आईचे फार लाडके होते. पण हे प्रेम निरोगी नव्हते, तर रोगट होते. कारण ते मत्सरयुक्त नि एकांगी होते. तिला आपला मुलगा इतर मुलात मिसळलेला आवडत नसे. स्वतःपासून दूर झालेलासुद्धा आवडत नसे. भरीस कोस्सलर यांची आई भावनिक दृष्ट्या काहीशी अस्थिर होती. तिला सततची डोकेदुखी असे. या डोकेदुखीचा उल्लेख वर आलाच आहे. सततच्या डोकेदुखीमुळे तिचा स्वभाव तापट आणि चिडखोर बनला होता. ती 'मूडी' बनली होती. तिची लहर घटकेत बदलत असे. प्रेमाचे भरते आले की ती आर्थरला छातीशी घट्ट धरी. दुसऱ्या क्षणी 'मूड' बदलला की तीच आई त्याला दूर सारी. आर्थरच्या स्वभावावर आईच्या या चंचल वागण्याचा विपरीत परिणाम झाला. मानवी मनोविकारांच्या खरेपणाबद्दल तो कायमचा साशंक बनला. वडील माणसे विशेषतः स्त्रिया कोणत्या वेळी कशा वागतील हेच त्याला समजेनासे झाले नि वडील माणसांची त्याने एक विचित्र धास्ती घेतली.

थोडक्यात आर्थरचे संपूर्ण भावविश्व बिनभरवशाचे बनले. बालपणातील या दिवसांबद्दल बोलताना कोस्सलर लिहितात की, ''त्या दिवसात एकदा ऊष्ण कटिबंधातील ऊबदार प्रदेशात तर दुसऱ्या क्षणी तेथून उत्तर ध्रुवावरील बर्फासारख्या थंडगार प्रदेशात असा माझा प्रवास सुरू असे.''

आर्थरवर आर्थरच्या आईचे प्रेम होते. पण अंगाखांद्यावर मात्र तिने त्याला केव्हाही खेळविले नाही. वयाच्या तिसऱ्या वर्षापासून त्याला सांभाळण्यासाठी दाई ठेवलेली होती. दर पाचसहा महिन्यांनी दाई बदलत असे. या दाया परदेशी असत. आर्थर बारा वर्षांचा होइस्तवर कोस्सलर कुटुंबात सहा महिन्यांपेक्षा अधिक दिवस एकाही दाईने कधी काम केले नसेल. या दायांचे स्वभावही चित्रविचित्र असत. कोस्सलरला एक दाई तर अशी मिळाली की लोकांचा छळ करण्यात तिला आनंद वाटे. तिने केलेल्या छळाची आणि दिलेल्या त्रासाचीच तेवढी तिची आठवण आपल्यापाशी आहे असे कोस्सलरनी आपल्या आत्मचरित्रात नमूद केले आहे. दाई हा मुलांजवळ सतत वावरणारा प्राणी. या दायाच नित्य नव्यानव्या येत राहिल्याने ज्या आत्मविश्वासाने माणूस परक्या व्यक्तींशी जमवून घेतो तो आत्मविश्वासच आर्थर कधी शिकू शकला नाही.

कोस्सलर कुटुंबात पहिली सत्ता कोस्सलर यांच्या आईची. तिच्या खालोखाल सत्ता घरातल्या बर्था नावाच्या नोकराणीची चाले. किंबहुना आर्थरला वळण लावण्याचे काम त्याच्या आईपेक्षा या नोकराणीवरच जास्त सोपविलेले होते. या नोकराणीचे नाव बर्था. कोस्सलरची आई आणि ही बर्था नोकराणी, आर्थरचा आत्मविश्वास नष्ट करण्याचे महत्कार्य या दोघींनी मिळून तडीस नेले. कोस्सलर यांच्याच शब्दात ''मी न्यूरॉटिक बनलो त्याचे हे दुसरे कारण.'' पहिले कारण अर्थात आर्थरची आई नि तिचे अतिमत्सरी प्रेम.

कोस्सलर सांगतात की बर्थाचा चेहरा एखाद्या घोड्यासारखा लांबोडका होता. आर्थरच्या आईला इतरांवर हुकुमत गाजविण्याची नैसर्गिक आवड होती. या आवडीपोटी त्याची आई बर्थावर हुकूमत गाजवू पाही आणि हुकूमत गाजवू पाहाण्याचे तेच लोण बर्था आर्थरपर्यंत पोहोचवी. एका शब्दात आर्थरची आई बर्थाला दम देत असे. बर्था तोच राग आर्थरवर काढीत असे. जेव्हा घरात आर्थरसाठी दाई नसे तेव्हा आर्थर बर्थाच्या हुकमतीत असे. कधी आठवडेच्या आठवडे नि महिनोनमहिने दाई मिळत नसे. अशावेळी आर्थरवर बर्थाची पूर्ण हुकूमत असे. कारण या ना त्या कारणाने त्याची आई सतत अंथरुणाला खिळलेली असे. नि म्हणून तिला मुलाकडे लक्ष देता येत नसे. शिवाय मुले वाढविण्याची तिला मोठी हौस होती अशातलाही प्रकार नव्हता. नोकरमाणसे सारखी बदलली जात. घरात फक्त बर्था हीच एकमेव कायम नोकर. त्यामुळे कोस्सलर कुटुंबात तिला वाजवीपेक्षा जास्त भाव आला होता. आर्थरला वळण लावण्याचे काम खुद्द त्याच्या आईनेच तिच्यावर

सोपविलेले असल्याने तर तिला आणखीच जोर आला होता. हे काम ती तिच्या मर्जीप्रमाणे करीत असे. "गुन्हेगारावर ज्या अर्थी गुन्ह्याचा आरोप आहे त्या अर्थी त्याने गुन्हा केलाच असला पाहिजे न पेक्षा त्याने आपले निर्दोषत्व सिद्ध करावे. ते करता येत नाही म्हणजे तो गुन्हेगार आहेच" हे तिचे लहान मुलाना वळण लावताना वापरायचे मार्गदर्शक तत्त्व होते आणि याच तत्त्वाला अनुसरून ती आर्थरला वळण लावीत असे. म्हणजे अर्थात शिक्षा करीत असे. शिक्षेचे प्रकार दोन असत. एक प्रत्यक्ष शारीरिक दंडाची शिक्षा नि दुसरी सार्वजनिक अपमानाची. सर्वांसमोर हिणवण्याची. यातील दुसऱ्या प्रकारच्या शिक्षेची आर्थरने जाम धास्ती घेतली होती. ही धास्ती त्याला जवळ जवळ आयुष्यभर पुरली. इतर लोकांसमोर लज्जेने मान खाली घालावी लागणार या एका विचाराने कोस्सलर आयुष्यभर पछाडलेले होते. शिक्षेच्या या दोन प्रकारांनी त्यांची संपूर्ण मनोरचनाच बिघडवून टाकली. इतकी की पुढील वयात सुद्धा आपण अपराधी आहोत, आपल्या हातून काहीतरी वाईट घडले आहे अशा प्रकारच्या विचारानी त्यांचे मन ग्रस्त असे. किंबहुना हातून काहीही वाईट घडले नसताना, 'हो, तू हे केलेस नि ते वाईट आहे' असा साधा आरोप जरी त्यांच्यावर कोणी केला तरी ते लगेच भयग्रस्त होत. त्याना तो आरोप खरा वाटू लागे. बालपणी त्याना जी वागणूक दिली गेली होती त्याचे हे सर्व परिणाम होते.

बर्थाने दिलेल्या शिक्षेच्या विरोधात आर्थरच्या आईने त्याची बाजू घेतली आहे असे सहसा कधीच घडत नसे. उलट त्याच्या आईची सहानुभूती नेहमी बर्थाच्या बाजूला असे. मुलांना वळण लावायचे तर त्यासाठी शिक्षा आवश्यक आहे. शिक्षा नाही तर शिस्त नाही अशीच तिचीही विचारसरणी होती. या शिक्षा प्रकरणाबद्दल कोस्सलर लिहितात की, "साधारणपणे कायद्यात ज्यांना बंदी नाही त्या गोष्टी केल्या तर तो गुन्हा मानला जात नाही. परंतु आमच्या घरचा कायदा अगदी वेगळा होता. आमच्याकडे आगावू परवानगी न घेता केलेली प्रत्येक कृती गुन्ह्यात धरली जात असे."

घरात दंगा, गडबड करणे, उलटून बोलणे, बर्थाला राग येण्यासारखे कृत्य करणे, अनोळखी व्यक्तींशी स्वतः पुढाकार घेऊन संभाषण सुरू करणे, कोणापाशी काही मागायचे झाल्यास 'कृपा करून ते द्या' वा कोणी आपल्या उपयोगी पडल्यास 'मी फार आभारी आहे' अशासारख्या सुसंस्कृततादर्शक शब्दप्रयोगांचा वापर न करणे, जेवणाच्या वेळी एखादा पदार्थ दुसरून हवा असल्यास वाढप्याकडे न मागता स्वतःच्या हाताने वाढून घेणे ही सर्व कृत्ये तिच्या लेखी भयंकर गुन्ह्यात जमा होती. हे अर्थात सर्वच्या सर्व सार्वजनिक गुन्हे होते. याच्या व्यतिरिक्त फक्त बर्थाबाईनाच माहीत असणारे काही खाजगी व छुपे गुन्हेसुद्धा असत. ते कोणते हे बर्थाबाईंनी शिक्षा दिल्यावरच फक्त आर्थरला कळून येत.

आर्थरला शारीरिक दंड क्वचितच दिला जाई. मुख्य दंड त्याला सार्वजनिक

अपमानाच्या स्वरूपाचाच भोगावा लागे आणि हा दंड घरातल्यांनीच त्याच्यावर बहिष्कार घालण्याचा असे. हे त्याला खूपच अपमानास्पद वाटे. घरात त्याच्याशी दोन दोन दिवस अबोला धरला जाई आणि मग केलेल्या वा न केलेल्या गुन्ह्याचा कबुलीजबाब दिल्यानंतर कोठे हा बहिष्कार मागे घेतला जाई. मात्र ह्या प्रसंगी "आपण पुन्हा असे करणार नाही, एकदा घडले ते घडले, त्याची माफी द्या" हे त्याला सर्वांसमोर मोठ्याने बोलून दाखवावे लागे.

कोस्सलर यांच्या आठवणीत फक्त एकच प्रसंग असा आहे की, जेव्हा बर्थाच्या विरोधात त्यांच्या आईने त्यांची बाजू घेतली होती. तो प्रसंग असा - कोस्सलर यांच्या घरात एक चिनी मातीची बाहुली होती. या बाहुलीसाठी ठरलेला कोनाडा होता. एकदा बाहुली नेहमीच्या जाग्यावरून बाजूला सरकली होती नि बर्था त्यासाठी आर्थरला दम देत होती. नेमक्या त्याच वेळी कोस्सलरच्या आईने त्या खोलीत पाऊल टाकले होते. खोलीत शिरता शिरता तिच्या कानावर बर्थाचे रागीट शब्द पडले तेव्हा ती बर्थाला म्हणाली की, "हे बघ, बाहुली आर्थरने सरकवलेली नाही. ती मी स्वतःच सरकवली आहे." अशाप्रकारे अगदी अनपेक्षित प्रकारे भावी शिक्षेतून आर्थरची सुटका झाली होती. आईने आज बर्थाविरूद्ध आपली बाजू घेतली नि होऊ घातलेल्या शिक्षेतून सोडविले याचा इतका विलक्षण आनंद छोट्या आर्थरला त्या प्रसंगी झाला की, त्या घटनेला तीस वर्षे उलटून गेली होती तरी काल घडल्यासारखी ती घटना प्रौढ कोस्सलरना आठवत होती. तो प्रसंग आठवून कोस्सलर लिहितात की, "बर्थाच्या विरोधात माझ्या आईने माझी बाजू घेतल्याचा माझ्या आयुष्यातला हा एकमेव प्रसंग. त्या प्रसंगी मला इतका आनंद झाला नि आईबद्दल इतकी कृतज्ञता वाटली की ती शब्दात सांगताच येणार नाही. माझ्या पुढील आयुष्यामधे एखादा ड्रील सार्जंट वा एखादा तुरुंगाचा पहारेकरी माझ्याशी जेव्हा चांगला वागे तेव्हा हटकून मला हा जुना प्रसंग आठवे ....... या प्रसंगी मला मिळालेल्या अनपेक्षित माफीचा मला इतका प्रचंड आनंद व्हावा याचा अर्थ मी अपराधी आहे ही भावना माझ्या मनात अगदी बालपणापासून खोलवर रुजून बसलेली होती असा करावा लागतो."

ही झाली कोस्सलर यांच्या आईने त्याना दिलेल्या वागणुकीची कथा. पण कोस्सलर यांचे वडील त्यांच्याशी कसे वागले होते ? कारण आईप्रमाणेच वडिलांच्या वागण्याचाही परिणाम मुलांच्या मनावर होत असतो. कोस्सलर लिहितात की, "या कौटुंबिक चित्रामध्ये माझ्या वडिलांना फारसे स्थान नव्हते. त्या काळात व्यवसायासंबंधीच्या मोठमोठ्या योजना आखण्यात ते दंग असत. शिवाय शिक्षण या विषयात आपणास काही कळत नाही अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे माझ्या शिक्षणाच्या बाबतीत ते कधी एकही शब्द उच्चारत नसत..... मुलावर त्यांचे प्रेम होते. पण ते दुरून" बापलेक एकमेकांचा मान राखीत, पण अंतर ठेवून. बापलेकात खऱ्या अर्थाने कधी संवादच घडून आला नाही.



अनुक्रमणिका

ना भांडण झाले ना खूप जवळकीने ते एकत्र आले. परस्परांबद्दल त्याना आदर होता नि ते परस्परांस मानाने वागवीत एवढेच त्यांच्या संबंधाबद्दल म्हणता येईल.

गिल्ट, फियर, लोन्लीनेस - अपराधगंड, धास्तीग्रस्तता आणि एकाकीपणा हे कोस्सलर यांच्या बालपणातली तीन परवलीचे शब्द. यात पहिला क्रमांक धास्तीग्रस्ततेचा होता. साध्या सुध्या कारणाने छोट्या आर्थरचे मन भयग्रस्त बनत असे. ज्या प्रसंगांनी त्यांच्या मनाला भीती घातली त्याची एक यादीच कोस्सलर यानी दिली आहे. त्यातील हे काही प्रसंग. कोस्सलर तेव्हा पाच एक वर्षाचे होते. छानदार पोषाख करून वडिलांबरोबर ते कोठेतरी बाहेर निघाले होते. बरोबर आईसुद्धा होती. वडील म्हणाले होते की, 'तुला आइस्क्रीम आवडते तेव्हा आपण आइस्क्रीम घेऊ.' मंडळी घोड्याच्या बगीतून निघाली. एका बाजूला आई, दुसऱ्या बाजूला वडील, मध्ये छोटा आर्थर. आईवडील दोघांनी आर्थरचे हात पकडून ठेवलेले. बगी डॉ. नौबोअरच्या दवाखान्यापाशी आली नि थांबली. वडिलांनी आर्थरला दवाखान्यात नेले. पुढे कोस्सलर लिहितात की, "मागेसुद्धा एकदा मी याच डॉक्टरांकडे तपासण्यासाठी आलो होतो. त्याही खेपेस डॉक्टर आणि माझे वडील एका कोपऱ्यात जाऊन हळूहळू काहीतरी कुजबुजत होते. मला वाटते ते माझ्याच बद्दल बोलत होते. तेव्हासुद्धा मी खूप घाबरलो होतो नि मला काहीतरी शंका आली होती. त्यामुळे आज दवाखान्यात येऊन पोहोचताच भीतीने माझी अगदी गाळण उडाली. दवाखान्यात पाऊल टाकताच डॉक्टरांनी मला त्यांच्या तपासण्याच्या खोलीत नेले. दाताच्या डॉक्टरकडे असतात तसल्या एका खुर्चीवर मला बसविण्यात आले. दरम्यान डॉक्टरांचा मदतनीस आला. त्याने माझे हात आणि पाय दोन्ही खुर्चीला बांधून टाकले. मी इतका घाबरलो की मला वाटले मी आता बेशुद्ध पडणार. मान तिरकी करून मी आईवडिलाना शोधण्याचा प्रयत्न केला, तर त्यांचेही चेहरे मला भयग्रस्त दिसले. ते पाहून तर माझा सगळा धीरच सुटला. तेवढ्यात डॉक्टरांनी माझ्या आईबाबांना खोलीच्या बाहेर ढकलले. मग डॉक्टरांचा मदतनीस पुढे सरसावला. त्याने माझ्या हनुवटीखाली तस्त धरले. डॉक्टरांनी माझा जबडा उचकटला नि कसले तरी हत्यार माझ्या घशात खुपसले. माझ्या तोंडात रक्त जमा झाले होते. मी ते तस्तात थुंकून टाकले .... माझ्या टॉन्सिल्स काढून टाकण्यात आल्या होत्या. ते १९१० साल होते. त्या दिवसात रुग्णांना भूल न देताच त्यांच्यावर शस्त्रक्रिया करण्यात येत असत. अशा प्रसंगी इतर मुले कशी वागतात ते मला माहीत नाही. पण मी मरणाचा घाबरून गेलो होतो एवढे मात्र खरे. या प्रसंगाचा मी कायमचा धसका घेतला. बहुधा असे असावे की कसल्या ना कसल्या कारणाने मी आधीपासूनच भ्यालेलो असेन. कारण त्या प्रसंगाचा जबरदस्त ठसा माझ्या मनावर उमटला होता. इतका की मनुष्यजातीचीच मी कायम भीती घेतली होती. जर मी आधीपासून भ्यालेलो नसतो तर त्या प्रसंगाचा इतका भयंकर परिणाम माझ्या मनावर झाला नसता असे मला वाटते."

"त्याच क्षणी मला असे वाटले की या संपूर्ण विश्वामध्ये आपले स्वतःचे म्हणावे असे आपणाला कोणीही नाही. या जगात आपण सर्वस्वी एकटे आहोत. एकटेपणाचा तो क्षण त्यानंतर माझ्या स्मृतीतून कधीही पुसला गेला नाही. एका दुष्ट आणि आसुरी शक्तीच्या तडाख्यात मला सोडून माझे आईबाबा एकटेच निघून गेले होते नि मी सर्वस्वी निराधार आणि एकाकी बनलो होतो. अकस्मात पाय घसरावा नि उघड्या गटाराच्या तोंडातून आपण थेट पाताळ लोकात जाऊन पडावे तसे मला त्या क्षणी वाटले. जणू दुसरे पाताळ असे हे विश्व मी त्यानंतर केव्हाही विसरलो नाही. कसलीही आगावू सूचना न देता मनुष्याला जेथे एका झटक्यात ढकलून दिले जाऊ शकते असा हा पाताळलोक तेव्हा मी प्रथमच अनुभवित होतो. माझे संपूर्ण अनुभवविश्व तेव्हापासून बेभरवशाचे आणि दुटप्पी बनले. एकाच वेळी तेथे दोन विरूद्ध गोष्टी घडू शकल्या होत्या.'

हिंसाचार, दहशतवाद, माणसाने माणसाचा केलेला अनन्वित छळ या गोष्टी कोस्सलर यांच्या लिखाणात परत परत येतात त्याचे कारण हे असावे. डॉक्टर नौबोअरकडे अगदी नेणत्या वयात त्याना जो भयानक अनुभव आला त्याचा ठसा त्यांच्या मनावरून कधीच पुसला गेला नाही. कोस्सलर स्वतःच लिहितात, "आमच्या युगातील सगळ्या घृणास्पद गोष्टींची दखल घेण्याचे काम अंगावर घ्यावे तसा मी वागतो याचे मूळ डॉ. नौबोअर यांच्याकडे मला आलेला तो महाभयंकर अनुभव असावा असा माझा अंदाज आहे."

कोस्सलर यांच्या मनावर आघात करणारा आणखी सुद्धा एक प्रसंग देण्यासारखा आहे. हा प्रसंग सुद्धा त्यांच्या बालपणातल्या आजाराशी संबंधित आहे. या खेपेचा आजार अपेंडिक्सचा होता. आर्थर पोटदुखीने बेजार झाला होता. म्हणून डॉ. झीलगी यांना घरी बोलावण्यात आले होते. आर्थरला डॉक्टर तपासतात नि बाहेर पडता पडता म्हणतात की आता तुझे पोट कापावे लागणार. डॉक्टरांचे फक्त तेवढेच उद्‍गार आर्थर डोक्यात ठेवतो. डॉक्टरांच्या थट्टेतल्या उद्‍गारांची त्याने एवढी दहशत घेतली की वडील रोज सकाळी घोड्याच्या बगीतून नेहमीसारखे त्याला फिरावयास नेत तेव्हा आपण बंद खिडक्यांच्या गाडीतूनच जाऊ असा हट्ट तो धरू लागला. खिडक्या बंद असल्या की डॉक्टर आपणाला पाहू शकणार नाहीत आणि डॉक्टरांनी आपणास पाहिले नाही की आपले पोट सुद्धा कापले जाणार नाही, अशी आशा त्याला वाटत असे. संपूर्ण दिवसाचे त्याने दोन भाग केले होते. सकाळ ते दुपार आणि दुपार ते रात्र. पैकी सकाळ ते दुपार हा काळ धोक्याचा. कारण त्या वेळात डॉक्टरांचा दवाखाना उघडा असे. दुपार ते रात्र हा काळ बिनधोक्याचा. कारण तेव्हा डॉक्टरांचा दवाखाना बंद असे. आर्थरची भीती शेवटी इतक्या पराकोटीला पोहोचली की न्हाव्याच्या दुकानात केस कापायला जायचे तरी भीतीने त्याचा

जीव घाबराघुबरा होऊ लागला. न्हाव्याचा वस्तरा त्याला डॉक्टरांच्या हत्यारांची आठवण करून देत असे.

आईवडील दोघांपैकी कुणापाशी तरी आपली भीती बोलून दाखवावी असे मात्र त्याला कधीच वाटले नाही ही गोष्ट सुद्धा विचार करण्यासारखी आहे. पूर्वी एकदा अशाच एका प्रसंगी त्याच्या आईवडिलांनी फसवून त्याला डॉक्टरांकडे नेले होते नि मग डॉक्टरांच्या हातात एकट्याला सोडून ते स्वतः निघून गेले होते, ही आठवण विसरावयास त्याचे मन तयारच नव्हते. आईवडिलांशिवाय जीवाभावाचे मित्र म्हणा, नात्याचे म्हणा, असेही कोणी त्याला नसल्याने मन मोकळे करून आपल्या भीतीबाबत कुणाशी बोलावे असेही त्याच्या बाबतीत घडले नाही. सगळी भीती त्याला आत दाबून ठेवावी लागली. परिणामी डॉक्टरी व्यावसायिकांबद्दल त्याच्या मनात कायम भीती राहिली. एक प्रकारे हा स्थिरभ्रम विकृतीचाच प्रकार त्याच्या बाबतीत तयार झाला. (पॅरानोयिया - खोट्या भीतीने पछाडले जाणे) या खोट्या भीतीचा फार विपरीत परिणाम आर्थरच्या प्रौढ व्यक्तित्वावर घडून आला. आर्थर कालांतराने जेव्हा शाळेत जाऊ लागला तेव्हा कोठे ही त्याची अनावश्यक व अकारण भीती काही प्रमाणात कमी झाली.

अर्थात छोटा आर्थर ज्या प्रसंगाला घाबरत होता तो शस्त्रक्रियेचा प्रसंग पुढे लवकरच त्याच्यावर ओढवला ही गोष्ट खरीच. आर्थरचे अपेंडिक्स पिकले नि त्याच्यावर तातडीची शस्त्रक्रिया करावी लागली. आर्थरच्या आई-वडिलांनी त्याला ॲम्ब्युलन्समधे घातले नि ते हॉस्पिटलकडे निघाले. ते हिवाळ्याचे दिवस होते. ॲम्ब्युलन्समधून हॉस्पिटलकडे जात असताना आर्थरला असा एक विलक्षण अनुभव आला की त्याचाही दाट परिणाम त्याच्या व्यक्तित्वावर झाल्याचे दिसून येते. या आठवणीबद्दल बोलताना कोस्लर लिहितात की, "हिवाळ्याच्या दिवसातली ती एक स्वच्छ आणि प्रसन्न सकाळ होती. व्हिएन्ना शहरातला राजप्रासाद आम्ही पार केला. सोनेरी उन्हात शुभ्रधवल बर्फकणांचे छोटे छोटे पुंजके आकाशातून सावकाश खाली उतरत होते. ॲम्ब्युलन्सची खिडकी माझ्या उशागत होती. नि बाहेर वाऱ्याशी पांढऱ्याशुभ्र स्फटिकांचा हा सुंदर नाच चालू होता. नाच पाहाता पाहाता अकस्मात माझे भान नष्ट झाले. माझ्या संपूर्ण वृत्ती उचंबळून आल्या. सौंदर्य, सौंदर्य म्हणजे नेमके काय ते मला त्या क्षणी कळले. सागराच्या पाण्यात मिठाचा खडा विरघळून जावा तसा मी त्या अनुभवात विरघळून गेलो. माझ्या मनातील मी-तू ही भावना विरून गेली. त्या क्षणी मी जणू वेगळा उरलोच नाही. मी नि भोवतालची संपूर्ण सृष्टी आम्ही एकरूप झाला होतो. मी त्या सृष्टीत विलीन झालो होतो. ॲम्ब्युलन्समधून हॉस्पिटलकडे निघालो असताना सुरवातीला रस्त्यावरून हसत खिदळत चालणाऱ्या लोकांकडे पाहून स्वतःच्या नशिबाबद्दल मला वाईट वाटले होते. परंतु आता



अनुक्रमणिका

ते सर्व मी विसरून गेलो होतो. स्वतःबरोबरचे माझे भांडण संपले होते नि माझे मन अगदी शांत बनले होते.''

आर्थरवरची अपेंडिक्सची शस्त्रक्रिया पाठोपाठ दोनदा करावी लागली. परंतु आता आर्थर खूपच सावरला होता. त्याची भीती कमी झाली होती. म्हणून तो ठरवतो की, आता काही झाले तरी घाबरायचे नाही. जे होईल ते मुकाट्याने सहन करायचे. अकस्मात त्याला पूर्वी केव्हातरी वाचनात आलेली जगप्रसिद्ध थापाड्या मुंछासेनची कथा आठवली. हा मुंछासेन बॅरन असतो. तर एकदा हा बॅरन मूंछासेन दलदलीच्या प्रदेशातून प्रवास करीत होता, नि प्रवास करता करता दलदलीत कोसळला होता. बघता बघता बॅरन चिखलात खाली खाली जाऊ लागला नि चिखल त्याच्या हनुवटीपर्यंत पोहोचला. आता मात्र बॅरन ठरवतो की काहीतरी युक्ती करून चिखलाबाहेर पडले पाहिजे. नाहीतर आपली गच्छन्ती आहे. पण युक्ती काय करणार ? तेव्हा बॅरनला सुचते की आपण आपल्या डोक्यावरचे केस पकडावे नि स्वतःला चिखलातून खेचून बाहेर काढावे. बॅरन मग स्वतःच स्वतःचे केस पकडतो नि खेचून स्वतःला चिखलाबाहेर काढतो. ही कथा आठवून आर्थर ठरवतो की आपणसुद्धा बॅरन मुंछासेनचीच क्लुप्ती वापरायची. आपण स्वतःचे केस पकडायचे नि या भीतीच्या बाहेर यायचे. या क्लुप्तीचा पहिला भाग म्हणून तो आईला सांगतो की, ''डॉक्टर जेव्हा त्याला भूल देण्यासाठी येतील तेव्हा भूल देण्याचा मास्क तो स्वतःच्या हाताने स्वतःच्या तोंडावर ठेवणार आहे.'' डॉक्टरांना त्याची आई तसं सांगते. डॉक्टरही कबूल होतात नि ती शस्त्रक्रिया यशस्वी पार पडते. भूल देण्याचा मास्क स्वतःच्या हाताने जेव्हा त्याने स्वतःच्या चेहऱ्यावर चढवला तेव्हा त्याला असे वाटले की, आपल्या आयुष्याची सूत्रे आपल्या हाती आपण घेत आहोत. कोस्सलर यांच्या आयुष्यातला हा एक महत्त्वाचा क्षण म्हणता येईल. कारण अनेक वर्षे मानसिक आजाराने-भीतीने त्यांना छळले होते, त्या आजारावर त्यानी तेथे विजय मिळविला होता. त्यांच्या भावी आयुष्याच्या दृष्टीने हा एक महान परिवर्तनाचाच क्षण होता. आपण स्वतःवर अवलंबून राहू शकतो हा आत्मविश्वास या क्षणाने त्याना मिळवून दिला.

त्यांच्यावर ही जी शस्त्रक्रिया केली गेली होती त्याची हकिकत सांगून कोस्सलर पुढे म्हणतात की, ''मानसिक आजाराशी तडजोड केली असता त्या मानसिक आजारातून बाहेर पडता येते ही कल्पना अनेकांना आत्मविसंगतपूर्ण आणि अशक्यप्राय वाटण्याची शक्यता आहे. परंतु या कल्पनेत आत्मविसंगत आणि अशक्य असे काहीही नाही. प्रयत्न केल्यास कोणीही हे साध्य करू शकेल. मात्र त्यासाठी स्वतःशी प्रामाणिक असावयास हवे. आपण मनाने आजारी आहोत ही गोष्ट प्रांजलपणे मान्य केली की त्या आजाराबरोबरचा निदान निम्मा अनावश्यक झगडा तरी संपुष्टात येऊ शकतो. माझी अगदी खात्री आहे



अनुक्रमणिका

की स्वतःची शेंडी पकडून कोणीही मनुष्य स्वतःला कसल्याही चिखलाच्या बाहेर खेचून काढू शकेल.''

बालपणात कोस्सलर यांना असे अनेक मानसिक धक्के बसले नि प्रत्येक धक्क्याबरोबर ते काही ना काही नवं शिकले. असा शेवटचा मानसिक धक्का आर्थर तेरा वर्षांचा असताना त्याला बसला. बालपणापासून कोस्सलरना शास्त्रीय विषयांचे वेड होते. तेरा वर्षांचे असताना ज्यूल व्हेर्न या फ्रेंच लेखकाची 'चंद्रावर स्वारी' ही विज्ञानकथा ते वाचत होते. कथा वाचत असताना अकस्मात आर्थरला पूर्वी कधी तरी घडून गेलेला एक प्रसंग आठवला. हा प्रसंग तो पूर्णपणे विसरून गेला होता. परंतु आता जणू काही कालच घडला आहे अशाप्रकारे तो प्रसंग त्याला आठवला नि तो प्रसंग आठवून त्याच्या मनावरचे कसले तरी दडपण एकाएकी कमी झाले. प्रसंग असा होता, छोट्या आर्थरने काहीतरी खोडी केली होती नि शिक्षेदाखल आईने त्याला न्हाणीघरात कोंडून ठेवले होते. न्हाणीघराची खोली अगदी काळोखी होती नि आर्थर भीतीने गर्भगळीत झाला होता. ही आठवण सांगताना कोस्सलर म्हणतात की, '' त्या क्षणी मला असे वाटले की या संकटातून आपण कधीही बाहेर पडू शकणार नाही. ना आपणास सूर्याचे पुन्हा दर्शन होणार ना आईचा चेहरा परत दिसणार. आपण येथेच मरणार.''

पुढे काय घडले ते त्याना अजिबात आठवत नाही. जणू स्मरणशक्तीचा तेवढा भाग कुणीतरी पुसून टाकला होता. त्यानंतरचे त्याना आठवते ते, ''माझे डोके वॉशबेसिनवर जोरात आदळून त्याचा खूप मोठा आवाज झाला होता. एकाएकी न्हाणीघराचा दरवाजा सताड उघडला गेला नि सर्वत्र पांढराशुभ्र उजेड पसरला. आईच्या मिठीत शिरून मी हुंदक्यांवर हुंदके देऊ लागलो. एकीकडे मला माझ्या आईबद्दल प्रेमाचे उमाळे येत होते तर दुसरीकडे त्याचवेळी मला स्वतःची कीवही येत होती आणि एका फार मोठ्या संकटातून सहीसलामत बाहेर पडलो म्हणून त्याचवेळी प्रचंड आनंदसुद्धा होत होता.'' ही जुनी आठवण जणू कालच तो प्रसंग घडावा अशाप्रकारे मला आठवली आणि काळोख्या जागांबद्दलचे माझे भय अकस्मात नष्ट झाले. हा प्रसंग घडून येईस्तवर मृत्यूबद्दल मला प्रचंड भीती वाटत असे. हा प्रसंग घडला नि मृत्यूबद्दलचे माझे भय बऱ्याच प्रमाणात कमी झाले. मात्र मृत्यूबद्दलचे माझे सर्वसाधारण भय कमी झाले असले तरी स्वतःच्या मरणाबद्दलची माझी भीती पूर्वीसारखीच कायम होती.''

याच काळात दुसऱ्या सुद्धा इतर अनेक घटना घडल्या की ज्यांचा परिणाम कोस्सलर यांच्या मनावर झाला होता. अशी एक घटना म्हणजे त्या दिवसात कोस्सलर कुटुंब ज्या हॉटेलात राहात होते त्या हॉटेलच्या इमारतीस आग लागून त्या आगीत हॉटेलच्या दोन तीन खोल्या जळून जाणे. दुसरी घटना त्यांच्या आईवडिलांमधे वितुष्ट आले ती. हे

वितुष्ट होता होता इतक्या विकोपास पोहोचले की, प्रत्येक दिवशी त्या नवराबायकोत भांडणे होऊ लागली नि कोस्सलर यांना त्या भांडणाचा सक्तीचा साक्षीदार बनावे लागले. आईवडिलांमधल्या या भांडणांचाही त्यांच्या मनावर विपरीत परिणाम झाला असे ते सांगतात. मात्र ही भांडणे कोणत्या कारणावरून होत होती नि नवराबायकोत वितुष्ट कोठल्या विषयावरून आले होते याचा काहीही खुलासा त्यांनी केलेला नाही. फक्त एवढेच सूचक शब्दात ते बोलून दाखवितात की निष्ठा दुभंगल्या की माणसांच्या आयुष्याची कशी परवड होते याचे आपण तेव्हा खूप जवळून दर्शन घेतले.

एव्हाना एकोणिसशे चौदा-पंधरा साल उजाडले. पहिले महायुद्ध अगदी जोरात होते. या युद्धाचा कोस्सलर कुटुंबाला फार मोठा आर्थिक फटका बसला. कोस्सलरच्या वडिलांनी व्यापारात प्रमाणाबाहेर मार खाल्ला. त्यामुळे बुडापेस्ट सोडून त्याना व्हिएन्ना शहराचा आश्रय घ्यावा लागला नि कायम घराऐवजी हॉटेल किंवा खानावळीतून मुक्काम करीत रहावे लागले. हॉटेलात मुक्काम करून असताना त्या हॉटेलला कशी आग लागली त्याचा उल्लेख वर आलाच आहे.

अगदी लहानपणापासूनच आर्थर कोस्सलर हे अपराधगंड आणि भयग्रस्तता या दोन मानसिक व्याधींनी कसे पछाडले होते याचं वर्णन वर येऊन गेलेच आहे. या दोन मानसिक व्याधींप्रमाणेच एकटेपणाच्या दुःखानेही त्यांचे बालपण भरून गेले होते. शाळेत जावयास सुरूवात करीपर्यंत त्याना बरोबरचा असा एकही सवंगडी नव्हता. हे एकटेपण त्याना त्यांच्या आयुष्यभर पुरले. अधून मधून त्यांचे आईवडील त्यांना आपल्या मित्रमंडळींच्या घरी स्वतःबरोबर घेऊन जात; तेथे त्या घरात जर लहान मुले असली तर त्यांच्याशी त्यांची गाठ पडे. तेवढाच त्यांचा त्यांच्या समवयस्क वयाच्या मुलांबरोबरचा संबंध. हे समाधान एकदोन तासात संपणार याच्याच विचाराने तेव्हा ते घायाळ असत. म्हणजे शेवटी सवंगड्यांच्या संगतीचे सुख नाही ते नाहीच. कोणी त्याना नाटकाला वा सर्कसला बरोबर नेले तर दर तासाला आता एक तृतियांश गंमत संपली, आता दोन तृतियांश गंमत संपली याच विचारात नि दुःखात ते गुंग असत आणि स्वतःचीच कीव करीत राहात. पुढे पुढे जसजसे त्यांचे वय वाढत गेले तसतसे सुख सुख म्हणतात ते इतके तकलादू व फसवे असतानासुद्धा माणसे त्याच्यापाठी लागतात हा विचार मनात येऊन त्याना स्वतःबरोबर इतरांचीही कीव वाटू लागली.

बालपणी कोस्सलर याना एकटेपणा पछाडून होता. परंतु बालपणातल्या भ्रामक भीतीवर ज्या प्रमाणे बॅरन मुंछासेनची युक्ती वापरून त्यानी मात केली तशाच प्रकारे या एकटेपणाच्या व्यथेवरही त्यानी पुढे मात केली. जेव्हा प्रथम हे घडले तेव्हा कोस्सलर यांचे वय साधारण तेरा एक वर्षाचे होते नि कोस्सलर तेव्हा त्यांच्या मावशीच्या घरी राहात



अनुक्रमणिका

होते. त्या विशिष्ट दिवशी घरातली सगळी वडीलधारी मंडळी सिनेमा पाहाण्यासाठी बाहेर गेली होती. घरातले नोकरचाकर सुद्धा कामानिमित्त बाहेर गेले होते. घरात एकटे कोस्सलर काय ते उरले होते. मावशीचे घर एवढे अवाढव्य होते की घरातली सगळी माणसे बाहेर गेल्यानंतर ते रिकामे घर त्याना जणू खावयास उठले. एरवी त्यांच्यापाशी गोष्टीच्या पुस्तकांचा खजिना असे. परंतु मावशीच्या घरी येताना यापैकी एकही पुस्तक त्यानी बरोबर आणले नव्हते. त्यामुळे एकटेपणावर त्याना काहीच उपाय करता येईना. आपणाला एकटे सोडून सर्वजण बाहेर गेले याचा शेवटी त्याना इतका संताप आला की मावशीला त्रास देण्याच्या इच्छेने ते बुटासकट मावशीच्या गादीवर नाचू लागले. गादीवर नाचून कंटाळा आला तेव्हा मानेखाली हाताची घडी करून ते वर आढ्याकडे पाहात निव्वळ पडून राहिले नि त्या क्षणी ती विशिष्ट जादू घडली. त्याना एकाएकी त्या एकटेपणातच अपूर्व सुख वाटू लागले. एकटेपणातल्या सुखाचा हा जणू नवा शोधच त्या क्षणी त्यांच्या मनाला लागला. कितीतरी नव्या नव्या कल्पना स्वतःच्या मनाशी ते रंगवू शकत होते नि कल्पना रंगविता रंगविता स्वतःच स्वतःची करमणूक करून घेऊ शकत होते ही अफलातून गोष्ट त्या दिवशी प्रथमच त्यांच्या ध्यानात आली होती.

पुढे तुरुंगाच्या कोठडीत एकांत कैदेची शिक्षा भोगताना हा प्रसंग त्याना तीव्रतेने आठवला होता. जवळ जवळ वीस वर्षानंतर. कैदेत वाचण्यासाठी Maestre (माएस्ट्र) या लेखकाचे Journey Around My Chamber हे पुस्तक दिले गेले होते नि कोस्सलर यांच्या नजरेस त्यातील पुढील परिच्छेद पडला. ''रस्त्यातून मोकळेपणी फिरण्याची त्यानी मला बंदी केली आहे. मला त्यानी कोंडून ठेवले आहे. परंतु एक गोष्ट ते विसरले आहेत. हे संपूर्ण विश्व माझ्या दिमतीला आहे. या विश्वातील अनंत अवकाश आणि अनंत काळ दोन्ही माझ्या सेवेसाठी हजर आहेत ही गोष्ट त्यांच्या ध्यानात आलेली नाही.''

अशा प्रकारे एकाकीपणासुद्धा ते आपल्या जीवनातून मागे ढकलू शकले. एकटेपणाच्या व्याधीतून कोस्सलर यांची झालेली सुटका सुद्धा मुंछासेनी सुटकेतच मोडली असती. अपराधगंड आणि धास्तीग्रस्ततेप्रमाणेच एकटेपणाची भावनासुद्धा त्यानी स्वतः प्रयत्न करून पाठीमागे ढकलली होती. मात्र एक गोष्ट खरी की या आपत्तींचा ते कधीही पूर्ण पराभव करू शकले नाहीत. तथापी त्या आपत्तींच्या संगतीत राहून सुद्धा स्वतःचा बचाव कसा करावा हे कसब ते आता शिकले होते. हे कसब म्हणजे तडजोड असे कोणी म्हणतील. परंतु ते चूक ठरेल. कारण मानसिक व्याधींच्या स्वरूपातील आपत्तींमधून त्यांच्याबरोबर केवळ तडजोड केल्याने सुटका होत नाही. अशी तडजोडच तेथे शक्य नसते. कोस्सलर यांनी या बाबतीत जे काही साध्य केले होते त्याला दोन तुल्यबळ शत्रूंमध्ये त्यानी एक तरल तोल साधला होता व तसे करून शत्रूंना आपल्यापासून दूर ठेवण्यात यश



अनुक्रमणिका

मिळविले होते असेही म्हणता येईल. याचा त्यांच्या आयुष्यावर एक परिणाम असा झाला होता की ते नेहमी भावनेच्या दोन टोकात वावरत. त्याना मध्यममार्ग कधीही जमला नाही. कधी त्याना माणसांची गर्दी आवडे, तर कधी पूर्ण एकांतवास. घड्याळाच्या लंबकाप्रमाणे हे घडे. लंबक एकदा या टोकाला जातो तर दुसऱ्यांदा त्या टोकाला. कोस्सलर यांच्या आयुष्याचे तसेच होते. कोस्सलर लिहितात की, "महिनेच्या महिने मी एकांतवासात दिवस काढीत असे. अशा वेळी आपल्यासारख्याच इतर मनुष्यप्राण्याला भेटावे अशी इच्छादेखिल माझ्या मनात येत नसे. नि मग एक दिवस खेडेगावातील शहर न पाहिलेल्या खेडुताच्या उत्साहाने शहर पाहाण्यासाठी नि खेळ मनोरंजनाच्या अपेक्षेने शहराकडे धाव घेत असे. माझ्या बालपणी ज्या एकाकीपणाच्या आपत्तीने मी पछाडलो गेलो होतो त्याचेच हे दृश्य परिणाम होते. खूप दिवस घरातल्या घरात मी एकटा असे नि मग एकेदिवशी वडील मला खेळासाठी कुणाच्या तरी घरी घेऊन जात. तोच नमुना आज मीही गिरवीत आहे. बालपणी मला माझ्या वयाचे सवंगडी नव्हते. सवंगडी मिळाले नि मी खेळात रमलो की खेळ सोडून घरी परतणे माझ्या जीवावर येई. आताही तसेच घडते. बुद्धिबळापासून फाशाच्या खेळापर्यंत प्रत्येक खेळात माझा प्रकार नेहमी एकच ! खेळात गुंगलो की मला तो खेळ थांबवताच येत नाही. पार्टीला गेलो की झिंगण्यावाचून मला गत्यंतर नसते. अशा वेळी मी खूप पितो, झिंगतो नि स्वतःला मूर्ख ठरवून घेतो. तथापी जर का मी एकटा असेन, माझ्या बरोबर माझे सोबती नसतील तर दारूची मला आठवण देखिल होत नाही."

कोस्सलरना वाटणारा अपराधगगंड, त्यांची धास्तीग्रस्तता आणि त्यांचा एकटेपणा ही त्यांच्या स्वभावाची भावनिक बाजू आपण पाहिली. आता त्यांच्या बौद्धिक बाजूकडे वळू. कोस्सलर बालबृहस्पती होते. वयाच्या मानाने त्यांची बुद्धी अतिशय तल्लख होती. परंतु वयाबरोबर येऊ शकणारे प्रौढत्व मात्र त्यांच्या ठिकाणी आले नव्हते. वयाच्या मानाने त्यांची चेहरेपट्टी तर कोवळीच दिसे. पण भावना व बौद्धिक शहाणपणाच्या बाबतीतसुद्धा ते पोरकटच वागत. त्यांच्या स्वतःच्याच शब्दात बोलायचे तर असे म्हणता येईल की, "बौद्धिक चातुर्य ते चटकन आत्मसात करू शकत. परंतु बौद्धिक शहाणपण आत्मसात करावयास त्याना विलंब लागत असे." त्यांच्या संपूर्ण व्यक्तिमत्वामधे अनेक फिक्झेशन्स किंवा भावनिक गुरफटी होत्या व त्या गुरफटीत ते घुमत राहात. ते लिहितात की, "दहाव्या वर्षी मी बालबृहस्पती होतो. परंतु मला पंधरावे वर्ष लागले तरी माझे कुमारवय संपत नव्हते."

कोस्सलरना पुस्तकवाचनाचे जबरदस्त वेड होते. ते पुस्तकावर पुस्तके वाचून काढीत. त्याना गणिताचा नाद होता. स्वतःची स्वतंत्र बुद्धी वापरून यांत्रिक खेळणी तयार करावयास त्याना आवडे. पंधरा वर्षाच्या वयातच त्याना हंगेरियन, जर्मन, फ्रेंच आणि

हे लांछन उमटते. गणित आणि अन्य शास्त्रांच्या मदतीने अनन्ताचा शोध घ्यायचा हे माझे वेड म्हणजे पुढील आयुष्यात ज्या वेगवेगळ्या प्रकारच्या युटोपियांचा शोध मी घेत राहिलो त्या शोधाचा पहिला हप्ता होय. अनन्ताचा शोध जेव्हा वांझ ठरला तेव्हा तो नाद सोडून मी दुसऱ्या भूस्वर्गाच्या नादी लागलो. तारुण्यात प्रथम मी प्रॉमिस्ड लँड - परमेश्वराने आश्वासन दिलेल्या भूमीच्या तलासात - पॅलेस्टाईनमधे गेलो. मागाहून कम्युनिस्ट पक्षात प्रवेश केला. परमेश्वराने आश्वासन दिलेल्या भूमीचा शोध घेणे किंवा कम्युनिस्ट पक्षात राहून मी केलेले कार्य हे सर्व भूस्वर्गाच्या शोधाचेच वेगवेगळे प्रकार होते. खाईन तर तुपाशी नाही तर उपाशी किंवा घेईन तर सगळे नाहीतर काहीच नको, ही त्या शोधांमागची टोकाची मनोवृत्ती. हे सुद्धा भूस्वर्गाच्या शोधाचेच एक अंग होते. ही मनोवृत्ती टोकाची असते यातच सगळे काही आले. चालू युगात या मनोवृत्तीने पृथ्वीवरील स्वर्गाच्या शोधाचे रूप धारण केले आहे. गतकालात हीच मनोवृत्ती परमेश्वरप्राप्तीच्या नावाने काम करीत होती. अठरावे शतक संपले आणि आमच्या जगातून परमेश्वर अदृश्य झाला. तथापी नंतरची दीडशे वर्षे या जगात इतक्या उत्तेजक गोष्टी घडत होत्या की परमेश्वर आमच्या जगातून अदृश्य झाला आहे, त्याने या जगाचा निरोप घेतला आहे हेच कुणाच्याही लक्षात आले नाही. आज ही परिस्थिती संपूर्णपणे पालटली आहे. एज ऑफ रीझन - विवेकाचे युग आणि एज ऑफ प्रोग्रेस - प्रगतीचे युग दोन्ही युगे संपुष्टात आली आहेत आणि परमेश्वराने या जगाची रजा घेतल्यामुळे या जगामधे जी प्रचंड पोकळी निर्माण झाली, ती पोकळी आता जाणवू लागली आहे. ज्या युगात मी जन्माला आलो, लहानचा मोठा झालो ते युग अशाप्रकारे भ्रमनिरासाचे युग होते. अज्ञाताच्या आकर्षणाचे युग होते.''

''मी जेव्हा चार अथवा पाच वर्षांचा होतो तेव्हा देव म्हणजे काय याच्याबद्दल माझ्या मनात यत्किंचितही शंका नव्हती. देव म्हणजे जो सर्व पहातो तो, ज्याला सर्व ऐकू येते तो, ज्याला आमच्या मनातले कळते तो, अशी माझी देवाबद्दलची कल्पना होती आणि घरातील वडील मंडळींनी सांगितल्यामुळे माझी ही कल्पना झाली होती. देव वर राहातो असेही त्यांनी मला सांगितले होते....... 'वर' या शब्दाचा अर्थ मी शब्दशः घेतला होता. माझ्या पलंगाच्या वर, आढ्यावर सात देवतांचे चित्र रंगविलेले होते. त्यामुळे सायंप्रार्थना मी त्या सात देवतांनाच उद्देशून करीत असे. त्या सात देवता हाच देव असे मला तेव्हा वाटे........''

''सप्त देवतांना उद्देशून प्रार्थना मी किती दिवस म्हटल्या ते मला आठवत नाही. पण केव्हातरी या प्रार्थना मी थांबवल्या होत्या. गंमत ही आहे की जेव्हा नव्यानेच एखाद्या दैवताची भक्ती आपण करू लागतो तेव्हा तो दिवस आपल्या चांगल्याच स्मरणात राहातो. परंतु ज्या दिवशी त्या दैवताला आपण सोडचिठ्ठी देतो तो दिवस काही आपल्या स्मरणात

राहात नाही. मतांतर आणि धर्मांतर दोन्ही कमी अधिक प्रमाणात एका झटक्यात घडून येणाऱ्या प्रक्रिया असल्याने त्या केव्हा घडल्या याची तारीख आपल्या स्मरणात बरोबर राहते. परंतु श्रध्देचे खच्चीकरण ही गोष्ट अगदीच सावकाशीने व टप्प्याटप्प्याने घडून येत असल्याने एखादी श्रध्दा नेमकी कोठल्या दिवशी संपुष्टात आली हे काही आपण नेमकेपणाने सांगू शकत नाही.

"वरच्या आढ्यावरचे सात देवतांचे चित्र माझ्या मनातून हळूहळू निघून गेले नि त्या चित्राची जागा लांब पांढऱ्या दाढीच्या, भक्कम शरीराच्या वृद्ध गृहस्थाच्या चित्राने घेतली. शोधाचा विषय तेवढा बदलला होता. पूर्वी सात देवतांना मी परमेश्वर समजत होतो. आता आकाशातल्या प्रेमळ म्हातारबुवांना. केप्लरच्या आधीचे खगोलशास्त्रज्ञ स्वर्गाचा नकाशा शोधत होते. केप्लर त्या ऐवजी ग्रहांच्या परिभ्रमणाचे कायदे शोधत होता. तेव्हा शोधाचे स्वरूप तेच होते फक्त विषय बदलला होता."

"जेव्हा शास्त्रासाठी शास्त्राचा पाठपुरावा केला जातो तो कधीच भौतिकवाद होत नाही. कारण या सृष्टीच्या ठिकाणी जी नियमबद्धता आहे, जी व्यवस्था आहे त्याचा तो शोध असतो. नि असा शोध अध्यात्मात मोडतो. शास्त्रीय संशोधनातून प्राप्त झालेले निष्कर्ष जरी भौतिकवादी बनले तरी त्याचा अर्थ ज्यानी ते निष्कर्ष काढले ते भौतिकवादी होते. खुद्द शास्त्र भौतिकवादी आहे असा नव्हे."

"वैयक्तिक देवाच्या अस्तित्वावरचा माझा विश्वास उडाला होता, नि देवावरच्या विश्वासाची जागा आता शास्त्रावरच्या विश्वासाने घेतली होती हे जे मी म्हटले ते जरी व्यापक अर्थाने खरे असले तरी ते पूर्ण सत्य मात्र नव्हते. एक अतिशय कठीण विषय मी तेथे अतिशय सोपा करून सांगत होतो. कारण देवाच्या अस्तित्वावरचा माझा विश्वास जरी उडाला होता तरी देव अस्तित्वात असला तर तो फक्त एकच असला पाहिजे, देव फक्त एकटाच अस्तित्वात असू शकतो ही कल्पना मी पूर्णपणे टाकून दिली नव्हती. सारांश देव कसा असावा याच्याबद्दलच्या माझ्या कल्पना होत्या आणि या ना त्या वेषात तो जुनाच देव माझ्या आयुष्यात पुन्हा पुन्हा डोके वर काढीत होता. याचे कारण असे की विद्वान माणसे सर्वज्ञ असतात असा माझा ठाम विश्वास होता आणि विद्वानांच्या शब्दावर डोळे झाकून विश्वास ठेवण्याची माझी प्रवृत्ती होती. हंगेरियन भाषेत अशा विद्वानांना tudos म्हणतात. टुडोस हा तांत्रिक शब्द आहे. ट्युडोस म्हणजे सर्वज्ञानी, ज्याला सर्व काही माहीत आहे असा. सृष्टीचे रहस्य जाणणारा."

"कसे कोण जाणे, या ट्युडोस शब्दाने माझ्या स्मृतीत पक्केघर केले होते..... त्यामुळे असा एखादा सर्वज्ञानी मला कुठे दिसला की मी त्याच्या प्रेमात पडत असे."



अनुक्रमणिका

कोस्सलर पुढे लिहितात की, "कालांतराने खुद्द माझेच एक पुस्तक प्रसिद्ध झाले नि अनेकांच्या दृष्टीने मी सुद्धा एक ट्युडोस - एक नोइंग वन, एक सर्वज्ञानी, शामन ठरलो. मग मलादेखील अनेक प्रकारचे लोक अनेक विषयांवर प्रश्न विचारू लागले नि मला एक नवाच साक्षात्कार झाला व त्या साक्षात्काराबरोबर आजच्या बौद्धिक गोंधळाच्या आणि भावनिकदृष्ट्या अपरिपक्व असणाऱ्या कालखंडात बरीच माणसे कॅथलिक चर्च अथवा कम्युनिस्ट पक्ष अशासारख्या बंदिस्त विचारसरणीच्या संस्थांकडे का धाव घेतात या प्रश्नाचे उत्तर मला मिळाले. कॅथलिक चर्च वा कम्युनिस्ट पक्ष यासारख्या संघटना बंदिस्त असतात, चिरेबंदी असतात यातच त्यांचे आकर्षण अध्याहृत आहे. या संघटना बंदिस्त असल्याने त्या वर्तुळाकार युक्तिवाद करू शकतात. त्यांचे प्रारंभीचे प्रतिपादन मान्य केले की त्यांचे तात्पर्य आपोआपच विश्वसनीय वाटू लागते आणि अशा संघटनांमधे सर्वज्ञ वा शामन लोकांची एक चढती श्रेणी काम करीत असल्याने प्रश्नकर्त्याच्या प्रत्येक शंकेवर उत्तर देण्यासाठी तेथे एक चढत्या श्रेणीची फौजच उपलब्ध असते. थोडक्यात तुमचा कोठलाही प्रश्न तेथे अनुत्तरित राहात नाही."

कोस्सलर शाळेत शिकत असताना पहिले महायुद्ध सुरू झाले नि एका वर्षातच ऑस्ट्रो-हंगेरियन साम्राज्याचा पूर्ण पराभव झाला नि त्या साम्राज्याची अखेर जवळ आल्याची चिन्हे दिसू लागली. ही सर्व हकिकत वर आलीच आहे. या प्रकरणात अनेक व्यापारी कुटुंबे बुडाली नि त्यात कोस्सलर यांचेही कुटुंब होते. याचाही उल्लेख वर आला आहे. कोस्सलर यांचे बालपण कसे हालअपेष्टात आणि मानसिक दुःखात गेले तेही आपण पाहिले. त्यांचे वडील स्वभावाने जरी प्रेमळ होते तरी धंद्यासाठी लागणारी चिकाटी त्यांच्यापाशी नव्हती. वडिलांबरोबरचे त्यांचे संबंध प्रेमाचे असले तरी फारसे निकटचे नव्हते. वडिलांपासून ते दूरदूरच राहात आणि आईच्यासुद्धा ते फारसे जवळ जात नसत. कोस्सलर बहुतेक घरातल्या नोकरमाणसांच्या, विशेषतः दाईच्या ताब्यात असत नि तीच त्याना कसे वागायचे किंवा कसे नाही याची शिस्त लावत असे. म्हणूनच कोस्सलर त्यांच्या आत्मचरित्रात एकेठिकाणी म्हणतात की, "विविध प्रकारची भये, एकटेपण आणि अपराधगंड यांनी माझे बालपण पुरेपूर भरलेले होते." बालपणात जे विशिष्ट प्रकारचे अनुभव आले त्याच्यामुळे त्यांच्या मनात तीव्र स्वरूपाचा न्यूनगंड तयार झाला. कोस्सलर यांची उंची बेताची होती. नक्के ते ठेंगण्यातच जमा झाले असते. त्यांचा चेहरा पोरसवदा होता. याची त्याना कायम खंत वाटत असे. एखाद्याला बालपणी न्यूनगंड वाटणे हे आश्चर्यकारक नव्हे. आश्चर्यकारक हे की हा न्यूनगंड प्रौढ वयातसुद्धा तितक्याच तीव्रतेने टिकून राहाणे. कारण बालपणी अनेकांना न्यूनगंड असतो. वय वाढले की तो निघून जातो. बरा होतो. परंतु कोस्सलर यांच्या बाबतीत तसे झाले नाही. न्यूनगंडाच्या बाबतीत सर्वसाधारण अनुभव असा आहे की वाढत्या वयाबरोबर न्यूनत्वभावना कमी कमी होत

जाते आणि चवदा पंधरा वयाच्या दरम्यान ती पूर्णपणे अदृश्य होते. कोस्सलर या सामान्य नियमाला अपवाद ठरले. त्यांची पौंगडावस्था खूपच दीर्घकाळ टिकली. त्यांचे वय वाढले. वयाने ते प्रौढ झाले. पण त्यांच्या मनावरचा न्यूनत्वाचा प्रभाव काही कमी झाला नाही. स्वतःच्या उणेपणाचा छाप त्यांच्या व्यक्तित्वावर कायम राहिला. विद्यार्थी दशेतला त्यांच्या मनाचा एकमेव विरंगुळा म्हणजे शैक्षणिक अभ्यास. विशेषतः गणित आणि बुद्धीला चालना देणाऱ्या विषयांचा अभ्यास. या अभ्यासात मात्र त्यांचे मन खूष राहात असे. गणिताने तर त्यांच्या मनावर मोहिनीच घातली होती. गणित या विषयात तर त्याना अक्षरशः अनंत शक्यतांचा साक्षात्कार झाला होता. गणित हा त्यांच्या दृष्टीने एक महान चमत्कार होता. विशेषतः रॅशनल आणि इर्रॅशनल संख्यांचे एकत्रीकरण ही तर त्याना एक मोठी जादूच वाटत होती. (प्रस्तुत कादंबरीचे फ्रेंच शीर्षक 'ल झिरो ए लफिनी किंवा 'द झिरो अँड द इन्फिनिट' असे आहे. कारण या कादंबरीतला एक महत्त्वाचा कल्पनाबंध 'शून्य आणि अनन्ताच्या' कल्पनेशी संबंधित आहे.) मानवी जीवनामधे रॅशनल आणि इर्रॅशनल किंवा बुद्धिगम्य आणि अगम्य अशा दुहेरी घटकांचे विचित्र मिश्रण आढळते ही गोष्ट कोस्सलरना नेहमीच कौतुकाची वाटत असे.

गणित आणि शास्त्र या दोन विषयात कोस्सलर यांचे मन रमत असे. परंतु काही दिवसांनी याही विषयांनी त्याना दगा दिला. वयाच्या सतराव्या वर्षी ते लिहितात की, ''माझे बैद्धिक विश्व एकाएकी कोलमडून पडले.'' खरे तर ''माझे सामाजिक विश्वसुद्धा त्याचवेळी उध्वस्त झाले '' असे त्यानी म्हटले असते तर ते वावगे ठरले नसते. कारण पहिले महायुद्ध संपले नि काऊंट मायकेल कारोल्यीच्या नेतृत्वाखालील १९१८ ची हंगेरियन राज्यक्रांती घडून आली. सत्तेवर आल्या आल्या कारोल्यीने जाहीर करून टाकले की हंगेरी ऑस्ट्रो-हंगेरियन साम्राज्यातून बाहेर पडून स्वतंत्र होत आहे. कारोल्यी उदारमतवादी होता. त्याच्या नेतृत्त्वाखाली नवंबर १९१८ मधे हंगेरीचे स्वतंत्र लोकशाहीवादी प्रजासत्ताक राज्य घोषित केले गेले. परंतु चारच महिन्यात बेला कुन या कम्युनिस्ट हुकूमशहाने प्रेसिडेंट कारोल्यीला सत्तेवरून खाली खेचले. संकटकाळी आपण तुला लागेल ती मदत पुरवू असे वचन लोकशाहीवादी पाश्चात्य राष्ट्रांनी त्याला दिले होते. परंतु दिलेले वचन त्यानी न पाळल्याने त्याची ही गत झाली होती नि त्याला कुनच्या हाती सत्ता सुपूर्द करावी लागली होती. स्वतंत्र झाल्यापासून केवळ चारच महिन्यांच्या अवधीत हंगेरीच्या राजधानीत बुडापेस्ट येथे कम्युनिस्ट राजवट प्रस्थापित झाली. तथापी ही राजवटदेखील मोजून शंभर दिवस टिकली. कारण १९१९ च्या जुलैमधे झेक आणि रुमानियाच्या सैन्याने त्या राजवटीची उचलबांगडी केली होती.

केवळ एका वर्षाच्या छोट्या अवधीत कोस्सलरना अशा प्रकारे तीन महत्त्वाचे

प्रसंग पाहावे लागले आणि ते सुद्धा अतिशय संस्कारक्षम वयात. या तिन्ही प्रसंगांचा कायमचा ठसा त्यांच्या व्यक्तित्वावर उमटला. काऊंट कारोल्यीने घडवून आणलेली हंगेरियन क्रांती, काऊंट कारोल्यीचे उच्चाटण आणि बेला कुनच्या हाताखाली बुडापेस्टमधे रशियाधार्जिण्या कम्युनिस्ट हुकूमशाही राजवटीची प्रस्थापना आणि झेक-रुमानियन सैन्याच्या हस्ते घडून आलेले त्या राजवटीचे उच्चाटण हे ते तीन नाट्यपूर्ण प्रसंग. या तीन प्रसंगांपैकी बेला कुनने घडवून आणलेल्या कम्युनिस्ट क्रांतीने कोस्सलर यांच्या मनावर फार मोठा परिणाम केला. कारण या प्रसंगामुळेच त्यांची कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाशी पहिली ओळख झाली. त्याच्या आधी त्याना राजकीय विषय वर्ज्य होता. दैनिक वर्तमानपत्रे वाचण्याचीही तसदी ते तत्पूर्वी घेत नसत. ते लिहितात की, "१९१९ साली कम्युनिझम हा एक अगदी नवा शब्द होता. नि त्या शब्दामधून न्याय्य, आशादायक व सुंदर असे काहीतरी ध्वनित होत होते."

कोस्सलरना राजकीय विषयामधे स्वारस्य उत्पन्न झाले नि ते या विषयाची पुस्तके, वर्तमानपत्रे वाचू लागले आणि त्याना प्रत्येक दिवशी नवे नवे शोध लागू लागले. त्याच काळात रेड गॅझेट या पत्रात कोस्सलर यांनी वाचले की, 'हंगेरितल्या शेतीयोग्य जमिनीपैकी तीस टक्क्यांपेक्षा अधिक जमीन काही मोजक्या सरंजामदारांच्या खाजगी मालकीची आहे. एकूण लोकसंख्येशी तुलना करता हे खाजगी जमीनदार दोन टक्के सुद्धा नाहीत.' कोस्सलरना त्यापूर्वी असले काहीच माहीत नव्हते. त्यामुळे त्याच वर्तमानपत्रात विचारण्यात आलेला, 'काय, हजारातल्या फक्त एकाने श्रीमंती आणि ऐषआराम भोगावा आणि उरलेल्या नऊशेनव्याण्णवांनी दारिद्र्यात उपाशी दिवस काढावेत ही गोष्ट न्याय्य आहे काय ?' प्रश्न त्याना मनोमन पटला. 'ही संपत्ती सर्वांमधे सारख्या प्रमाणात वाटून टाकली पाहिजे' ही पूढची सूचना तर त्याना शंभर टक्के तर्कशुद्ध वाटली. बेला कुनप्रणित हंगेरियन कम्युनिस्ट क्रांतीमुळे कोस्सलर याना आयुष्यात प्रथमच खऱ्या कामगारवर्गाची ओळख झाली होती. कोस्सलर लिहितात की, "बऱ्या वस्तीतल्या पैसेवाल्या लोकांनी औद्योगिक कामगार हा प्राणीच तोवर पाहिलेला नव्हता. त्यानी कडया पाहिला होता. रस्ता झाडणारा सफाई कामगार पाहिला होता, भांडी घासणारा भांडीघाशा पाहिला होता परंतु औद्योगिक कामगार काही पाहिला नव्हता...... हे सगळे लोक नळ दुरुस्त करणारे, भांडी घासणारे इत्यादींपेक्षा अगदी वेगळे होते. वरवर पाहता दिसण्यात ते आडमुठे दिसत, परंतु त्यांच्या ठिकाणी एका वेगळ्याच प्रकारचा आत्मविश्वास दिसून येत होता..... औद्योगिक कामगार हा मला आणि माझ्यासारख्या इतर अनेक लोकांना एक मोठा क्रांतीकारक शोधच होता." बेला कुनच्या क्रांतीने कोस्सलर यांच्यासाठी जो सर्वात मोठा चमत्कार घडवून आणला होता तो हा की या क्रांतीने मानवाच्या भवितव्याबद्दल एक नवे, भव्य चित्र

त्यांच्यासमोर उभे केले होते. राजकीय क्रांतीमुळे कामकरी जनता युगायुगाच्या दडपशाहीतून बाहेर पडू शकते. दारिद्र्य आणि गुलामगिरीच्या शृंखला तोडून स्वतंत्र होऊ शकते. याचा साक्षात्कार त्या क्षणी त्याना झाला होता. कधीही पुसला न जाणारा असा तो ठसा होता.

एकोणिसशे बावीसमधे कोस्सलर कुटुंब व्हिएन्ना शहरात स्थायिक झाले. व्हिएन्नामधे बस्तान बसताच आर्थर कोस्सलरच्या वडिलांनी त्याचे नाव व्हिएन्नाच्या तांत्रिक महाविद्यालयात घातले. हे महाविद्यालय विद्यापीठाच्या दर्जाचे होते. आपल्या मुलाने इंजिनियर व्हावे अशी त्यांच्या वडिलांची इच्छा होती. तथापि हे शक्य होण्यासारखे नव्हते. कारण कोस्सलर यांच्या जगण्याचा, विशेषतः पूर्वायुष्यातील जगण्याचा एक विशिष्ट थाट होता. आपण वर हे पाहिलेच आहे की, कोस्सलर यांचे आयुष्य कायम लंबकाच्या दोन टोकात फिरत असे. लंबकाचा काटा कधी या टोकाला असतो तर कधी त्या टोकाला. तो कधीही मध्यबिंदूपाशी असत नाही. कोस्सलर तंत्रमहाविद्यालयात दाखल झाले, भरपूर अभ्यास करून इंजिनियरिंगची पदवी पदरात पाडून घ्यावी म्हणून. परंतु अभ्याऐवजी ते गुरफटले विद्यार्थीवर्गाच्या आपापसातल्या द्वंद्वयुद्धाच्या शर्यतींमधे. त्या काळात विद्यार्थी आपापसात द्वंद्वयुद्धे खेळत. ही द्वंद्वयुद्धे तलवारीने लढली जात. त्या काळात विद्यार्थीवर्गाची ती चूष होती. अशी द्वंद्वयुद्धे खेळणाऱ्या विद्यार्थ्यांचे स्वतंत्र संघ असत. जर्मन विद्यापीठीय जीवनाचे ते एक ठळक वैशिष्ट्य होते. प्रत्येक महाविद्यालयाचा स्वतःचा संघ असे आणि हे संघ आपापल्या महाविद्यालयाच्या नावाने एकमेकांना आव्हाने देत. द्वंद्वयुद्धासाठी रुंद पात्याच्या तलवारी वापरल्या जात. द्वंद्वयुद्धात चेहरा सोडून शरीराचा बाकीचा भाग आच्छादून घेण्याची मुभा असे. मद्यपान, प्रेमप्रकरणे आणि ही द्वंद्वयुद्धे ही तेव्हाच्या विद्यार्थीजीवनाची तीन प्रमुख अंगे होती. ही द्वंद्वयुद्धे खेळीमेळीच्या वातावरणात आणि कॉम्रेडशिपच्या भावनेने खेळली जात. भेकडपणा आणि मित्रद्रोह हे दोन गुन्हे सोडल्यास विद्यार्थ्यांना बाकी सर्व क्षम्य होते. कोस्सलर यांना हा कार्यक्रम एकदम पसंत पडला. कोस्सलर यांचे आयुष्य कधीच धोपटमार्गाने गेले नाही असे आपण वर म्हटले त्याचा हा उत्तम पुरावा होता. कोस्सलर यांनी महाविद्यालयाची वाट धरली कारण त्याना इंजिनियर व्हायचे होते. परंतु ते अडकले महाविद्यालयीन द्वंद्वयुद्धाच्या कार्यक्रमात. मात्र या द्वंद्वयुद्धामुळे त्यांचे केवळ नुकसानच झाले होते असे मात्र नव्हे. त्यांचा त्यामुळे काही फायदासुद्धा झाला होता. उदा. कोस्सलर हे स्वभावतः न्यूनगंडप्रेरित असल्याने त्याना नवख्या अपरिचित माणसांमधे एकदम मिसळता येत नसे. परंतु आता द्वंद्वयुद्धाच्या खेळामधे ते भाग घेऊ लागल्यापासून त्यांचा हा प्रश्न सुटला होता. अनोळखी, अपरिचित लोकांमधेही त्याना आता सहजगत्या मिसळता येऊ लागले. परिणामी त्यांचा जन्मापासूनच एकटेपणा खूपच कमी झाला. असो. तर द्वंद्वयुद्धाच्या निमित्ताने त्याना विविध प्रकारच्या

व स्वभावाच्या विद्यार्थ्यांमधे सहजगत्या मिसळता येऊ लागले नि त्यांचा न्यूनगंडही त्यामुळे काही प्रमाणात कमी झाला. असे काही फायदे त्याना या द्वंद्वयुद्ध प्रकरणातून मिळाले.

व्हिएन्नात आल्यानंतर कोस्सलर द्वंद्वयुद्धमंडळाचे सभासद झाले नि त्यांना राजकीय विषयामधे स्वारस्य उत्पन्न झाले. हाही एक आनुषंगिक परिणाम म्हणता येईल. पूर्वीच्या काळी या विषयात त्यांनी कधीही लक्ष घातले नसते. कोस्सलर ज्या द्वंद्वमंडळाचे सभासद बनले होते ते मंडळ कट्टर ज्यू ऐक्यवाद्यांचे होते. 'ज्यू तितका मेळवावा' हे त्या मंडळाचे ब्रीदवाक्य होते. एकट्या व्हिएन्ना शहरामधे ज्यू–ऐक्यवाद्यांची एकूण बारा सार्वजनिक मंडळे होती. हे सर्व विद्यार्थी झिओनिझम किंवा ज्यू-राष्ट्रवादाचे पुरस्कर्ते होते. ज्यू जमातीचे स्वतंत्र राष्ट्र झालेच पाहिजे ही त्यांची राजकीय घोषणा होती. थिओडोर हर्झेल हा त्या चळवळीचा आद्यप्रणेता. व्हिएन्ना येथे शिकत असताना द्वंद्वयुद्धाच्या निमित्ताने या चळवळीशी कोस्सलर यांचा संबंध आला नि त्याना जीवनाचे एक भक्कम प्रयोजनच सापडले. व्हिएन्ना येथे शिकताना जाबोटिन्स्की या नावाच्या इसमाशी काही कारणाने कोस्सलर यांची ओळख झाली. जाबोरिनस्की हा झिओनिझमच्या चळवळीचा एक महत्त्वाचा पुढारी होता. तो उत्तम वक्ता, तसेच हुषार राजकारणपटू होता. तथापी वृत्तीने तो अतिशय प्रतिगामी होता.

वयाच्या चौदाव्या वर्षी कोस्सलर कम्युनिस्ट बनले होते. वयाच्या सतराव्या वर्षी ते द्वंद्वयुद्ध मंडळाचे सभासद झाले होते आणि हे द्वंद्वयुद्धमंडळ ज्यू राष्ट्रवाद्यांचे असल्याने ते आपोआपच ज्यू राष्ट्रवादी झाले होते. त्या दिवसात व्हिएन्नामधल्या द्वंद्वमंडळाचे एकूण तीन संघ होते. एक विशाल जर्मनवादी (पॅन-जर्मनवादी) संघ, दुसरा उदारमतवादी संघ आणि तिसरा ज्यू राष्ट्रवादी संघ. पैकी विशाल जर्मनवादी संघ हा भयंकर वंशवादी गट होता. शुद्ध आर्यरक्त हे त्या गटाचे मुख्य तत्त्वज्ञान होते. हिटलरचे नाव सुद्धा जेव्हा कोणी ऐकले नव्हते तेव्हा या मंडळींनी शुद्ध आर्यरक्ताचे तत्त्वज्ञान स्वीकारले होते. शुद्ध आर्यरक्ताच्या जर्मन विद्यार्थ्यालाच फक्त त्यांच्या संघामधे प्रवेश मिळे. याच्या उलट उदारमतवादी गटाची भूमिका होती. ते प्रतिविशाल जर्मनवादी होते. शुद्ध आर्यरक्त वगैरे घोषणा या गटाला मान्य नव्हत्या. झेक, हंगेरियन, ज्यू आणि अन्य कनिष्ठ वंशाच्या विद्यार्थ्यांना त्यांच्या संघात प्रवेश मिळू शके. ज्यू राष्ट्रवादी संघात फक्त ज्यू वंशीय सभासदालाच प्रवेश होता हे ओघानेच आले. व्हिएन्ना शहरात त्या दिवसात एकूण बारा ज्यू राष्ट्रवादी द्वंद्वयुद्ध संघ होते. पैकी पहिला असा संघ १८९० त स्थापन झाला होता. डॉ. थिओडोर हर्झेल हा त्या संघाचा आद्य संस्थापक आणि ज्यू झिऑनचा पहिला प्रेषित. द्वंद्वयुद्ध करण्यात, दारू पिण्यात, रस्त्यात मारामारी करण्यात, गाणी बजावणी म्हणण्यात ज्यू लोक इतर लोकांच्या मागे नाहीत हे दाखविणे हा या ज्यू संघाचा प्रमुख उद्देश होता.



अनुक्रमणिका

असो. तर कोस्सलर अशा एका संघाचे सभासद झाले ही महत्त्वाची गोष्ट. महत्त्वाची अशाकरता की ज्यू-राष्ट्रवादी सभासद बनल्याने कोस्सलरना झिओनिझमचा परिचय झाला. हे सर्व तपशील 'ॲरो इन् द ब्ल्यू' मधे आले आहेत. कोस्सलर लिहितात की, एकाने मला झिओनिझमबद्दलचे माझे मत विचारले. मी म्हणालो की आपण झिओनिझमबद्दल फारसा विचार केलेला नाही. नव्हे या शब्दाचा नेमका अर्थ काय हे सुद्धा आपणाला माहीत नाही. तेव्हा तो प्रश्नकर्ता म्हणाला की, गेली वीस शतके ज्यू जमात हालअपेष्टा भोगीत आहे. ससेहोलपट सहन करीत आहे. येणाऱ्या एकविसाव्या शतकात हे थांबेल असे लक्षण नाही. शिवाय जे लोक ज्यूंचा द्वेष करतात त्यांच्याबरोबर बौद्धिक युक्तिवाद करणे हे देखिल व्यर्थ आहे. कारण ज्यू ही एक रोगग्रस्त जमात आहे. ज्यू हे राष्ट्र आहे, पण ज्या राष्ट्राला स्वतःचा देश नाही असे ते राष्ट्र आहे. एखाद्याला देह असावा पण स्वतःची पडछाया नसावी तशातलाच हा प्रकार आहे. आणखी असे की ज्यूंचे हे राष्ट्र वरचा मजला जड, पाया हलका या प्रकारचे आहे. ज्यू समाजात व्यापारी, कारखानदार, वकील, बुद्धीजीवी प्रचंड प्रमाणात आहेत. पण शेतकरी नि शेतमजुरी करणारे कामगार लोक अगदीच नाहीत. ज्यू राष्ट्राची तुलनाच करायची झाल्यास डोक्यावर उभे केलेल्या पिरॅमिडशी करता येईल. ही स्थिती फारशी स्पृहणीय ठरत नाही. याच्यावर फक्त एकच इलाज आहे. शेतजमिनीकडे परत चला. ज्यू लोकांना जर का या जगातल्या इतर लोकसमुदायांप्रमाणे व्हायचे असेल तर प्रथम त्यांना स्वतःचा हक्काचा देश मिळवावा लागेल. नंतर इतर लोकांच्या समाजरचनेसारखी समाजरचना तयार करावी लागेल. झिओनिझम म्हणजे हे सर्व. झिओनिझम हा फक्त एवढाच एकमेव इलाज ज्यूंसाठी उपलब्ध आहे.''

''हे सर्व इतके साधे नि सरळ होते की पूर्वीच आपल्या ध्यानात ते का येऊ नये याचेच मला आश्चर्य वाटले. परंतु ज्यू म्हणून माझा आजवर कधीच छळ झाला नव्हता. ही सुद्धा गोष्ट तितकीच खरी होती. त्यामुळे ज्याला सगळे ज्यू 'ज्यूंच प्रश्न' असे म्हणत तो प्रश्न मला कधी प्रकर्षाने जाणवला नाही.... सगळ्यात गंमतीचा भाग हा होता की जे दोघेजण (अटिला आणि हान) मला हे सर्व समजावून देत होते ते स्वतःसुद्धा ज्यूसारखे दिसत नव्हते........''

तेव्हा काहीतरी वाद घालायचा म्हणून मी हानला म्हणलो की, ''तू ज्यू वंशाचा आहेस हे तू कशावरून म्हणतोस ? त्यावर तो उत्तरला की, खरे तर कोण कोठल्या वंशाचा हे सांगता येण्यासारखे नाही. पण मी स्वतःला ऑटो हान समजतो. कारण सगळे लोक मला ऑटो हान म्हणून हाक मारतात नि लोक मला ऑटो हान म्हणतात म्हणून मी ऑटो हान आहे. तोच प्रकार येथेही आहे. लोक मला ज्यू म्हणतात म्हणून मी ज्यू आहे. तसे पाहिले तर मानवी वंशासंबंधीच्या सगळ्या उपपत्ती नि सगळे प्रबंध पूर्णपणे पोकळ आहेत. विद्वान लोक ज्या वांशिक लक्षणांबद्दल बोलतात ती सर्व लक्षणे आनुवंशिकतेचे फलित

नसून तो केवळ परिसर, पर्यावरणाच्या दबावाचा परिणाम आहे. त्यामुळे कोण ज्यू नि कोण बिगर - ज्यू ही गोष्ट फक्त जन्माच्या दाखल्यावरून सांगता येते. नुसता चेहरा पाहून सांगता येत नाही. ज्याला आम्ही लोक 'ज्यूंचा प्रश्न' असे म्हणत आहोत त्या प्रश्नाशी याचा काडीमात्र संबंध नाही. कारण येथे व्याख्येचा संबंध नसून आमच्या प्रतिष्ठेचा नि शौर्य - धैर्याचा संबंध आहे."

कोस्सलर द्वंद्वयुद्धाच्या ज्यू संघाचे सभासद बनले नि त्याना वाटू लागले की आपण ज्यू राष्ट्रवादासाठी नि ज्यू जमातीसाठी काहीतरी केले पाहिजे. काहीतरी केले पाहिजे म्हणजे पॅलेस्टाइनमधे गेले पाहिजे. म्हणजेच व्हिएन्नातले शिक्षण सोडले पाहिजे. कोस्सलर यांचा हा राजकीय निर्णय अगदी तडकाफडकीच होता. पण त्यांच्या राजकीय भूमिका नेहमी भावनांच्या दडपणाखालीच घेतल्या गेल्या होत्या. राजकीय विषयावर पवित्रा घेण्याचा त्यांच्या आयुष्यातला हा दुसरा प्रसंग. पहिला प्रसंग हंगेरियन क्रांतीच्या वेळचा. बेला कुनच्या कम्युनिस्ट पक्षाने काउंट कारोल्यीचे उदारमतवादी हंगेरियन राष्ट्रीय सरकार बडतर्फ केले त्याच्या काही दिवस आधी आपले सामर्थ्य अजमावून पाहाण्यासाठी एक मिरवणूक काढली होती. मिरवणूक प्रेतयात्रेच्या निमित्ताने होती. बुडापेस्ट येथे कम्युनिस्ट पक्षाने जो निषेध मोर्चा नेला त्याच्यावर गोळीबार होऊन काही माणसे मेली होती. त्यात बळी पडलेल्या माणसांची ती प्रेतयात्रा होती. प्रेतयात्रेत चॉपिन या संगीतकाराने रचलेले मृत्युसंगीत - फ्युनरल मार्च वाजवण्यात आले होते नि कोस्सलरना त्या संगीताने भावविवश बनविले होते. कोस्सलर त्या प्रसंगाबद्दल बोलताना लिहितात की, "अगदी प्रारंभापासूनच माझ्या मनामध्ये चॉपिनचे ते मृत्युसंगीत आणि कम्युनिस्ट तत्त्वज्ञान यांची गाठ घातली गेली होती. कारण कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाशी माझी पहिली ओळख त्या मृत्युसंगीताच्या निमित्ताने झाली." आता पॅलेस्टाइनच्या संबंधातली त्यांची निष्ठा देखिल त्याच प्रकारच्या भावनिकदृष्ट्या उत्तेजक वातावरणात तयार होत होती. स्वतःच्या या दोन्ही राजकीय निष्ठांबद्दलचे कोस्सलर यांचे भाष्य मोठे विचारप्रवर्तक आहे. कोस्सलर म्हणतात की, या जातीच्या निष्ठा आधी भावनिक समर्पण, मागाहून त्याच्या मागचे बौध्दिक आणि तात्विक समर्थन अशा प्रकारच्या असतात आणि खूप साधक बाधक विचार करून राजकीय निष्ठा कोणी स्वीकारल्या आहेत असे कधीही घडत नाही. त्या निष्ठांचे समर्थन करताना मात्र तसा दावा करण्यात येतो. पण त्यात तथ्य नाही. कारण खुद्द कोस्सलर यांच्याच अनुभवाप्रमाणे एक निष्ठा चॉपिनच्या फ्युनरल मार्चच्या धुंदीच्या आवरणाखाली त्यांनी आपल्या अंगावर घेतली होती, तर दुसरी द्वंद्वयुद्धाच्या संघातल्या लढाऊ वातावरणाच्या धुंदीच्या आवरणाखाली घेतली होती.

असो. तर सांगायची गोष्ट ही की ज्यू राष्ट्रवादी चळवळीच्या निमित्ताने

कोस्सलर अनेक कडव्या ज्यू राष्ट्रवाद्यांच्या सहवासात आले. तेथेच त्याना जाबोटिन्स्की हा ज्यूंचा एक प्रभावी नेता भेटला. जाबोटिन्स्की हा कृतीवीर होता आणि कोस्सलर यांच्या आयुष्यावर त्याच्या व्यक्तिमत्वाचा खोल आणि प्रदीर्घ ठसा उलटल्याचे दिसून येते. ज्यू राष्ट्रवाद्यांची भूमिका कोस्सलरल पटली नि त्यानी पॅलेस्टाइनाला मुक्काम हलवायचा बेत केला. १९२६ मधे कोस्सलना यांचे आईवडिल कामानिमित्त लंडनला वास्तव्य करून होते. तो मुहूर्त साधून व्हिएन्ना सोडून पॅलेस्टाइनमध्ये जाऊन रहायचे कोस्सलरनी ठरविले. झिओनिझमचा एक कार्यक्रम म्हणून पॅलेस्टाइनमध्ये जुन्या पद्धतीच्या छोट्या छोट्या शेतकी वसाहती सुरू करायच्या असे ठरले होते. कोस्सलरना त्या कार्यक्रमात सहभागी व्हायचे होते.

१९२६ ते १९२९ ही वर्षे कोस्सलर पॅलेस्टाइनमधे होते. एका मोठ्या आदर्शाच्या नादाने ते तिकडे गेले होते. परंतु त्या आदर्शाचे चीज करील असे काहीच त्याना तिथे आढळले नाही. त्याना शेतकरी वसाहतीचा (तांत्रिक भाषेत किबुत्झचा) सभासद व्हायचे होते. तसल्या एका वसाहतीकडे त्यांनी उमेदवारीचा अर्ज देखिल पाठविला. पण ते काम कोस्सलरना जमणार नाही असे सांगून त्या वसाहतीच्या पदाधिकाऱ्यांनी त्याना नकार दिला. परिणामी पुढील कित्येक महिने केवळ भ्रमंती करीत त्याना दिवस काढावे लागले. पोटाची खळगी भरण्यासाठी मग त्याना कधी रोजंदारी कामगाराची भूमिका करावी लागली. कधी अजिबात काही कामच न मिळाल्याने अर्धपोटी दिवसही काढावे लागले, तर कधी पूर्व युरोपातला एक भटक्या म्हणून तेल अवीव, हैफा, जरुसलेम, कैरो या शहरातील रस्ते झाडावे लागले. थोडक्यात त्या दिवसात कोस्सलर एक हिप्पी बनले होते. जग काय म्हणेल याच्याबद्दल पूर्ण बेफिकीर. उद्याचा दिवस कसा उजाडेल याच्याहीबद्दल पूर्ण बेफिकीर. खुद्द कोस्सलरना हिप्पीची पदवी आवडली असती. कारण पॅलेस्टाइनमधे त्यांची अवस्था हिप्पींपेक्षा वेगळी नव्हतीच !

कोस्सलर यांच्या आयुष्याचा एकूण ढाचा घड्याळाच्या लंबकागत होता असे आपण म्हटले. त्याचे प्रत्यंतर आता येत होते. लंबक एकदा या टोकाला जातो, दुसऱ्यांदा दुसऱ्या टोकाला. फार मोठे स्वप्न उराशी बाळगून कोस्सलर पॅलेस्टाइनमधे आले होते. पण तेथे त्यांचा भ्रमनिरास झाला. एवढेच नव्हे तर चणे खावयासही हाती पैसा नाही अशी त्यांची अवस्था आली नि त्यांच्या आयुष्याचा लंबक दुसऱ्या टोकाला गेला. कसलाही हासभास नसताना एक अगदी छानदार नोकरी त्यांच्याकडे आयती चालून आली. नोकरी वृत्तपत्राच्या बातमीदाराची होती. जर्मनीमधे उलस्टेन नावाची जगद्‌विख्यात प्रकाशनसंस्था काम करीत होती. या प्रकाशन संस्थेची कित्येक वृत्तपत्रे होती. या वृत्तपत्रांना मध्यपूर्वेतील बातमीपत्रे देणारा बातमीदार हवा होता. जरुसलेममधे राहून त्याने हे काम करायचे होते.

कोस्सलरना त्यानी नोकरीचे विचारले नि कोस्सलरनी ती नोकरी स्वीकारली. पुढे कालांतराने कोस्सलर जगप्रसिद्ध पत्रकार बनले. ही नोकरी ही त्याची जणू नांदीच होती. पुढे जरुसलेमहून त्यांची बदली पॅरिस ऑफिसात झाली. नंतर त्यानी पॅरिसही सोडले आणि ते शास्त्रीय विषयांचे संपादक बनले. Vossische Zeitung हे पत्र आणि उलस्टेन वृत्तसंस्थेची सगळी प्रकाशने यांच्यासाठी त्यानी हे काम करायचे होते. १९३१ मधे 'द बी. झेड् आम् मिट्टाग' या सायंदैनिकाचे विदेशविभागाचे ते प्रमुख बनले. हे सायंदैनिकही उलस्टेन गटाच्याच मालकीचे होते. केवळ अडीच वर्षांच्या अवधीत कोस्सलर यांनी केवढी मोठी मजल मारली होती ते पाहा. अडीच वर्षापूर्वी सकाळचे जेवण मिळाले तर संध्याकाळचे जेवण कसे मिळेल या विवंचनेत हातगाडीवरून लिंबाचे सरबत खपवीत हैफा शहराच्या रस्त्यातून टाचा झिजवीत ते फिरत होते. नि तेच कोस्सलर आज जर्मनीतले एक श्रेष्ठ आणि यशस्वी पत्रकार म्हणून संपादकांच्या मेळाव्यात अभिमानाने मिरवत होते. पत्रकार जीवनातील यशाचा उच्चांक त्यानी गाठला तो आर्टिक मोहिमेचा अहवाल पाठविण्यासाठी उलस्टेन वृत्तपत्रगटाचा प्रतिनिधी म्हणून त्यांची निवड झाली तेव्हा.

उत्तर ध्रुवावरच्या या मोहिमेसाठी झेपलिन वापरण्यात येणार होते आणि मोहिमेचे सगळे वृत्तपत्रीय हक्क उलस्टेन वृत्तपत्रगटाने खरेदी केले होते. १९३० साली ध्रुव मोहीम हे एक फार मोठे साहस मानले जात असे. २६ जुलै १९३१ रोजी मोहिमेला प्रारंभ झाला. या मोहिमेच्या बातमीपत्राचे संपूर्ण हक्क उलस्टेन वृत्तपत्रसंस्थेने विकत घेतले असल्याने आणि कोस्सलर हे त्या संस्थेचे एकमेव बातमीदार त्या हवाईजहाजावर असल्याने, कोस्सलरना तर ती आयुष्यातली अपूर्व पर्वणीच वाटली. पाच दिवस आणि चार रात्री हवाई जहाज आर्टिक प्रदेशातून उड्डाण करीत होते. खालील प्रदेशाचे फोटो घेत होते. प्रत्येक दिवशी बातमीपत्र धाडीत होते.

आत्मचरित्रामधे या संपूर्ण प्रकरणाचा उल्लेख 'रोड टु रिस्पेक्टिबिलिटी' 'सामाजिक प्रतिष्ठेकडे वाटचाल' या नावाने आला आहे. कोस्सलर ज्या उलस्टेन नावाच्या प्रकाशन संस्थेत नोकरीस होते ती संस्था त्या काळी तशा प्रकारची जगातील एक मान्यवर संस्था होती. कोस्सलर ज्या जागेवर काम करीत होते ती जागासुद्धा फार महत्त्वाची होती. प्रकाशन व्यवसायातील कोणालाही हेवा वाटावा अशीच ही स्थिती होती. शिवाय कोस्सलर यांचे वय विचारात घेता तर तो एक चमत्कारच म्हणावा लागला असता. कारण कोस्सलर तेव्हा २५ वर्षांचे कोवळे तरूण होते. परंतु जेव्हा कोस्सलर यांचे नशीब फळफळत होते तेव्हाच जर्मनीमधे काही दुर्दैवी गोष्टीसुद्धा घडत होत्या. उदा. जर्मनीतली वैयमार प्रजासत्ताक राजवट संपुष्टात आली होती. वैयमार ही लोकशाहीची बूज राखणारी उदारमतवादी राजवट होती. उलस्टेन प्रकाशन संस्था ही तिच्या बऱ्यावाईट गुणांसह याच

वैयमार प्रजासत्ताकाचे अपत्य होते. कोस्सलर वरवर चढत होते त्याच काळात जर्मनीत बेकारी वाढत होती. बूर्झ्वा लोकशाहीवादी राष्ट्र खिळखिळे होत होते. हिटलर आणि हिटलर प्रेरित नॅशनल सोशॅलिस्ट चळवळ एकाएकी वर चढत होती.

तत्कालीन जर्मनीत जर्मन सोशल डेमॉक्रॅटिक पक्ष व त्याच धर्तीचे इतर अन्य राजकीय पक्ष अस्तित्वात होते. परंतु हे पक्ष हिटलरच्या घोडदौडीला पायबंद घालू शकतील असे जर्मनीतल्या कोणालाच वाटत नव्हते. उलट शेकडो नव्हे, हजारो जर्मन तरुणांना असे खात्रीपूर्वक वाटत होते की, हिटलरच्या प्रगतीला जर का कुणी पायबंद घालू शकला तर तो फक्त जर्मन कम्युनिस्ट पक्षच घालू शकेल. जर्मन कम्युनिस्ट पक्षापाशी म्हणजेच के. पी. डी. पाशी तेव्हा ६,०००,००० नोंदीव सभासद होते. आंतरराष्ट्रीय कामगार चळवळ त्या पक्षाच्या पाठीमागे होती. नव्हे कामगार चळवळीचे प्रतिनिधी के. पी. डी. पाशीच होते.

हिटलरचा बंदोबस्त करण्याइतके सामर्थ्य तत्त्वतः त्या पक्षापाशी होते. तेव्हा सर्व विचार करून कोस्सलरनी ठरविले की आपण कम्युनिस्ट पक्षात प्रवेश करायचा. १९३१ च्या डिसेंबर महिन्यात पक्षसदस्यत्वासाठी के. पी. डी. कडे त्यानी अर्ज केला. १९३२ च्या जुलै महिन्यात उलस्टेन प्रकाशन संस्थेच्या नोकरीचा राजीनामा देऊन ते सोव्हिएट युनियनकडे चालते झाले. पश्चिम युरोपातल्या उदारमतवादी पांढरपेशा वर्गाला साम्यवादी तत्त्वज्ञानाकडे आकर्षित करून घेण्यासाठी ग्रंथ आणि लेख वगैरे लिहून साम्यवादाच्या पितृभूची सविस्तर आणि आकर्षक ओळख करून देण्याच्या कामावर कम्युनिस्ट पक्षाने त्यांची नेमणूक केली होती.

कोस्सलर यांनी कम्युनिस्ट पक्षाचा तडकाफडकी गंडा का बांधला याची उघड आणि प्रच्छन्न कारणे अनेक असू शकतील. ती सर्वच्या सर्व कारणे फोडून सांगता येतील असे वाटत नाही. फक्त काही अंदाज तेवढे बोलून दाखविता येतील. कोस्सलरनी कम्युनिस्ट पक्ष स्वीकारला त्याची काही कारणे भौतिक स्वरूपाची आहेत, तर काही भावनिक स्वरूपाची म्हणजे कोस्सलर यांच्या विशिष्ट स्वभावाशी संबंधित आहेत. प्रथम भौतिक कारणे पाहू. तो काळ आर्थिक मंदीचा होता. जगभर मंदीची लाट आली होती आणि त्या लाटेखाली भांडवलशाही अर्थव्यवस्था मोडकळीस येत होती. भांडवलशाही अर्थव्यवस्थेवरचे ते संकट पाहून कोस्सलरसारख्या तीव्र कल्पनाशक्तीच्या तरुणाला वाटू लागले की मार्क्सने वर्तविलेली भांडवलशाहीची अखेर हाकेच्या अंतरावर आली आहे. ही अखेर आणखी जवळ येण्यासाठी आपणसुद्धा हातभार लावावयास हवा. याच काळात हिटलर आणि फॅसिस्ट विचारसरणीचा फैलाव जोरात होऊ लागला होता. फॅसिस्ट विचारसरणीचा फैलाव आणि यश याचा अर्थ अंती हुकूमशाही राजवटीची प्रस्थापना हे सुद्धा कोस्सलरसारख्यांच्या

ध्यानात येऊन चुकले होते. नॅशनल सोशॅलिस्ट पक्षाला विरोध करण्याची अन्य लोकशाहीवादी पक्षांची असमर्थता तर तेथील सर्वांना उघडच दिसत होती. या सर्व कारणांमुळे कोस्सलरनी कम्युनिस्ट पक्षात प्रवेश केला. जर्मनीतल्या विद्यमान राजकीय पक्षात फक्त हा पक्ष त्याना खंबीर आणि भरवशाचा वाटत होता. अर्थात ही सर्व तार्किक कारणे झाली. कोस्सलरनी कम्युनिस्ट पक्षात प्रवेश केला याला अतार्किक आणि भावनिक अशीसुद्धा कित्येक कारणे होती. ही कारणे त्यांच्या विशिष्ट मानसिक स्वभावाशी निगडीत होती. बालवयापासूनच कोस्सलर एकाकीपणाच्या दुःखाने पछाडलेले होते. त्यांचे सख्खे आईवडील हयात होते. परंतु त्याना वाढविले होते गडीमाणसांनी. त्यामुळे त्याना कायम एकटे वाटत असे आणि याच कारणाने स्वतःसारख्या समदुःखी लोकांबद्दल त्याना मनापासून सहानुभूती वाटत असे. रंजलेगांजले, दीनदुबळे हे सर्वच त्यांना जवळचे वाटत. बालपणात ज्या सहानुभूती (आयडेंटिफिकेशन्स) तयार होतात त्या मोठेपणीसुद्धा आपली पाठ सोडत नाहीत असे आधुनिक मानसशास्त्र सांगते. ते येथे प्रकर्षाने खरे झाले होते. बालपणातल्या स्वतःच्या विशिष्ट अनुभवांमुळे 'पीडित, उपेक्षित' किंवा ज्या जनतेला 'रेचेड ऑफ द अर्थ' म्हणता आले असते त्या जनतेबद्दल त्यांच्या मनात विशेष सहानुभूती उत्पन्न झाली होती. कम्युनिस्ट पक्ष असल्या रंजल्यागांजलेल्यांची बाजू घेत आहे किंवा घेणार आहे हे जाणवल्याने ते कम्युनिझमच्या प्रेमात पडले होते. कोस्सलर यांच्या स्वभावाचा दुसरा विशेष म्हणजे एकाच कोस्सलरमधे एका वेळी दोन कोस्सलर घर करून राहात असत आणि या दोघांचे आकर्षणविषय परस्परविरुद्ध होते. एका कोस्सलरला प्रत्यक्ष कृतीचे - ॲक्शनचे आकर्षण होते, तर दुसऱ्याला चिंतन-मननाचे आकर्षण होते. जर्मन कवी गटेच्या शब्दात बोलायचे तर, कोस्सलर "यांच्या हृदयात दोन आत्मे वास करीत होते." ('टू सोल्स अलास, इनहॅबिट माय बुझम' - गटे). या दोन आत्म्यांचा क़ायम झगडा सुरू असे. या झगड्याची प्रकट चिन्हे त्यानी दिलेल्या त्यांच्या पुस्तकांच्या नावात आपणाला दिसून येतात. आत्मसंघर्ष हा त्यांच्या जीवनातील महत्त्वाचा leit motif किंवा प्रच्छन्न कल्पनाबंध असल्याने त्या कल्पनाबंधाचे प्रतिबिंब त्यांच्या वाङ्मयातही दिसते. त्यांच्या बहुतेक पुस्तकांची नावे जोडनावे आहेत. आणि ही जोडनावे परस्परविरुध्द कल्पना एकत्र बांधू पाहातात. त्यांच्या कादंबऱ्यांची ही काही नावेच पाहा म्हणजे माझा मुद्दा लक्षात येईल. कोस्सलरच्या एका पुस्तकाचे नाव आहे 'द योगी अँड द कमिसार'. कमिसार म्हणजे कम्युनिस्ट पक्षातला एक अधिकारी. दुसऱ्याचे नाव आहे 'इन्साइट अँड आउटलुक'. तिसऱ्याचे 'डार्कनेस ॲट नून' किंवा 'ल झिरो ए ल' आंफिनी', चवथ्याचे 'अरायव्हल अँड डिपार्चर' इत्यादी इत्यादी. ही सर्व नावे दोन शब्द नव्हे दोन कल्पना एकत्र जोडून बनली आहेत आणि दोन्ही कल्पना परस्परविरुद्ध आहेत. कोस्सलर यांच्या मनात जो परस्पर कल्पनांचा झगडा चालू होता त्याचीच ती द्योतक होती. ही नावे त्यानी विचारपूर्वक

ठरविलेली नाहीत. ती त्यांच्या नकळत त्याना सुचली होती असे ते स्वतःच सांगतात.

स्वतःच्या या विशिष्ट मानसिक अवस्थेचे वर्णन करताना कोस्सलर पावलोव्हच्या प्रयोगशाळेतील प्रयोगजन्य आजाराने आजारी झालेल्या कुत्र्याची उपमा वापरतात. कुत्र्यांना विशिष्ट प्रकारचे वळण लावण्यासाठी, विशेषतः कुत्र्यांच्या अनैच्छिक शारीरिक प्रतिक्रिया (रिफ्लेक्स ॲक्शन्स) ताब्यात आणण्यासाठी पावलोव्ह त्याना घंटीच्या टोल्याबरहुकूम वागावयास शिकवीत असे. उदा. एक टोला ऐकला की भूक लागली पाहिजे. दोन टोले ऐकले की भूक संपली पाहिजे वगैरे. जेव्हा कधी एकापाठोपाठ या दोन्ही सूचना कुत्र्यांना दिल्या जात तेव्हा कुत्रे त्रस्त बनत, गोंधळून जात आणि भूंकू लागत. कोस्सलर म्हणतात की, आपली अवस्था त्या कुत्र्यांसारखी होती. एकाच वेळी आपले मन दोन परस्परविरुद्ध गोष्टींकडे ओढ घेत असे. कुत्र्यांना बोलता येत नसल्याने ते आपल्या भावना भुंकून व्यक्त करीत होते. "मी मनुष्यप्राणी असल्याने भुंकण्याऐवजी मी शब्दात, ग्रंथात बोलत होतो. पण दोघांच्या वागण्यात तसा काहीच फारक नव्हता. आमचे युग हे पावलोव्हच्या प्रयोगशाळेसारखे असून मनोरुग्ण तयार करणें हे आमच्या युगाचे महत्त्वाचे कार्य आहे. माझे ग्रंथ हा त्या आजाराच्या लक्षणांचा तक्ता म्हणता येईल."

कोस्सलर यांचा मानसिक प्रश्न काय होता हे आता समजले असल्याने ते कम्युनिस्ट पक्षाकडे का वळले याचे उत्तर मिळू शकते. कोस्सलर यांची वृत्ती द्विधा होती. आयुष्यात कधीच त्याना कोणत्या वेळी काय करावे याचा निर्णय करता येत नसे. हा आंतरिक बेशिस्तीचा परिणाम होता. ज्यांना असा निर्णय घेता येत नाही ते निर्णय देणाराच्या शोधात् असतात. कोस्सलर याला अपवाद नव्हते. त्याना अशी आशा वाटत होती की कम्युनिस्ट पक्षात आपण शिरलो तर आपला हा प्रश्न सुटेल. कम्युनिस्ट पक्ष कर्मठ धार्मिक संघटनांप्रमाणे काम करतो. धार्मिक संघटनामधे ज्या प्रकारे उच्चनीच अधिकारपदांची श्रेणी असते तशीच श्रेणी त्याना कम्युनिस्ट पक्षात दिसत होती. अशा उच्चनीच श्रेणीत काम करताना वरीष्ठ निर्णय घेतात आणि कनिष्ठानी ते अमलात आणायचे असतात. कम्युनिस्ट पक्षात शिरल्यास स्वतःचे निर्णय स्वतः घेण्याची आपली जबाबदारी टाळता येईल असे वाटल्यानेही ते कम्युनिस्ट पक्षात गेले असावेत. तिसरी गोष्ट अशी की कोस्सलरना अपराधगंड होता. अपराधगंडाच्या व्यक्ती शारीरिक वा मानसिक शिक्षेसाठी भुकेलेल्या असतात. स्वतःच्या हाताने स्वतःची करून घेतलेली नाचक्की, नुकसान, अप्रतिष्ठा हे अशा शिक्षांचे काही प्रकार. कम्युनिस्ट पक्षात शिरून कोस्सलरदेखिल स्वतःच स्वतःला शिक्षा करून घेत होते. एका चांगल्या आर्थिक, सामाजिक परिस्थितीतून ते अत्यंत कनिष्ठ दर्जाच्या परिस्थितीत स्वतःच्या इच्छेने जात होते. कम्युनिस्ट पक्षातला त्यांचा प्रवेश ही त्यांच्या दृष्टीने त्यानी स्वतःला दिलेली शिक्षा होती.

तेव्हा त्यांच्या कम्युनिस्ट पक्ष प्रवेशामागचे हे सुद्धा कारण देता येईल. चवथी गोष्ट, मानसिकदृष्ट्या कोस्सलर एकाकी होते. एकाकी व्यक्ती इतर माणसांची संगत शोधतात. माणसांच्या संगतीत त्यांचा एकाकीपणा कमी होतो. माणसांची अशी संगत कोस्सलरना ते व्हिएन्ना येथे शिकत असताना मिळाली होती. व्हिएन्नात ते द्वंद्वयुद्ध संघाचे सभासद झाले होते. पुढे व्हिएन्ना सोडून ते पॅलेस्टाइनमधे गेले. परंतु तेथेही त्याना समविचाराचे कोणी भेटले नाही. आता कम्युनिस्ट पक्षात गेल्यावर परत एकदा आपण समविचाराच्या माणसात जाऊ आणि आपला एकाकीपणा कमी होईल असे वाटल्यानेही ते त्या पक्षात गेले असावेत. एवंच कोस्सलर कम्युनिस्ट पक्षात गेले त्याला इतकी बाह्य आणि आंतरिक, म्हणजे कोस्सलर यांच्या स्वभावाशी संबंधित कारणे दाखविता येतील.

कोस्सलर कम्युनिस्ट पक्षातच का गेले, अन्य दुसऱ्या कोठल्या पक्षात का गेले नाहीत या प्रश्नाचे आणखीसुद्धा एक उत्तर संभवनीय आहे. कम्युनिस्ट तत्त्वज्ञान चिरेबंदी आणि सर्वसमावेशक तत्त्वव्यूहाच्या जातीचे आहे. कोस्सलरसारख्या लोकांना, की ज्यांना कोठल्याही महत्त्वाच्या प्रश्नावर ठाम निर्णय घेता येत नाही जे सदोदित घड्याळाच्या लंबकाप्रमाणे एकदा या दिशेला तर दुसऱ्यांदा त्या दिशेला फेऱ्या मारत असतात, त्याना सर्वसमावेशक व्यूह त्रात्यासारखे वाटतात. पण सर्वसमावेशक चिरेबंदी व्यूह म्हणजे कशा प्रकारचे व्यूह ? प्रारंभबिंदू आणि तात्पर्यबिंदू ज्या व्यूहांचा एकाच ठिकाणी असतो त्याना चिरेबंदी व्यूह म्हणता येईल. चिरेबंदी व्यूह निर्णय घेण्याची जबाबदारी कमी करतात. कारण जीवनातल्या, मग ते जीवन एका व्यक्तीचे असो वा राष्ट्राचे नि समाजाचे असो, प्रत्येक प्रश्नावर तेथे उत्तर असते. हे उत्तर अंतिम स्वरूपाचे असते. म्हणजे त्याच्यावर शंका वा प्रतिप्रश्न संभवत नाही. व्यूहाच्या परिघात वास्तव्य करून त्या परिघाला आव्हान देणारे प्रश्न तेथे विचारताच येत नाहीत. आपण आताच म्हटले की, सर्वसमावेशक तत्त्वव्यूह कोठल्याही प्रश्नावर अंतिम स्वरूपाची उत्तरे देतात. ही उत्तरे अंतिम स्वरूपाची असल्याने ती प्रत्यक्ष अनुभवाशी ताडून पाहाता येत नाहीत. उदा. मार्क्सवाद सांगतो की इतिहास एका विशिष्ट वाटेने दरकूच दरमजल करीत पुढेपुढे जात आहे आणि शेवटी तो अमक्या ठिकाणी पोहोचणार आहे. आता हे उत्तर पुराव्याच्या पलिकडच्या गृहीतकृत्यावर आधारित आहे. इतिहास याच वाटेने चालला आहे हे तपासायचे कसे ? ते तपासता येत नाही, म्हणून तो अमुकच मुक्कामाला पोहोचणार आहे हेही उत्तर तपासता येत नाही. मुद्दा असा की चिरेबंदी व्यूह जी भाकिते करतात, जी उत्तरे देतात ती त्या व्यूहांच्या परिघात राहून तपासता येत नाहीत. ही भाकिते तपासायची, उत्तरे तपासायची, तर त्यासाठी त्या व्यूहाच्या बाहेर यावे लागते नि हे व्यूह चिरेबंदी असल्याने, जोवर त्यांची प्रारंभिक प्रतिपादने वा गृहीतकृत्ये - प्रिमायसिस - तुम्ही खरी मानता तोवर त्या व्यूहातून तुम्हाला बाहेरही पडता येत नाही. कारण प्रारंभिक गृहीतकृत्य तेच तेथे तात्पर्य -

प्रतिपादनही असते. हे व्यूह सर्वसमावेशक असल्याने प्रत्येक मानवी दुःखावर आणि आपत्तीवर नि अडचणींवर त्यांच्यापाशी इलाज असतो. हे इलाज अंतिम स्वरूपाचे असतात. शिवाय व्यूह चिरेबंदी असल्याने त्याना शब्दच्छल करण्याची अफाट संधी उपलब्ध असते. प्रश्नकर्त्याने समजा अशा व्यूहाला एखादा विकट प्रश्न विचारला नि स्वतःच्या मताच्या समर्थनासाठी काही नवी माहिती सादर केली, तरी वाटेल तितका शब्दच्छल करून तत्त्वव्यूहाचे समर्थक ती माहिती त्याच जुन्या व्यूहात चपखल बसवून प्रश्नकर्त्याच्या डोळ्यात धूळ फेकू शकतात. या चिरेबंदी विचारव्यूहांचा सर्वात मोठा धोका हा की एकदा का कोणी स्वतःच्या पायांनी त्या विचारव्यूहात शिरला की त्याला बाहेर पडता येणे अशक्य होते. कारण एक प्रकारच्या बौद्धिक चक्रव्यूहातच तो अडकतो. कारण जी तात्पर्ये आणि पूर्वपक्ष - उत्तरपक्ष व्यूहात शिरताना त्याने स्वीकारलेला असतो, त्या पूर्वपक्ष उत्तरपक्षामुळे त्याची चिकित्सकबुद्धीच लुळी झालेली असते. तिसरी गोष्ट अशी की हे व्यूह आतून इतके आकर्षक भासतात की ते आकर्षण मोडून बाहेर पडणे आत शिरलेल्याच्या जीवावर येते. अशा तत्त्वव्यूहाचा नमुना म्हणून कम्युनिझमचेच उदाहरण घ्या. व्यूहात शिरल्यावर शब्दच्छल कसा केला जातो ते पुढील उदाहरणावरून पाहता येईल. "लेनिनच्या आदेशावरून १९२० साली वार्सावर स्वारी करण्यात आली ही पक्षाची चूक होती असे मत तुम्ही मांडले. तर लगेच खंदा कम्युनिस्ट लेनिनची तरफदारी करण्यासाठी पुढे सरसावेल नि तुम्हाला म्हणेल की तुमच्यातला पांढरपेशा अद्यापी जिवंत असल्याने तुम्ही हे म्हणत आहात. जर का तुम्ही वर्गजाणीवेतून बाहेर पडला असता तर तुम्ही असे बोलला नसता. तुम्ही वर्गजाणीवेतून बाहेर पडला नसल्याने तुम्हाला अद्याप स्वतंत्र विचारशक्ती आणि निर्णयशक्ती प्राप्त व्हावयाची आहे. जोवर ती प्राप्त होत नाही तोवर पुढारी सांगतील तेच हिताचे मानले पाहिजे वगैरे, वगैरे. थोडक्यात असे की कोठलाही चिरेबंदी विचारव्यूह त्या व्यूहात शिरणाऱ्याला वस्तुनिष्ठ आणि निष्पक्षपातीपणे विचार करण्यापासून संपूर्णपणे परावृत्त करतो. शब्दच्छल करून तुमचा पुरावा तेथे उलट्याच्या पालटा करण्यात येतो किंवा तुम्हाला एखादा खाजगी हेतू चिकटवून तुमचे तोंड बंद केले जाते. म्हणजे समोरच्या प्रश्नाला डावलून उत्तरे दिली जातात. चिरेबंदी विचारव्यूहांचे खेळाचे स्वतःचे स्वतंत्र नियम असतात नि त्या नियमांच्या आत राहूनच तो खेळ तुम्हाला खेळता येतो. जोवर खेळ खेळणारा त्या नियमांच्या परिघात वावरतो तोवर त्याला त्या नियमांची तर्कविसंगता जाणवत नाही आणि तर्कविसंगता न जाणवल्याने मागील अंकावरून खेळ पुढे चालूच राहातो."

चिरेबंदी व्यूहांचा आणखी एक विशेष सांगता येईल. या व्यूहांच्या आतले वातावरण भावनिकदृष्ट्या अतिशय उत्तेजित आणि उत्तेजकही असते. साहजिकच जो कुणी अशा प्रकारच्या व्यूहांमधे प्रवेश करतो तो आपोआपच त्या वातावरणाच्या

प्रभावाखाली येऊन अत्यंत उत्तेजित बनतो. स्वतःच्या बुद्धीवरचा आणि भावनांवरचा ताबा घालवितो. व्यूह दाखवील तीच तेवढी दिशा त्याला खरी वाटू लागते. तो व्यूहाच्या म्हणजेच व्यूहाचे जे कुणी प्रवर्तक, प्रवक्ते असतात त्यांच्या ओंजळीने पाणी पिऊ लागतो. त्याच्या व्यूहाने दिलेल्या संथेप्रमाणे पोपटपंची करू लागतो, वाद घालू लागतो. शिकाऊ उमेदवाराना याच शिकवणुकीची संथा देऊ लागतो. पक्षासाठी नवे नवे उमेदवार मिळविण्यासाठी फिरू लागतो. कारण चिरेबंदी पक्षात सामील झालेल्या प्रत्येकाला असे वाटते की पक्षासाठी नवे उमेदवार गोळा करणे हे आपले एकमेव जीवितकार्य आहे. जीवनाच्या त्या विशिष्ट टप्प्यावर अनेक प्रकारच्या मानसिक गंडांनी कोस्सलर पछाडलेले होते. त्याना न्यूनगंड त्रास देत होता. त्याना अपराध भावना त्रास देत होती. त्याना एकाकी वाटत होते. थोडक्यात त्या विशिष्ट वयात कोस्सलर बौद्धिक आणि भावनिक आधार शोधत होते आणि मानवी अस्तित्वाच्या प्रश्नावरची अंतिम उत्तरे ही शोधत होते आणि अशावेळी त्यांच्या आयुष्यात कम्युनिस्ट तत्त्वज्ञान आणि कम्युनिस्ट पक्ष अवतरला. पक्ष आपल्या सगळ्या प्रश्नांची उत्तरे देईल नि आपले प्रश्न सोडवील असे त्याना वाटू लागले नि त्यानी पक्षात प्रवेश करायचे ठरविले. खुद्द कोस्सलर स्वतः गणित या विषयाचे भक्त आणि भोक्ते होते. अस्तित्वावरच्या अंतिम प्रश्नांची उत्तरे ते गणिताकडून अपेक्षित होते. गणित ही उत्तरे देईल आणि ही उत्तरे अखेरची व अबाधित असतील. निदान तशी ती असावी असेही त्याना वाटत होते. अशा वेळी कम्युनिस्ट पक्ष व कम्युनिस्ट तत्त्वज्ञान त्यांच्या जीवनात आले. कम्युनिस्ट पक्षाचा असा दावा होता की आपण तत्त्वज्ञान आणि प्रत्यक्ष व्यवहार यांची सांगड घातली आहे. विशुद्ध विज्ञान अणि व्यवहारात उतरविलेले विज्ञान यांची जशी सांगड घातली गेलेली असते तसे. दुसऱ्या शब्दात कम्युनिस्ट पक्ष आणि तत्त्वज्ञान दोघेही असा दावा करीत होती की कम्युनिस्ट तत्त्वज्ञान एक प्रकारचे शास्त्रीय ज्ञान असून कम्युनिस्ट पक्ष हा ते ज्ञान अमलात आणण्याचे हत्यार आहे. तत्त्वज्ञान आणि व्यवहार - थेअरी अँड प्रॅक्टिस - ही दोन्ही एकरूप झाली आहेत. ज्या द्विधा मनस्थितीत कोस्सलर तेव्हा होते त्या मनस्थितीमुळे कम्युनिस्ट पक्षातला प्रवेश ही त्याना आयुष्यातली फार मोठी पर्वणी वाटली तर नवल नाही. कारण जगाचे काय होणार आणि आपण काय केले पाहिजे इत्यादी ज्या प्रश्नांवर त्यांना उत्तरे हवी होती किंवा थोडक्यात म्हणजे आपले आयुष्य वाहून घेण्यासाठी कार्यक्रम हवा होता तो कार्यक्रमच कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाच्या आणि व्यवहाराच्या रूपाने पुढे आला होता. कम्युनिस्ट तत्त्वज्ञान आणि पक्ष पाहून त्याना असे वाटले की सिद्धांत आणि व्यवहार, विज्ञान आणि मानवी श्रद्धा, विचार आणि आचार, व्यक्ती आणि समुदाय या मानवी जीवनातील प्रत्येक द्वंद्वाचा येथे उत्तम प्रकारे मेळ घालण्यात आला आहे आणि हे वाटताच कोस्सलर कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाच्या सापळ्यात अडकले.

कम्युनिझमच्या चिरेबंदी आणि सर्वसमावेशक तत्त्वज्ञानाचे कोस्सलरना उत्पन्न

झालेले आकर्षण इतके तीव्र होते आणि अशा प्रकारच्या बौद्धिक व भावनिक दिलासा देऊ शकणाऱ्या तत्त्वज्ञानाची नि कार्यक्रमाचीही त्यांची निकड इतकी प्रखर होती की, हा हा म्हणता ते त्या तत्त्वज्ञानाला शरण गेले नि स्वतःला विसरले. कारण कम्युनिस्ट पक्षात शिरताच लगेच त्याना कम्युनिस्ट पक्षाच्या वतीने रशियन जनतेच्या स्थितीची पहाणी करण्याच्या कामावर धाडले गेले. तेथे त्यानी संपूर्ण रशिया पायाखाली घातला. परंतु तेथील जनतेच्या स्थितीचे म्हणून 'आखों देखा हाल' नावाखाली दौऱ्याचे जे अहवाल त्यानी धाडले तो म्हणजे एक विनोदी फार्सच होता. रशियातल्या लोकस्थितीचे निरीक्षण करण्यासाठी कोस्सलर जेव्हा रशियाभर हिंडत होते तेव्हा रशियन शेतीव्यवसायाच्या सामुदायिकीकरणाचे स्टॅलिनमहाशयांचे प्रयोग अगदी ऐन भरात आले होते. त्यामुळे या भागातले शेतकरी दुसऱ्या भागात नेऊन टाका, खाजगी शेतीच्या जमिनी जप्त करा, विरोध करणाऱ्या शेतकऱ्यांचे शिरकाण करा, सामुदायिक शेतीच्या कल्पनेस लोकांनी पाठींबा द्यावा म्हणून देशात कृत्रिम दुष्काळ पाडा, असा जो एककलमी कार्यक्रम स्टॅलिनमहाशयांनी सुरू केला होता तो तेव्हा अखेरच्या पर्वात आला होता. स्टॅलिनमहाशयांच्या या प्रयोगामुळे रशियावर तेव्हा आर्थिक अरिष्ट ओढवले होते. जनता हवालदिल झाली होती. लाखोंच्या संख्येने रशियन जनता हालहाल होऊन मरत होती. मानवी यातनांना तर मर्यादाच उरली नव्हती. परंतु या दारुण आणि करुण दृश्यांपैकी सर्वत्र हिंडणाऱ्या कोस्सलरना काहीही दिसले नाही. त्यानी ते पाहूनही त्याना दिसले नव्हते. वस्तुतः त्या रशियाभेटीत या टोकापासून त्या टोकापर्यंत ते रशियावर फिरले होते. युक्रेनमधल्या खास्कोव्हपासून ते जॉर्जिया, आर्मेनिया, अझरबैझान, कॉकेशसचा संपूर्ण प्रदेश आणि तुर्कस्थान-अफगाण सीमांपासून, ते थेट बोखारापर्यंत ताश्कंद, समरकंद आणि काझिगिस्थानपर्यंत संपूर्ण रशियात ते मुक्तपणे फिरले. या प्रदेशात शेकडो, हजारो, लाखो माणसे तहान आणि भुकेने व्याकूळ होऊन मृत्यूची वाट पहात रस्तोरस्ती पडून होती. दुष्काळाची तीव्रता तर इतकी प्रचंड होती की काही काही भागात नरमांस खाण्यापर्यंत माणसांची मजल गेली होती. परंतु कोस्सलरना यापैकी काहीही दिसू शकले नाही. प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहून देखिल गरीब जनतेच्या यातना त्यांच्या हृदयापर्यंत पोहोचू शकल्या नाहीत. आगगाडी, आगबोट, मचवा, घोडा, स्वतःचे पाय हरप्रकारचे वाहन वापरून कोस्सलर रशियाभर हिंडले होते. जेथे जेथे ते गेले तेथे तेथे मानवी दुराग्रह आणि मानवी पराक्रम याच्यातून निर्माण झालेली दुःखे आणि यातना त्यांची वाट पाहात होती. परंतु त्याना मात्र त्यापैकी काहीही दिसले नाही. स्टॅलिनमहाशयांच्या लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशी लक्षावधी निरपराध जनतेला तिच्या जन्मगावातून हाकलून काढण्यात आले होते नि जेथे तिचा टिकाव लागला नसता अशा रोगराईच्या प्रदेशात पिटाळण्यात आले होते. तेथे ती मनुष्ये कल्पनेतही येणार नाही असे दुःख भोगत होती, यातना सहन करीत होती. परंतु इतके असून सुद्धा कोस्सलरना त्याची यत्किंचितही

खंत वाटली नाही वा कम्युनिझमच्या 'आश्वासित स्वर्गलोकामधे' आपण पदार्पण करीत आहोत या त्यांच्या विश्वासालासुद्धा तडा गेला नाही. कम्युनिझमच्या तथाकथित थोरपणाचे, कम्युनिझम कधीच चूक करणार नाही या ठाम विश्वासाचे जे जाड कातडे त्यांनी आपल्या डोळ्यावर घेतले होते, त्या कातड्यातून प्रत्यक्षातले दाहक वास्तव जणू त्यांच्या मेंदूपर्यंत पोहोचूच शकत नव्हते. रशियातली वस्तुस्थिती कम्युनिझमच्या मोटेपणाबद्दल आणि उपयुक्ततेबद्दल भ्रमनिरास व्हावा अशी असताना सुद्धा कोस्सलर यांचा मात्र भ्रमनिरास होऊ शकला नाही व त्यांच्या देवानेही त्याना दगा दिला नाही.

थोडक्यात आपण असे म्हणू शकतो की कोस्सलर जरी संपूर्ण रशियाभर फिरले होते तरी ते एखाद्या भ्रमात असल्यासारखे फिरले होते नि त्यामुळे त्यांचा दौरा रशियाभर फिरूनसुद्धा न फिरल्यासारखा झाला होता. किंवहुना नंतरच्या काळात खुद्द कोस्सलर स्वतःच कबूल करतात की तेव्हाच्या रशियासंबंधी त्यानी धाडलेली वार्तापत्रे एखाद्या पगारी नि पोटार्थी बातमीदाराने धाडावी तशी होती. प्रत्यक्षात रशियामधे खरोखर जे काही घडत होते त्यातले एक अक्षरदेखिल त्या वार्तापत्रांमधे आलेले नव्हते. मात्र त्याचवेळी ते असेही म्हणतात की रशियात त्या क्षणी जे काही खरोखर चालले होते त्यातील एक अक्षरसुद्धा जरी त्यांच्या वार्तापत्रांमधे प्रतिदिंवित झाले नव्हते आणि कम्युनिस्ट विचारप्रणालीची ढापणे डोळ्यावर लावल्याने ते घडले होते, तरी रशियातल्या वस्तुस्थितीची नोंदच त्यांच्या मनाने घेतली नाही असे मात्र नव्हे. त्यांच्या अंतर्मनाने ही नोंद घेतली होती आणि कम्युनिझमच्या उपयुक्ततेबद्दल त्यांच्या मनात खोल कुठेतरी संशयसुद्धा उत्पन्न झाला होता. परंतु संशयाच्या त्या बीजाचा वृक्ष होऊन त्याला फळे धरण्यासाठी आणखी अनेक वर्षे उलटावी लागली होती.

१९३३ च्या उन्हाळ्यात कोस्सलरनी रशिया सोडला. दरम्यान जर्मनीत हिटलर सत्तेवर आला होता. रइस्टाग आगीचे प्रकरण घडून गेले होते आणि कम्युनिस्ट पक्षाला घाईघाईने भूमिगत व्हावे लागले होते. किंबहुना देशातला एक मातब्बर आणि सुसंघटित राजकीय पक्ष हे त्याचे पूर्वीचे स्थानही त्या पक्षाला गमवावे लागले होते. केवळ एकाच वर्षापूर्वी या पक्षापाशी ६,०००,००० च्या वर नोंदलेले सभासद होते. याचा अर्थ पक्षाला तेवढे पाठबळ होते. नि आता हे पाठबळ जणू वाऱ्यावर उडून जावे तसे उडून गेले होते. पक्षाची पुरती वाताहात झाली होती. परंतु पक्षाने मात्र शाब्दिक कसरत करून पक्षाचा हा पराभव नगून ती डावपेचात्मक माघार आहे अशी हाकाटी सुरू केली.

अॅडॉल्फ हिटलरच्या नव्या जर्मनीत कोस्सलरना जागा नव्हती. रशियातून माघारी आल्यानंतरची त्यांची वर्षे पॅलेस्टाइनमधल्या वर्षासारखीच भटकेगिरी करण्यात गेली होती. कोस्सलर कम्युनिस्ट पक्षाचे काम करीत होते. पक्षाचे ते एकनिष्ठ, सच्चे,



अनुक्रमणिका

क्रियाशील वगैरे, वगैरे सभासद होते. त्यांच्यावर पक्षाने सोपविलेल्या कामगिऱ्या ते इमानेइतबारे करीत होते. परंतु मनात खोल कुठेतरी पक्षाच्या सच्चेपणाबद्दलचा त्यांचा विश्वास ढळला होता. पक्षाच्या तत्त्वज्ञानातून ज्या कडव्या सांप्रदायिक निष्ठा त्यानी अंगावर घेतल्या होत्या त्यांच्याबरोबर त्यांचा आंतरिक झगडा सुरू होता. त्या दिवसात कोस्सलर पक्षकार्य करीत होते. तथापी अंतर्मनाने दिलेल्या धोक्याच्या इशाऱ्यामुळे असेल पण पक्षाच्या पगारी चाकरीत शिरण्याचे मात्र त्यानी शिताफीने टाळले होते. त्यांचे संपूर्ण आयुष्य पक्षाशी बांधले गेले होते. परंतु ज्या बूर्झ्वा, पांढरपेशा वर्गाचे जन्माने ते सभासद होते, त्या पांढरपेशा वर्गापासून फुटून दूर गेल्याने त्याना कायम स्वरूपाची नोकरी करता येत नव्हती.

१९३३ ते १९३६ ही वर्षे कोस्सलरनी पॅरिस शहरात काढली. ही सगळी वर्षे त्यानी अत्यंत दारिद्र्यावस्थेत घालवली. कधी अर्धपोटी तर कधी उपाशीसुद्धा त्याना रहावे लागले. रात्री डोके टेकण्यापुरतीही हक्काची जागा त्यांच्यापाशी त्या काळात नव्हती. परंतु हाच काळ दुसऱ्या एका अर्थाने त्याना चांगलाही गेला. खूप लांबलेली त्यांची पौगंडावस्था आता संपुष्टात आली. त्यांच्या मनाची द्विधावस्था हळूहळू कमी होऊ लागली. स्वतःबरोबरचा त्यांचा झगडा मिटू लागला आणि स्वतःच्या आयुष्याचे खरे ध्येय त्याना सापडले. पत्रकारिता नव्हे, तर लेखन हेच आपल्या जीवनाचे खरे ध्येय आहे हे त्याना उमजले नि खऱ्या अर्थाने कोस्सलरनी तारुण्यात पदार्पण केले. कोस्सलर यांच्या बाबतीत घडलेला प्रकार ज्यांच्या अंगात काही विशेष गुण आहेत अशा अनेकांच्या बाबतीत घडलेला दृष्टीस पडतो. अशा लोकांची पौगंडावस्था खूप लांबते. त्याना मनाचा निश्चय करता येत नाही. आयुष्यात काय व्हावे या बाबतीत त्यांचे मन द्विधा असते. एक मन म्हणते तू अमका हो, तर त्याच वेळी त्यांचे दुसरे मन म्हणते तू तमका हो आणि या मानसिक झगड्यात अनेक वर्षे खर्ची पडतात. सामान्य लोकांना मी कोण, माझ्या आयुष्याचे प्रयोजन कोणते, माझे 'मी' पण कशात आहे अशा सारखे आयडेंटिटीशी - स्वतःच्या अनन्य वैशिष्ट्यांशी संबंधित असणारे प्रश्न सहसा सतावितच नाहीत. साहजिकच अशा प्रश्नांमधे त्यांची शक्तीसुद्धा वेचली जात नाही. सर्वसामान्य मनुष्यप्राण्यांना असले व्यक्तिवैशिष्ट्याशी निगडीत प्रश्न पडत नाहीत. याचे कारण सामान्य मनुष्ये धोपटमार्गी असतात. एकाच वेळी अनेक कर्तृत्वक्षेत्रे यश देऊ शकतील असे गुणविशेष त्यांच्या ठिकाणी कधीही नसतात. ज्यांच्या अंगी असे गुणविशेष असतात त्याना एका वेळी एकापेक्षा जास्त कर्तृत्वक्षेत्रे खुणावतात आणि त्यांचे मन द्विधा बनते. सामान्य मनुष्य आयुष्य देईल त्याच्यावर सुखी व समाधानी असतो. स्वतः होऊन आयुष्याकडे तो कधीही काही मागत नाही. कोस्सलर सामान्यात मोडत नव्हते. ते असामान्यात मोडत होते. त्यांच्या अंगी अनेक

प्रकारच्या क्षमता होत्या. ते उत्तम पत्रकार होऊ शकले असते. ते श्रेष्ठ दर्जाचे शास्त्रज्ञ होऊ शकले असते. ते ललित लेखक होऊ शकले असते किंवा उत्तम शास्त्रीय लिखाण करणारेही होऊ शकले असते. एका वेळी इतक्या विविध प्रकारच्या क्षमता त्यांच्या ठिकाणी उपजत होत्या. परिणामी त्यांचे मन अंतर्गत झगड्यात व्यग्र बनले नि या झगड्यात आयुष्याची पहिली अनेक वर्षे वाया गेली. तारुण्यात पदार्पण करण्यास त्याना खूप विलंब झाला. पण आता त्याना आयुष्याचे खरे ध्येय सापडले होते. आपण जन्माने लेखक आहोत, पत्रकार नव्हे हे त्याना उमजले होते.

तथापी आपण जन्माने लेखक आहोत, केवळ पत्रकार नाही हे जरी कोस्सलरना जाणवले तरी त्यामुळे त्यांच्या दैनंदिन आयुष्यात फारसा बदल घडून आला नव्हता. त्यांच्या कार्यक्रमावर पक्षाच्याच ध्येयधोरणाचा पगडा चालू होता. १९३४ मधे इतर राजकीय पक्षांकडे पाहाण्याचा स्वतःचा दृष्टिकोन कॉमिन्टर्नने बदलला. कॉमिन्टर्न ही कम्युनिस्ट पक्षाची मध्यवर्ती संस्था - थर्ड कम्युनिस्ट इंटरनॅशनल. ही संस्था मास्को येथे १९१९ च्या मार्च महिन्यात स्थापण्यात आली आणि कम्युनिस्ट पक्षाचे अधिकृत ध्येयधोरण व कार्यक्रमाची आखणी करण्याचे काम या संस्थेकडे दिले गेले. (जून १९४३ मधे ही संस्था अधिकृतपणे बरखास्त केली गेली.) तर १९३४ मधे कॉमिन्टर्नने आपले धोरण बदलले. पूर्वी इतर राजकीय पक्षांबरोबर सहकार्य करावयास कॉमिन्टर्नची बंदी असे. पण आता या धोरणाला मुरड घालण्याचे ठरविण्यात आले. समविचाराच्या आणि समान ध्येयधोरणे असणाऱ्या सगळ्या पुरोगामी आणि क्रांतीकारक पक्षांनी एकत्र येऊन संघटितरीत्या फॅसिझमशी मुकाबला केला पाहिजे असे आता ठरविले गेले. एका शब्दात, फॅसिझमविरुद्ध जनता आघाडी उघडण्याचा निर्णय घेतला गेला. विली म्युअझेनबर्गला त्या आघाडीचे प्रमुख करण्यात आले.

कोस्सलरना भेटलेल्या कम्युनिस्ट म्होरक्यांपैकी म्युअझेनवर्गबद्दल कोस्सलरनी काहीशा कौतुकाने लिहिले आहे. मुअझेनबर्ग हा जनता आघाडीचा सर्वात कर्तबगार म्होरक्या होता. पश्चिम युरोपातली कम्युनिस्ट आघाडी तो सांभाळत असे. बुद्धीने अतिशय तल्लख, संभाषणचतुर, दुसऱ्यावर सहज छाप पाडू शकणारा, राजकीय चळवळी उभारण्यात चतुर. असा हुरहुन्नरी गृहस्थ होता. राजकीय चळवळ्यांमधे त्याचा क्रमांक खूप वरचा लागला असता. मुअझेनबर्गला देशोदेशीच्या राजकारणाची उत्तम माहिती असल्याने युरोपमधील कोठल्याच कम्युनिस्ट पक्षाला त्या त्या देशाच्या राजकारणात कसलेही स्थान नाही हे चांगले ठाऊक होते.

या परिस्थितीत पक्षाचा कार्यक्रम कसा रेटायचा आणि सोव्हिएट युनियनचा प्रचार व राजकारण कसे साधायचे हा त्याच्यापुढे मोठाच प्रश्न होता. या अडचणीतून

मार्ग काढण्यासाठी म्युअझेनबर्गने एक शक्कल लढविली. वरवर कम्युनिस्ट पक्षाशी अजिबात संबंध नाही असे दाखविणाऱ्या परंतु प्रत्यक्षात कम्युनिस्ट पक्षाच्या पूर्ण नियंत्रणाखाली काम करणाऱ्या अनेक संस्था त्याने स्थापन केल्या. लोकशाही पुरोगामित्व आणि फॅसिझमविरोध या दोन गोष्टींना युरोपात खूप मान असल्याने, याच विश्वासाचा आधार घेऊन म्युअझेनबर्गने या संस्था काढल्या होत्या. समाजातील अनेक भोळीभाबडी, उदारमतवादी मंडळी या संस्थांमधे उत्साहाने सामिल झाली. पुरोगामी कलावंत, पुरोगामी लेखक संघ, लोकशाहीवादी वकीलांचा संघ, पुरोगामी व श्रमिक महिला मंडळ, सोव्हिएट मैत्री संघ, लोकशाहीवादी युवक संघ, फॅसिझम विरोधी आघाडी, वैज्ञानिक आघाडी, वैज्ञानिक क्षेत्रात काम करणारांची संस्था, जागतिक शांतता परिषद, पुरोगामी सिनेकलावंत यासारख्या अनेक संस्था एखादे पेव फुटावे तशा एकोणिसशेतिशीत निघाल्या. पण या कल्पनेचे जनकत्व मुअझेनबर्गकडे जाते. या संस्थांबरोबरच अनेक वृत्तपत्रे काढण्यात आली. या प्रचारतंत्राला अनेक भले भले बळी पडले होते. पंडित जवाहरलाल नेहरू हे त्यापैकी एक. या साऱ्या संस्था कम्युनिस्ट पक्षाच्या तालावर चालत. या संस्थांचे पुढे काय झाले ते सर्वांना ज्ञात आहेच. असो.

म्युअझेनबर्गला कॉमिन्टर्नने आय. डब्ल्यू. ए. किंवा इंटरनॅशनल वर्कर्स एड (आंतरराष्ट्रीय कामगार मदत संघटना) आणि अॅगिटप्रॉ किंवा अॅगिटेशन अँड प्रॉपगंडा (कम्युनिझमचा प्रचार करणारे आणि राष्ट्रराष्ट्रांमधे तेथल्या प्रस्थापित सरकारांविरुद्ध लोकक्षोभ घडवून आणण्याचे काम करणारे खाते) या दोन्ही खात्यांचा संयुक्त प्रमुख नेमले. प्रमुख बनताच फॅसिझमविरुद्धच्या प्रचाराची म्युअझेनबर्गने अगदी धमाल उडवून दिली. संधी सापडेल तेथे आणि तेव्हा त्याने प्रचार चालविला. त्यासाठी ठिकठिकाणी त्याने आपल्या आघाड्या उघडल्या. म्युअझेनबर्गने एकट्याच्या जीवावर एकोणीसशेतीशीत हे जे काम केले त्याला राजकीय क्षेत्रात तोड नाही असे म्हणता येईल. मिळेल तेथे त्याने प्रचार आघाडी उघडली होती; एवढेच नव्हे तर प्रचारसुद्धा विविध प्रकारचा चालविला होता. या प्रकारचा राजकीय प्रचार कसा करावा याचा तो नमुनेदार वस्तुपाठच म्हणता आला असता. या जातीच्या उद्योगांचा म्युअनझेनबर्गला आद्य-जनक म्हणता येईल, इतके त्याचे ते उद्योग कल्पक आणि चातुर्यपूर्ण होते. एकोणिसशेतिशीतली फॅसिस्ट विरोधी मोहिम हा जणू काही एकट्या म्युअझेनबर्गने एक नवा शोध होता.

१९३४ ते १९३६ या कालखंडात म्युअझेनबर्ग आणि ऑटो काझ ऊर्फ आन्द्रे सीमाँ हा त्याचा सहाय्यक या दोघांबरोबर कोस्सलर पक्षाचे काम करीत होते. हे दोघेही पक्षाचे समर्पित कार्यकर्ते होते. पक्षाचे भक्तच म्हणा ना ! या दोघांबरोबर अगदी जवळून पक्षाचे काम करावे लागल्याने, कम्युनिस्ट पक्षाला ज्यांनी वाहून घेतले आहे अशा



अनुक्रमणिका

कम्युनिझमवादी क्रांतीकारकांची बुद्धी कशी काम करते, तसेच कम्युनिझम भक्तांची कम्युनिझमवरची उत्कट आणि अव्यभिचारी निष्ठा, पक्षकार्यासाठी स्वतःचे प्राण वेचण्याची असलेली त्यांची तयारी, पक्षकार्यासाठी खऱ्या खोट्याची चाड न बाळगण्याकडे असणारा त्यांचा ओढा ही कम्युनिस्ट नीतीची तिन्ही वैशिष्ट्ये सुद्धा त्याना जवळून पाहाता आली. एवंच म्युअझेनबर्ग आणि ओटो काझ यांच्या बरोबर फॅसिझमविरोधी प्रचारमोहिमेत काम केल्यामुळे सच्चा कम्युनिस्ट क्रांतिकारी अनुयायाची पक्षकार्यासंबंधी बुद्धी कशी चालते, नि एकूण कम्युनिस्ट नीतीचे स्वरूप कसे असते या दोन्ही गोष्टींचे सखोल आकलन कोस्लरना झाले. फॅसिझमविरोधी निशाणाखाली ज्यांना लढायचे होते त्यांना संघटित करण्याचे, त्यांचे साहाय्य मिळविण्याचे, त्यांच्याबरोबर पक्षाची युती घडवून आणण्याचे अशी विविध प्रकारची कामे म्युअझेनबर्गवर सोपविण्यात आली होती आणि ते काम तो यशस्वीपणे पार पाडीत होता. यातला विनोद हा होता की जेव्हा फॅसिझमविरोधी आघाडी चालविण्यासाठी म्युअझेनबर्ग यशस्वीपणे खपत होता, तेव्हा त्याचवेळी सोव्हिएट युनियनमधे कॉ. स्टॅलिन कम्युनिस्ट पक्षाच्या सर्वांगीण शुद्धीकरणाची - द ग्रेट पर्जची - मोहीम उघडत होता. यातला विनोद हा की लोकशाही मूल्याच्या नावाने फॅसिझमविरोध संघटित केला जात होता, नि जो पक्ष हा विरोध संघटित करीत होता तोच पक्ष आपल्या देशात लोकशाहीविरोधी वर्तन करीत होता. महान पक्षशुद्धीकरण संहाराचा प्रारंभ १९३४ मधल्या किरॉव्ह या पक्षपदाधिकाऱ्याच्या खुनाने झाला. किरॉव्ह हा (१८८६-१९३४) महत्त्वाचा सोव्हिएट कम्युनिस्ट. लेनिनग्राड कम्युनिस्ट पक्ष संघटनेचा प्रमुख (१९२६). पॉलिटब्युरोचा (पक्षाचे धोरण ठरविणारे सत्ताकेंद्र; पॉलिटब्युरोने ठरविलेले धोरण पक्षाला बंधनकारक असते) सदस्य (१९२६). एका तरुण कम्युनिस्टाने किरॉव्हचा खून केला नि त्या संधीचा फायदा घेऊन स्टॅलिनने पक्षशुद्धीकरणाची मोहीम उघडली. क्रुश्चेव्हनी सूचित केल्याप्रमाणे हा खून खुद्द स्टॅलिननेच घडवून आणला होता. कम्युनिस्ट पक्षात किरोव्ह प्रबळ होऊ लागला होता नि स्टॅलिनच्या क्रौर्याला त्याचा विरोध होता म्हणून स्टॅलिनने त्याचा काटा काढला. नि परत किरॉव्हच्याच खुनाचे निमित्त करून आणि पक्षातील दगलबाज लोकांचा बंदोबस्त करायचा आहे असे दाखवून तथाकथित पक्षविरोधकांवर खटले भरण्याची मोहीम त्याने उघडली नि विरोधकांचे शिरकाण सुरू केले. ही प्रथा पुढे सगळ्या कम्युनिस्ट देशात आणि पक्षात जारी राहिली.

पक्षाचा प्रचार करण्यासाठी आणि पक्षाचे राजकारण संपूर्ण युरोपभर पुढे रेटण्यासाठी ज्या म्युअझेनबर्गने जीवाचे रान केले त्याचाही शेवट डार्कनेसमधल्या रुबाशॉव्हप्रमाणेच झाला हा आणखी एक विशेष. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात रशियन गुप्त पोलिसांनी म्युअझेनबर्गला गोळी घालून ठार केले आणि इतिहासातून त्याचे नाव पुसून टाकण्यासाठी प्रयत्न केले.



अनुक्रमणिका

पक्षशुद्धीकरणाच्या नावाने पक्षातल्या स्वतःच्या विरोधकांना यमसदनास पाठविण्याचे हे जे सत्र कॉ. स्टॅलिन यानी सोव्हिएट युनियनमधे एकदा सुरू केले, त्याचा एक उत्तम परिणाम असा झाला की लोकशाही आणि मानवी स्वातंत्र्याचे आम्हीच पाठीराखे व त्राते आहोत, पुरस्कर्ते आहोत असा जो गवगवा सोव्हिएट युनियन करीत होती त्यात सत्य किती हे या खटल्यांमुळे बाहेर आले.

३१ ऑगस्टला मॉस्को येथे राष्ट्रीय खटल्यांच्या मालिकेतील पहिली मालिका सुरू झाली नि १९३८ मधील बुखारिनवरच्या खटल्यात तिंची परिणती झाली. बुखारिन (१८८८-१९३८) हा सोव्हिएट कम्युनिस्टांमधला एक अत्यंत महत्त्वाचा कम्युनिस्ट. वयाच्या अठराव्या वर्षापासून त्याने बोल्शेव्हिक विचारसरणी स्वीकारली होती. खुद्द लेनिनच्या मताने पक्षातील तर तो एक वरच्या दर्जाचा सिद्धांतकार व म्हणून पक्षाच्या दृष्टीने उपयुक्त असामी होताच. परंतु 'एक व्यक्ती म्हणूनही तो पक्षाच्या गळ्यातला ताईत होता.' लेनिनच्या मृत्यूनंतर सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षामधे अंतर्गत संघर्ष झाला. प्रथम बुखारिनने पक्षातल्या 'डाव्यांच्या' विरोधात स्टॅलिनची बाजू घेतली. पुढे स्टॅलिनने स्वतःचा पवित्रा बदलला नि तो शेतीव्यवसायाचे सामुदायिकीकरण करण्याच्या मागे लागला, तेव्हा बुखारिनने स्टॅलिनच्या विरुद्ध भूमिका घेतली नि तो पक्षातील 'उजव्या' गटाचा म्होरक्या बनला. मास्को राष्ट्रीय खटल्यांच्या एकूण तीन मालिका झाल्या. त्यातील तिसऱ्या मालिकेत बुखारिनचा खटला चालला, नि विश्वासघातकी म्हणून त्याला गोळी घालून ठार करण्यात आले. सोव्हियट युनियनमधे विरोधकांवर हे जे राष्ट्रीय खटले चालविले जात होते त्यातील विपरीत विनोद हा होता की, सोव्हिएट नागरिकांवर एकीकडे हे पोलीस खटले सुरू होते तर दुसरीकडे त्याच दरम्यान म्हणजे १९३६ सालीच जगातील पहिल्या दर्जाची उदारमतवादी राज्यघटना म्हणून सोव्हिएट संघराज्याच्या नव्या राज्यघटनेचा ढोल बडविला जात होता. ही राज्यघटना तयार करण्यात बुखारिन आणि रॅडेक या दोन सोव्हिएट कम्युनिस्ट पुढाऱ्यांचे खूप श्रम खर्ची पडले होते. बोल्शेविक पक्षातले हे दोघे वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध पुढारीं. पैकी बुखारीन कोण होता हे आपण आताच वर पाहिले. आता रॅडेक (१८८५-१९३९) कोण ते पाहू. बुखारीनप्रमाणेच रॅडेक देखिल सोव्हिएट कम्युनिस्ट होय. जन्माने पोलीश. बोलशेविक पक्षाच्या प्रारंभाला त्या पक्षात जे शिरले त्यांच्यापैकी एक. १९१७ च्या फेब्रुवारी क्रांतीच्या काळात लेनिनबरोबरच रॅडेकसुद्धा रशियात आला होता. बोल्शेव्हिक पक्षाने जेव्हा रशियात सत्ता काबीज केली तेव्हा रॅडेककडे आंतरराष्ट्रीय प्रचारखात्याचे प्रमुखपद दिले गेले. पुढे त्याने स्टॅलिनच्या विरोधात ट्रॉट्स्कीची बाजू घेतली. म्हणून त्याला १९२७ साली पक्षातून काढून टाकण्यात आले. १९३० त त्याने सार्वजिनकरीत्या स्वतःची चूक कबूल केली. त्याला परत एकदा पक्षात प्रवेश दिला गेला. १९३६ च्या सप्टेंबर महिन्यात पक्षविरोधी कारवाईसाठी त्याला परत एकदा अटक झाली.



अनुक्रमणिका



(मास्को खटले - जानेवारी १९३७ - दुसरी मालिका). त्या काळात ज्यांना फासावर चढविले गेले नाही अशांपैकी रॅडेक हा एक. फाशीऐवजी त्याला दहा वर्षाचा कारावास दिला गेला. सर्क्टच्या श्रमशिबिरात त्याचा अंत झाला असे १९३९ मधे जाहीर केले गेले. तेव्हा थोडक्यात सांगायचे तर असे म्हणता येईल की, बुखारीन आणि रॅडेक दोघेही स्टॅलिनच्या पक्षशुद्धीकरण कार्यक्रमात शेवटी बळी गेले. सारांश ज्या दिवसात सोव्हिएट युनियन फॅसिस्टविरोधी पुरोगामी मध्यमवर्गियांशी हातमिळवणी करून फॅसिझमविरोधी आघाडी स्थापन करीत होती, नेमक्या त्याच दिवसात खुद्द सोव्हिएट युनियनमधे कॉ. स्टॅलिन यांची हुकूमशाही उत्तरोत्तर अधिकाधिक क्रूर आणि नृशंस बनत होती.

कोस्सलर यांचे सुदैव वा दुर्दैव, पण पक्षशुद्धीकरणाच्या नावाखाली कॉ. स्टॅलिन यानी सोव्हिएट युनियनमधे जो उत्पात चालविला होता त्याचे साक्षात दर्शन त्याना घेता आले नि मुप्तागुप्त परिणामसुद्धा पाहाता आले. कारण नेमक्या या घडामोडींच्या काळात ते कम्युनिस्ट पक्षाच्या अगदी आतल्या गोटात वावरत होते. पक्षशुद्धीकरण कार्यक्रम जसा अधिकाधिक अमानुष होत गेला तसतशी कम्युनिस्ट पक्षाची सार्वजिनक अवस्था अधिकाधिक खालावत गेली. खुद्द सोव्हिएट युनियनमधेच नव्हे तर अन्य बाहेरच्या देशातही जेथे जेथे म्हणून कम्युनिस्ट पक्ष काम करीत होता तेथे तेथे पक्षशुद्धीकरण कार्यक्रमाचे विपरीत पडसाद उमटू लागले. कारण कम्युनिस्ट पक्षाच्या छोट्यातल्या छोट्या केंद्रांनासुद्धा पक्षसफाई योजनेची झळ पोहोचली होती. तथापी याचा अर्थ पक्षशुद्धीकरणाचे दुष्परिणाम पाहून कोस्सलर यांचे डोळे उघडले होते असे नाही. तर पुन्हा एकदा जुन्याच इतिहासाची पुनरावृत्ती घडून आली होती. कारण मागे रशियातल्या भयंकर दुष्काळातल्या काळात कोस्सलर रशियात हिंडत होते, पण त्याना दुष्काळाचे भीषण परिणाम जाणवले नाहीत. आता पक्षसफाई कार्यक्रमाच्या दिवसात ते पक्षाच्या आतल्या गोटात वावरत होते, पण आताही त्याना त्या कार्यक्रमाचे भीषण परिणाम जाणवले नाहीत. कोणी एखादा जेव्हा सर्वसमावेशक चिरेबंदी तात्त्विक व्यूहामधे शिरतो तेव्हा कालांतराने तो त्या व्यूहाच्या प्रतिपादनांचा बौद्धिक बंदिवान बनतो. डोळे असून तो आंधळा असतो आणि कान असून बहिरा. त्याला डोळे असतात पण त्या डोळयांनी त्याला पाहाता येत नाही. त्याला कान असतात पण त्या कानांनी त्याला ऐकता येत नाही. त्याने स्वतःचे कान आणि डोळे पक्षाच्या तत्त्वज्ञानाशी गहाण ठेवलेले असतात. कोस्सलर याला अपवाद नव्हते. म्हणून त्याना पक्षशुद्धीकरण कार्यक्रमाचे अत्याचार डोळयासमोर असूनसुद्धा दिसले नाहीत. पक्षात काम करता करता देहाने आणि मनाने ते पक्षाचे बनले होते नि पक्षाच्या तात्त्विक चौकटीने त्यांच्या बुद्धीचा व भावनेचा संपूर्ण कब्जा घेतला होता. पक्षाविना आपण जिवंत राहू शकणार नाही असे वाटण्याइतके ते परावलंबी झाले होते. त्यानी धारण केलेल्या चिरेबंदी भूमिकेमुळे रशियातला 'दुष्काळ' आणि रशियातला 'पक्षसफाई कार्यक्रम' दोन्हीपैकी

एकाचाही परिणाम त्यांच्या मनावर झाला नाही आणि पक्षातून बाहेर पडावे असेही त्याना वाटले नाही. या दोन्ही घटनांनंतर आणखी बरेच वर्षे ते कम्युनिस्ट पक्षात काम करीत होते. पक्षावरची त्यांची भक्ती यत्किंचितही कमी झाली नाही.

कम्युनिस्ट पक्षावरच्या त्यांच्या श्रद्धेवर आघात करील असा आणखी एक प्रसंग जवळपास याच काळात घडून आला. पण त्यांच्या निष्ठेने तोही आघात पचविला. १८ जुलै १९३६ रोजी स्पेनच्या जनरल फ्रॅन्कोने देशात यादवी युद्धाचा झेंडा उभारला. त्याला स्पेनची सत्ता काबीज करायची होती. स्पेनमधे तेव्हा प्रजासत्ताक राजवट होती आणि प्रस्थापित सरकार वैध मार्गानी सत्तेवर आले होते. पण फ्रॅन्कोला ते पाहवले नाही. त्याने यादवी युद्ध सुरू केले होते. स्वतःचे स्वातंत्र्य आणि लोकशाही जपण्यासाठी स्पॅनिश जनतेने फ्रॅन्कोचा कडवा प्रतिकार केला. आतल्या नि बाहेरच्या दोन्हीकडच्या शक्ती स्पेनचा घात करू पाहात होत्या नि स्पॅनिश जनता त्याला तोंड देऊ पाहात होती. आधुनिक युरोपच्या इतिहासाचा विचार करता असे म्हणावेसे वाटते की फ्रॅन्कोने सुरू केलेल्या यादवी युद्धाचे परिणाम दोन प्रकारचे झाले होते. एका बाजूने हे परिणाम 'ट्रॅजिक' म्हणता आले असते. तर दुसऱ्या बाजूने अनपेक्षित आणि विचित्र असेही त्याना म्हणता आले असते. स्पॅनिश जनतेच्या वतीने लढण्यासाठी अनेक देशातून तरूण लोक स्पेनकडे धाव घेत होते. 'चिल्ड्रेन्स क्रूसेड' या नावाखाली ही तरूण मंडळी एकत्र आली होती. यादवी युद्धाचा उपयोग फॅसिझमच्या यशस्वी घोडदौडीला खीळ घालण्यासाठी होऊ शकेल असे या तरुणांना वाटत होते आणि जर का फॅसिझमला आपण रोखू शकलो तर येऊ घातलेले महायुद्ध आपण टाळू शकू अशी आशा त्याना वाटत होती. स्पॅनिश जनता आपले स्वातंत्र्य टिकविण्यासाठी लढत होती. देशोदेशीची तरुण मंडळी फॅसिझमला विरोध करण्यासाठी लढाईत भाग घेत होती. तर सोव्हिएट युनियन आणखी वेगळ्याच कारणासाठी फ्रॅन्कोबरोबरच्या युद्धात उतरत होती. सोव्हिएट युनियनला क्रूसेडचे नेतृत्व हवे होते. क्रूसेडचे नेतृत्व मिळताच क्रूसेड सोव्हिएट युनियनच्या ताब्यात येऊ शकत होती. क्रूसेड ताब्यात येताच सोव्हिएट युनियनला स्वतःचे राजकारण पुढे रेटता येणार होते. सारांश यादवी युद्धाची संधी साधून सोव्हिएट युनियनला स्वतःचे परराष्ट्रीय धोरण राबवायचे होते नि शेवटी स्पेनवर सोव्हिएट युनियनची मक्तेदारी लादायची होती.

कम्युनिस्ट पक्षातल्या हजारो अन्य पक्षसदस्यांप्रमाणेच खुद्द कोस्तलर देखिल स्पॅनिश क्रूसेडमधे भाग घेण्यासाठी तिकडे धावले होते. तेथे धावून आलेल्या अन्य स्वयंसेवकांप्रमाणेच त्यानाही खात्रीपूर्वक वाटत होते की स्पेनमधील यादवी युद्धही कम्युनिस्ट पक्षाला मिळालेली अखेरची संधी आहे. एक म्हणजे फॅसिझमचा पराभव करण्याची संधी आणि दोन कम्युनिस्ट पक्ष सध्या घायाळ झालेला दिसत असला तरी

फॅसिझमचा पाडाव करण्याची शक्ती एकट्या त्याच पक्षापाशी आहे हे सिद्ध करण्याची संधी. तथापी खुद्द स्पेनमधे पक्षाच्या धोरणात जुन्याच विसंगती दिसून होत्या. पक्षाने चालविलेला जाहीर प्रचार एका प्रकारचा होता तर प्रत्यक्ष व्यवहार मात्र दुसऱ्याच प्रकारचा होता. येथेही पक्षाच्या व्यवहारात जुनाच दुटप्पीपणा आढळत होता. नीतीवादी अभिनिवेश आणि तुच्छतावादी ढोंग यांचे पूर्वीचेच मिश्रण आताही तेथे होते. जर्मनी आणि सोव्हिएट युनियन या दोन्ही ठिकाणी पक्षाचे जे विकृत आणि उफराटे तर्कशास्त्र दिसून आले तेच आताही दिसत होते. थोडक्यात असे की एव्हाना कम्युनिस्ट पक्षाची इतकी नैतिक अवनती झाली होती की, पक्षातील झगड्याचा शेवट घडवून आणण्यासाठी कम्युनिस्ट पक्ष स्पॅनिश यादवी युद्धाचा फायदा उठविण्याचा प्रयत्न करीत होता. पक्षकार्यावरील निष्ठेपायी जे कुणी स्पेनमधे आले होते नि ज्यांना खात्रीपूर्वक असे वाटत होते की स्पेनमधे येऊन आम्ही पक्षाची सेवा करीत आहोत त्यांचा काटा काढण्याचे काम पक्षाने चालविले होते.

कालांतराने कोस्सलरनी कम्युनिस्ट पक्षाची आणि विचारसरणीची रजा घेतली. परंतु पक्षाचा व्यवहार दुटप्पी असतो, पक्षाची उक्ती आणि कृतीमधे प्रचंड अंतर असते, पक्षाची कृती पक्षाच्या जाहीर उक्तीचे निव्वळ विडंबन असते म्हणून नव्हे. कोस्सलर कम्युनिस्ट विचारसरणीचे कडवे अनुयायी होते आणि अशा कडव्या अनुयायांच्या बाबतीत बुद्धीला पटले म्हणून श्रद्धा सोडली असला चमत्कार कधीही घडत नसतो. कोस्सलर कम्युनिस्ट विचारसरणीचे एकनिष्ठ भक्त होते आणि कोठलाही भक्त सहजासहजी त्याच्या आराध्यदैवताचा त्याग करीत नाही. असा त्याग त्याला करताच येत नाही. कारण असा त्याग करताच त्याच्या आयुष्यात पोकळी उत्पन्न होते. संपूर्ण आयुष्य त्याला रिक्त आणि अर्थशून्य वाटू लागते. भक्तीचे आणि श्रद्धेचे सुद्धा विशिष्ट प्रकारचे मानसशास्त्र आहे आणि या मानसशास्त्राचे स्वतःचे स्वतंत्र कायदे आहेत. सगळे भक्त या कायद्यानुसार वागतात किंवा जगतात. काही विशेष प्रकारच्या मानसिक गरजांतून श्रद्धा उत्पन्न होते, मनुष्य भक्त बनतो. या गरजा संपल्या तरी श्रद्धेची गरज संपत नाही. कारण तोवर श्रद्धेची सवय लागलेली असते. त्या विशिष्ट आराध्यदैवतावर, मग हे आराध्यदैवत एखाद्या देवाची मूर्ती असेल वा कोणा पक्षाची मतप्रणाली असेल, अवलंबून राहावयास शिकलेला असतो. नि हे परावलंबित्व टाकून द्यावयास मानवी मन सहसा तयार होत नाही. एका शब्दात श्रद्धांची गरज संपली तरी केवळ सवयीने मनुष्य त्या श्रध्दांना चिकटून राहातो. एक मानसिक आधार म्हणून. खुद्द कोस्सलर यांनी स्वतःच फेथ अथवा श्रद्धा ठेवण्याच्या प्रवृत्तीचे उत्तम विश्लेषण केलेले आहे. कोस्सलर लिहितात, "एखाद्या आराध्यदैवतावरील श्रद्धा किंवा धार्मिक स्वरूपाचा विश्वास (फेथ) हा एक वेगळाच प्रकार आहे. तार्किक युक्तिवादाचा प्रभाव त्याच्यावर चालत नाही. कारण अशा प्रकारच्या युक्तिवादातून हा



अनुक्रमणिका

विश्वास उत्पन्नच झालेला नसतो. स्त्रीच्या प्रेमात पडणारा प्रेमवीर जसा बुद्धिपुरस्सर ठरवून आणि प्रयत्न करून प्रेमात पडत नाही, तसाच देवतेच्या प्रेमात पडणारा भक्त सुद्धा ठरवून व प्रयत्न करून प्रेमात पडत नाही. हे आपोआपच घडते. धार्मिक विश्वास कधीही बुद्धिपुरस्सर आणि कृत्रिम प्रयत्नांनी उत्पन्न करता येत नाहीत. धार्मिक विश्वासातून किंवा श्रद्धेतून केले गेलेले कृत्य बरोबर की चूक याची चिकित्सा करताना बुद्धीचा उपयोग होऊ शकतो. परंतु ती श्रद्धा उत्पन्न करताना बुद्धीचा उपयोग होऊ शकत नाही. मुळात श्रद्धा असेल तर श्रद्धेमुळे घडलेले ते कृत्य घडणार असते. श्रध्दा प्रथम, श्रध्देतून घडणारी कृत्ये नंतर हा या कृत्यांचा नैसर्गिक क्रम आहे.'' एखाद्या आराध्यदैवताच्या बाबतीत श्रद्धा कशी उत्पन्न होते याचे हे मानसशास्त्रीय स्पष्टीकरण. अशी श्रध्दा जेव्हा संपुष्टात येते, नष्ट होते तेव्हा ती कशी नष्ट होते हे आता पाहावे लागेल.

कोस्सलर स्वतः कम्युनिस्ट पक्षाचे, त्या पक्षाच्या मतप्रणालीचे भक्त होते. कम्युनिस्ट मतप्रणाली ही एक चिरेबंदी विचारव्यवस्था आहे. अशा प्रकारच्या बंदिस्त विचारव्यवस्था काम कसे करतात हे आपण आताच वर पाहिले. या विचारव्यवस्थेचे कोस्सलर भक्त असल्याने श्रद्धेचे मानसशास्त्र उमजल्यावाचून कोस्सलर यांचे वर्तनसुद्धा उमजणार नाही. बऱ्याचशा श्रध्दा प्रत्यक्षात अंधश्रद्धाच असतात. कारण त्या बंदिस्त विचारसरणींवरच्या श्रद्धा असतात. बंदिस्त विचारसरणी मोकळेपणाने प्रश्न विचारू देत नाहीत. प्रश्नकर्त्याच्या बुद्धीची कवाडेच अशा विचारसरणी बंद करून टाकतात. शब्दच्छल, शाब्दिक हातचलाखी व कसरतीही या विचारसरणी आपल्या अनुयायांना शिकवितात. बंदिस्त विचारसरणींचा अनुयायी कोठल्याही प्रश्नाची फक्त एकच बाजू - त्याला स्वतःला फायदेशीर, सोयीस्कर वगैरे असेल अशी बाजू - खरी मानावयास शिकलेला असतो. त्या विशिष्ट विचारसरणीच्या प्रवर्तकांनी पुरस्कारिलेली बाजू तेवढीच फक्त खरी बाजू अशी त्याच्या मनाची अवस्था बनलेली असते. साहजिकच कोठल्याही तात्त्विक वा अन्य प्रकारच्या प्रश्नाच्या बाबतीत असा मनुष्य होय किंवा नाही एवढ्या दोनच उत्तरावर समाधान मानतो. जग पांढरे आहे किंवा काळे आहे, ते अनेकरंगी आहे हे मत त्याला मान्य होत नाही. काळ्या–पांढऱ्यातील ही विभागणी विचारातून सिद्ध होत नाही. तो भावनांचा परिणाम असतो व म्हणून हे निष्कर्ष नेहमीच एकतर्फी असतात. बंदिस्त विचारसरणीत वावरणारी मनुष्ये विचार कसा करतात याचे एक गंमतीदार उदाहरण कोस्सलर यांनी त्यांच्या आत्मचरित्रात दिले आहे. ते लिहितात की, ''नेहमी दोन टोकात विचार करणारांची एक खास तऱ्हा आहे. कोठल्याही प्रश्नाच्या फक्त दोनच बाजू ही माणसे पाहू शकतात. कारण त्यांच्या मते कोठल्याही प्रश्नाला फक्त दोनच बाजू असतात. त्यातील एक अर्थात त्यांच्या दृष्टीने खरी असते व दुसरी खोटी. ते स्वतः खऱ्यांच्या बाजूने असतात

आणि त्यांचे प्रतिस्पर्धी खोट्याच्या. समजा ही माणसे म्हणाली की (अ) जे लोक विमानातून प्रवास करतात ते वाईट असतात; उलट (ब) जे आगगाडीने प्रवास करतात ते चांगले असतात. आता प्रश्न जे कुणी बोटीने प्रवास करतात त्यांचा येईल. अशा वेळी ही माणसे असा युक्तिवाद करतील की (अ) ज्या अर्थी हे लोक बोटीने प्रवास करतात, आकाशमार्गे नाही त्याअर्थी ते चांगले आहेत किंवा (ब) ज्या अर्थी ते जमिनीवरून प्रवास करीत नाहीत, पाण्यातून प्रवास करतात त्या अर्थी ते वाईट आहेत. ''सारांश, कुठल्याही प्रश्नाला फक्त दोनच बाजू नसतात, कित्येकदा दोनापेक्षा अनेक बाजूसुद्धा असू शकतात ही गोष्टच असे लोक विचारात घेत नाहीत. कारण त्यानी सांप्रदायिक विचारसरणीची झापडे लावलेली असतात. अशी झापडे लावलेल्यांचा आणखीसुद्धा एक विशेष असतो. वाटेल ती शाब्दिक हातचलाखी करून आपलीच बाजू कशी बरोबर आहे हे पटविण्याचा त्यांचा सतत प्रयत्न असतो.

शब्दच्छल करून आपलेच म्हणणे आणि अर्थात वागणेसुद्धा कसे बरोबर, तर्कसंगत, न्याय्य, सयुक्तिक वगैरे आहे हे पटविण्यासाठी कम्युनिस्ट पक्ष नेहमीच प्रयत्नशील असे. अशा युक्तिवादाचा एक नमुना म्हणून निरनिराळ्या काळात भांडवलशाही राष्ट्रांबद्दल सोव्हिएट रशियाने घेतलेल्या निरनिराळ्या भूमिकांचे उदाहरण कोस्सलर देतात.

सन १९३० : सोव्हिएट रशिया – श्रमिक आंतरराष्ट्रीय कामगारवर्ग विरुद्ध भांडवलशाही अथवा फॅसिस्ट जग. (भांडवलशाही शेवटी फॅसिझममधे परिणत होणार असे कम्युनिझमचे तात्पर्य. म्हणून भांडवलशाही बरोबर फॅसिस्टशाही हे समीकरण.)

सन १९४० : शांतताप्रेमी रशियन आणि जर्मन जनता विरुद्ध इंग्लंड व फ्रान्समधील अल्पसंख्यांनी चालविलेल्या लोकशाहीतले साम्राज्यवादी आक्रमक.

सन १९४१ : पशुतूल्य फॅसिझमवादी आक्रमक जर्मनी विरुद्ध लोकशाही संयुक्त राष्ट्रे (रशिया, इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका.)

सन १९५० : इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका ही साम्राज्यवादी युद्धपिपासू राष्ट्रे विरुद्ध पूर्वेकडच्या शांततावादी जनता लोकशाही. (पिपल्स डेमॉक्रसिज्)''

कम्युनिझमसारख्या बंद विचारसरणींच्या युक्तिवाद करण्याच्या पद्धतीबद्दल बोलताना कोस्सलर सांगतात की, ''या विचारसरणी परस्परविरोधी द्वंद्वांच्या भाषेत बोलतात. सुष्टता आणि दुष्टता (गुड अँड इव्हिल) किंवा प्रकाश आणि अंधार या जातीच्या परस्परांना वगळणाऱ्या द्वंद्वागतच ही द्वंद्वे असतात असे जणू भासविले जाते आणि बंद विचारसरणीच्या वर्तुळात अडकलेल्या भक्तांना ते खरे वाटते आणि याला कारण बंद

विचारसरणींचा एकूण मेकॅनिझम किंवा तंत्र . जो कुणी बंद विचारसरणींमधे जगू लागतो तो या तंत्राबरहुकूम वागू लागतो. ते तंत्र हा त्याचा दुसरा स्वभावच बनतो. त्या विशिष्ट विचारसरणीचे सत्य तेच त्याचेही सत्य असते आणि या सत्याला कोणी आव्हान दिले तर त्याला ते पटत नाही. उलटासुलटा युक्तिवाद करून आपलेच म्हणणे खरे कसे हे दाखविण्याकडे त्याचा कल असतो. सारांश, ज्याच्यावर तो श्रद्धा ठेवतो ते तो सिद्ध करून दाखवितो नि जे तो सिद्ध करून दाखवितो त्याच्यावर तो श्रद्धा ठेवतो. बंद विचारसरणी तुमच्या बुद्धीला विलक्षण धार आणू शकतात. एकदा का तुमच्या बुद्धीला ही धार आली की त्याच्या जोरावर खऱ्याचे खोटे नि खोट्याचे खरे करणे हा तुमच्या हातचा मळ असतो आणि खऱ्याचे खोटे नि खोट्याचे खरे करण्याची सवय एकदा का अंगवळणी पडली की तुमच्या हातून कोणत्याही प्रकारचा मूर्खपणा होऊ शकतो. तुमची बुद्धिमत्ता या बाबतीत तुम्हाला वाचवू शकत नाही. किंबहुना तल्लख बुद्धीचे लोकच बंद विचारसरणीच्या प्रलोभनाला सहजगत्या बळी पडतात. त्याना एकतर स्वतःच्या हुषारीची घमेंड असते आणि या घमेंडीमुळे ते अशा सापळ्यात हौशीने प्रवेश करतात. अशा पढतमूर्खांना मी 'क्लेव्हर इंबेसाईल - 'चतुर मूढमती' असे नाव देतो. या शब्दाने कोणी रागावण्याचे कारण नाही. खुद्द अस्मदिकांची गणना मी या चतुर मूढमतींमधेच करीत आहे."

श्रद्धा सहसा टाकून देता येत नाही. कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या भावनिक गरजेतून श्रद्धा निर्माण होत असतात. त्यामुळे श्रद्धा सोडून देताना त्या श्रद्धेशिवाय आयुष्य जगण्याची तयारी करावी लागते. अर्थात पूर्वीच्याच उत्कटतेने आयुष्य जगायचे असेल तर ! कोस्सलरनी श्रद्धेशिवाय जगण्याची मानसिक तयारी केली असावी असे त्यांचे चरित्र वाचल्यावर वाटते. स्पेनमधे असताना त्याना एक नवा राजकीय अनुभव आला. त्या अनुभवामुळे त्यांच्या मनाची ही तयारी झाली होती असे म्हणता येईल. स्पेनमधे चाललेल्या यादवी युद्धामधे कोस्सलरनी प्रत्यक्ष लढाऊ सैनिक म्हणून भाग घेतला नव्हता, तर वर्तमानपत्राचे बातमीदार आणि कॉमिन्टर्नचे हेर म्हणून ते तेथे वावरत होते. विली म्युअझेनबर्ग याने ही सगळी व्यवस्था केली होती. कारण स्पेनमधे कोस्सलरनी काय करायचे, कसे वागायचे याची योजना म्युअझेनबर्गने आखायची होती. त्याने त्याना 'न्यू क्रॉनिकल' आणि 'पेस्टर लॉइड' या दोन वर्तमानपत्रांमधे अधिकृत बातमीदार म्हणून काम मिळवून दिले. पैकी 'न्यू क्रॉनिकल' इंग्रजी पत्र होते तर 'पेस्टर लॉइड' बुडापेस्टी. 'न्यू क्रॉनिकल' उदारमतवादी होते, तर 'पेस्टर लॉइड' काहीसे प्रतिगामी होते. म्युअझेनबर्गने जरी ही योजना आखली होती तरी तसे करताना त्याने फारशी काळजी घेतलेली नसावी. कारण स्पेनमधे पाऊल टाकल्यापासून केवळ पाच महिन्यांच्या अवधीत म्हणजे १९३७ च्या फेब्रुवारी महिन्यात फ्रॅन्कोच्या लोकांनी कोस्सलरना पकडले नि फाशीची शिक्षा

टांगवली. एकूण तीन महिने त्याना तुरुंगाच्या कोठडीत काढावे लागले. या तीन महिन्यातील प्रत्येक दिवस त्यानी आपल्याला आज फाशी होणार, उद्या फाशी होणाार अशा प्रकारे मृत्यूची वाट पहाण्यात घालविले. अखेरीस त्याना फाशी न होता कैद्यांच्या अदलाबदलीत सोडून गेले. रिपब्लिकनांच्या कबजातील एका फ्रेन्को कैद्याच्या बदल्यात कोस्लरना माफी मिळाली होती. इंग्लंडमधील प्रागतिक आणि उदारमतवादी शक्तींनी आणि विली म्युअझेनदर्गच्या प्रचारयंत्रणेने प्रचाराची जी झोड उठवून दिली होती त्याचे ते फलित होते.

'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीचा नायक रुबाशॉव्ह रशियातल्या तुरुंगकोठडीत मृत्यूची वाट पाहात असताना ज्या प्रकारच्या अनुभवातून जातो, त्याच्याशी सेवेयच्या तुरुंगातील मृत्यूची वाट पाहाताना कोस्लरना आलेले अनुभव मिळतेजुळते आहेत. सेवेयच्या तुरुंग कोठडीत कोस्लरना आलेला अनुभव अतिशय महत्त्वपूर्ण होता. मात्र कम्युनिस्ट पक्षाच्या नैतिक भ्रष्टाचाराचा व ऱ्हासाचा नवा पुरावा त्यातून मिळत होता म्हणून नव्हे, तर 'मार्क्सवादी विचारसरणीच्या' (आयडिऑलॉजी ही संज्ञा येथे विशेष अर्थाने वापरण्यात आली आहे. वरवर सुसंगत परंतु खऱ्या अर्थाने तर्कविसंगत आणि कच्ची मतप्रणाली या अर्थाने ही संज्ञा येथे वापरलेली आहे.) बंद दाराआड वावरत असताना ज्या भावना, जे मनोविकार, ज्या प्रवृत्ती, जी दृश्ये आजवर बाहेरच्या बाहेर रोखून धरली गेली होती ती एकाएकी जोर करून वर त्यांच्या जाणिवेत आली. या एका बाबतीत कोस्लर आणि रुबाशॉव्हच्या अनुभवात कमालीचे साम्य आहे. दोन्ही ठिकाणी हे अनुभव एकाएकी वर आले होते किंवा त्यांचा जणू स्फोट झाला होता. इतकी वर्षे हे सर्व विचार, या सगळ्या भावना मनाच्या आत, खोलवर खाली पडून होत्या, बळेच दडपून ठेवल्या गेल्या होत्या. कारण कोस्लर नि रुबाशॉव्ह हे दोघेजण ज्या विचारव्यूहांचे बंदी होते त्या विचारव्यूहाशी त्यांची सांगड घालता आली नसती.

आता कोणी असेही म्हणेल की कोस्लर आणि रुबाशॉव्ह ज्या अनपेक्षित आणि विचित्र मानसिक प्रसंगात सापडले होते त्याचा तो परिणाम होता. कसलाही हासभास नसताना त्या दोघांना पोलिसांनी अटक केली होती. त्याना एकांत कोठडीत डांबले होते. मृत्युदंडाची शिक्षा फर्मावली होती आणि हे सर्व इतक्या अवचितपणे केले गेले होते की, त्याचाच मानसिक धक्का बसून त्यांना तो विशिष्ट अनुभव आला होता. दुसऱ्या शब्दात, त्यानी आपले विचार, भावना वगैरे दडपून ठेवल्या होत्या नि विशिष्ट प्रसंगाच्या निमित्ताने त्या दडपलेल्या भावना आणि ते विचार उचंबळून वर आले होते हे खरे नसून, त्या दोघांवर एकाएकी जो घोर प्रसंग गुदरला होता त्या असाधारण मानसिक प्रसंगाचा तो परिणाम होता. कोणी सांगावे, कदाचित तसेही असेल. मानसिक अवस्थेवर मानवी अनुभवांची

सत्यासत्यता जोखता येत नाही. तसेच ज्या विशिष्ट परिस्थितीत एखादा अनुभव जन्म घेतो त्या परिस्थितीवरसुद्धा त्या अनुभवाची सत्यासत्यता अवलंबून नसते. मानवी अनुभवाची सत्यासत्यता त्या विशिष्ट अनुभवाची परीक्षा करूनच ठरविता येते. कोस्सलर–रुबाशॉव्हना त्या अनुभवामुळे एक नवी मर्मदृष्टी मिळाली आहे. ही मर्मदृष्टी जर का खरी ठरली तर ज्या विचारव्यूहाच्या आधाराने आजवरचे त्यांचे जीवन त्यानी घालविले होते या विचारव्यूहाला धक्का बसणार होता. तो विचारव्यूह कोलमडून पडणार होता. तुरुंगाच्या कोठडीत बंद होऊन पडलेल्या कोस्सलर–रुबाशॉव्हना आता एक नवाच प्रश्न छळू लागला होता. तुरुंगात येऊन पडताच पक्ष, पक्षाची भूमिका, पक्षाचे नेतृत्व या सर्वांच्या प्रामाणिकपणाबद्दल कोस्सलर-रुबाशॉव्हना संशय वाटू लागला होता. त्यांच्या पुढची शृंगापत्ती ही होती की हा संशय खरा ठरला तर पक्ष आणि पक्षाचे म्होरके खोटे, लबाड ठरत होते. बरे पक्ष आणि पक्षाचे म्होरके खोटे ठरले तरी त्याजबरोबर असेही ठरत होते की कोस्सलर-रुबाशॉव्हना झालेली शिक्षा योग्य आणि न्याय्यच आहे. अर्थात ज्या कारणासाठी पक्षाने व पक्षाच्या म्होरक्यांनी त्यांच्यावर केस लादली होती त्या कारणासाठी नव्हे. कारण पक्षाच्या म्होरक्यांनी त्यांच्याविरुद्ध पक्षद्रोह आणि देशद्रोहाचा आरोप ठेवला होता; नि हा आरोप बनावट, खोटा होता. परंतु कम्युनिझमची विचारसरणी पूर्ण पटली म्हणून मोठ्या निष्ठेने त्यानी जे पक्षकार्य आजवर केले होते त्यात त्यानी इतरांची आणि मुख्य म्हणजे स्वतःची पूर्ण फसवणूक केली होती. या फसवणुकीसाठी ती शिक्षा त्याना न्याय्य वाटत होती. असा हा विचित्र पेच कोस्सलर-रुबाशॉव्हपुढे आज उभा राहिला होता. सैवैयाच्या तुरुंगात कोस्सलर जेव्हा डांबून पडले होते तेव्हा कोस्सलरना पहिली गोष्ट जर कोणती पटली होती तर ही की आपणास दिली गेलेली शिक्षा अमानूष आहे. पण तरीही योग्य आहे. 'आपल्या हातून जो गुन्हा झाला त्यासाठी हीच शिक्षा हवी होती. आपण स्वतःची वंचना केली. जो आपला स्वभाव नव्हे तो आहे असे भासवून नाना प्रकारची चुकीची कृत्ये आपण केली. आता त्या पापाची फेड म्हणून झाली ती शिक्षा मुकाट्याने भोगणे हेच योग्य आहे. आपण कम्युनिस्ट पक्षात सामिल झालो. पक्षाने दिलेले आदेश चुकीचे होते तरी पाळले. पक्षाच्या म्होरक्यांनी ज्यांचा काटा काढावयास सांगितला त्यांचा काटा काढण्यासाठी मदत केली. बऱ्यावाईटाचा, न्यायान्यायाचा विचार केला नाही. हे सर्व आपल्या खऱ्या स्वभावाच्या विरुद्ध आहे. आता आपल्याला मृत्यूदंडाची शिक्षा दिली गेली आहे. आपण जे चुकीचे जगलो त्यासाठी ही शिक्षा योग्यच आहे. ही आपण केलेल्या पापाची फेड आहे.' असे कोस्सलर–रुबाशॉव्हचे तर्कशास्त्र.

काही व्यक्तींवर तुरुंगवासाचा परिणाम अगदी अनपेक्षित असा होऊ शकतो. कोस्सलर–रुबाशॉव्हची केस त्यापैकी आहे. तुरुंगवास घडताच अशा व्यक्ती पश्चात्ताप



अनुक्रमणिका

करू लागतात. केल्या कर्माची खंत करू लागतात. त्याना आपल्या कर्माची उपरती होऊ लागते; नि त्या स्वतःच्या कृत्यांचा स्वतःपाशी झाडा देऊ लागतात. अशा वेळी कधी कधी असेही घडते की त्याना झालेली कैदेची शिक्षा चुकीच्या कारणासाठी झालेली असते. ज्या कृत्यासाठी ती शिक्षा झालेली असते ते कृत्य त्यानी केलेलेच नसते. परंतु इतर दुष्कृत्ये त्यानी केलेली असतात नि त्यासाठी त्याना आजवर कधी जबाबदार धरले गेलेले नसते. अशा वेळी जेव्हा कधी त्याना शिक्षा होण्याचा प्रसंग येतो, तेव्हा जरी त्या खेपेस ते शिक्षेला पात्र नसतात तरी जुन्या गुन्ह्यांसाठी होत आहे ही शिक्षा योग्य आहे अशी त्यांची भावना होते. कोस्सलर अशा व्यक्तींमधे मोडतात. आपल्या हातून गुन्हा घडलेला आहे नि 'त्या गुन्ह्याची भरपाई करणे हे माणूस आपले कर्तव्य आहे' असे वाटून रुवाशॉव्हला जो प्रचंड मानसिक आनंद होतो त्याची चव खुद्द कोस्सलर यानी सेवेयच्या तुरुंगात ते जेव्हा अडकून पडले होते तेव्हा घेतली होती.

श्रद्धाभंग होतो तेव्हा नेमके काय होते या कथेचा इतिहास फार दीर्घ आणि गुंतागुंतीचा आहे. कम्युनिस्ट पक्षावरची कोस्सलर यांची श्रद्धा भंगली ती १९३३ या वर्षी. पण कम्युनिस्ट पक्षाच्या सदस्यत्वाचा अधिकृत राजीनामा त्यानी दिला तो १९३८ साली. या श्रद्धाभंगाच्या पाठीमागे स्पेनमधल्या कारावासाचा खूप मोठा वाटा असला पाहिजे यात शंका नाही. स्पेनमधल्या कारावासाने कोस्सलर यांच्यासाठी आणखी देखिल दुसरी एक गोष्ट घडवून आणली होती. वर वर पाहता आनुषंगिक वाटणारी, पण बारकाईने विचार करता त्या घटनेशी जवळून निगडीत असलेली. आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता राजकीय कार्यकर्ता ही नसून लेखक ही आहे हे त्याना कारावासाच्या घटनेने शिकविले. आपण सर्जनशील लेखक होऊ शकतो, आपल्या ठिकाणी तो गुण आहे याचा प्रत्यय त्याना कारागृहात असताना आला. १९३४ ते १९३८ या दरम्यानचे अनेक व्यवधाने सांभाळून त्यानी आपली पहिली कादंबरी लिहून प्रसिद्ध केली होती. कादंबरीचे नाव 'द ग्लॅडिएटर्स'. ही कादंबरी रोमन काळातील गुलामानी केलेल्या बंडाच्या हकिकतीवर आधारीत होती. स्पार्टाकस हा त्या बंडाचा गुलाम म्होरक्या. याच स्पार्टाकसवरून जर्मन कम्युनिस्ट पक्षाने स्पार्टाकसबंड हे नाव स्वतःसाठी घेतले होते. १९३८ त कोस्सलरनी स्पॅनिश टेस्टॅमेंट ही दुसरी कादंबरी प्रसिद्ध केली. स्पेनमधल्या अनुभवावर ती आधारलेली होती. 'डायलॉग्ज विथ डेथ' हा याच कादंबरीचा एक भाग. तुरुंगात असताना त्याना जो गूढ साक्षात्कारी अनुभव आला त्याला ते 'ओसियानिक रिव्हिलेशन' असे नाव देतात. 'ओसियानिक रिव्हिलेशन' म्हणजे हे संपूर्ण विश्व अर्थपूर्ण आहे, त्याला स्वतःचे अंगभूत प्रयोजन आहे हा अनुभव होय.

त्याच वर्षाच्या मार्चमधे बोल्शेव्हिक ओल्ड गार्ईडस्‌वरचे बोल्शेव्हिक पक्षाच्या

प्रारंभिक आधारस्तंभांवरचे जगप्रसिद्ध खटले सुरू झाले. कॉमिन्टर्नचा अध्यक्ष निकोलस बुखारीन, खिश्चन राकोव्हस्की, क्रेस्टिन्स्की, रायकोव्ह आणि सोव्हिएट पोलीस सुरक्षा दलाचा किंवा जी. पी. यु. चा प्रमुख यागोदा हे सर्व त्या खटल्यात आरोपी होते. यागोदावरचा पोलीस खटला हा तर महान पक्षशुद्धीकरण कार्यक्रमातील हास्यास्पदतेचा अंतिम कळसच होता. रिडक्शो अॅड अॅव्सर्डम. या शेवटच्या खटल्यात सर्व संदंधितांची अशी पूर्ण खात्री पटवून देण्यात आली की बोल्शेव्हिक पक्षाची अगदी पहिली पहिली नेतेमंडळीच फक्त परक्या राष्ट्रांसाठी काम करणारी राष्ट्रघातकी गुप्तहेर आणि राष्ट्रद्रोही नव्हती, तर ज्याने त्याना पकडून त्यांच्यावर पोलीस खटले दाखल केले नि ते खटले चालविले तो पोलीसप्रमुख हा सुद्धा त्यांच्यातलाच एकजण होता. 'भर मध्यान्हीचा अंधार' ही संपूर्ण कादंवरी म्हणजे या ऐतिहासिक प्रक्रियेचे वाङमयीन प्रतिरूपण. १९३८ च्या उन्हाळ्यात कोस्सलरनी ही कादंवरी लिहावयास घेतली आणि १९४० च्या एप्रिल महिन्यात म्हणजे फ्रान्स देशावरच्या जर्मनीच्या आक्रमणाच्या केवळ एक महिना आधी त्यानी ती पूर्ण केली. दरम्यान फ्रेंच पोलिसांकडून कोस्सलरना अटक होऊन सोडूनही देण्यात आले होते. फ्रान्सचा पाडाव झाल्यावर इंग्लिश खाडी ओलांडून त्यांनी ब्रिटनमधे प्रवेश केला. तेथे ते ब्रिटिशांकडून पकडले गेले व त्याना पेन्टोन्व्हिलच्या तुरुंगात ठेवण्यात आले. कादंदरीची पेज-प्रुफे त्यानी तुरुंगात तपासली. या कादंबरीच्या लेखनाचा हा थोडक्यात इतिहास.

'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीचे मुख्य वैशिष्ट्य असे की ही कादंवरी कोस्सलर यांच्या पूर्वायुष्यावर तर आधारीत आहेच, परंतु त्याच वेळी ज्या राजकीय व सामाजिक वातावरणामधे त्यानी आपले पूर्वायुष्य घालविले होते, त्या आयुष्याचेही प्रतिबिंब तिच्यात उमटले आहे. कादंवरीची सुरुवात एका फॅन्टसीने होते. ही फॅन्टसी रुवाशॉव्ह म्हणजे कादंवरीचा नायक रंगवीत असतो. त्याच्या डोक्यात पक्षाच्या नि देशाच्या नंबर एक वद्दलच विचार खेळत आहेत आणि नंबर एक जसा आहे तसा तो कशामुळे वनला आहे या प्रश्नाचे उत्तर त्याला हवे आहे. नंबर एकच्या आयुष्यावर कोठकोठल्या बाह्य घटकांनी परिणाम केला हे तो शोधत आहे. रुबाशॉव्हच्या डोळ्यासमोर एक शिक्षक आहे. या शिक्षकाने फळ्यावर बीजगणितातल्या समीकरणासारखे एक समीकरण मांडलेले असते. समीकरणामधे एक विाशिष्ट कालखंडातील, एका विशिष्ट देशातील जनतेची भौतिक परिस्थिती मांडलेली असते. समीकरणाकडे बोट दाखवून शिक्षक बोलत असतो की, 'नागरिकजनहो, समीकरणाच्या या बाजूला जे दिसत आहेत ते त्या ऐतिहासिक प्रक्रियेवर परिणाम करणारे वस्तुनिष्ठ घटक होत. या घटकांनी ती विशिष्ट प्रक्रिया घडवून आणली.' नंतर तोच शिक्षक नंबर एकच्या मेंदूच्या चित्राकडे वळतो आणि नंबर एकच्या मेंदूच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या उंचवट्यांकडे बोट दाखवून म्हणतो की, 'या इथे तुम्हाला

त्या वस्तुनिष्ठ घटकांचे व्यक्तिनिष्ठ पडसाद दिसत आहेत. विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकामध्ये पूर्व युरोपमधे सर्वंकषसत्तावादाचा जो विजय घडून आला त्या विजयाला हे वस्तुनिष्ठ पडसाद कारण झाले होते.'

(येथे थोडक्यात सर्वंकषसत्तावादी (टोटॅलिटॅरिअन) आणि एकाधिकारशाहीवादी (ऑथॉरिटॅरिॲनिझम) राजवटींच्या स्वरूपातला फरक समजावून घ्यावा लागेल. या दोन्ही राजवटी एकच नव्हेत. या दोन्ही राजवटींच्या आचारविचारात तसे वरेचसे साम्य अर्थातच आहे. परंतु काही मूलभूत स्वरूपाचा फरक देखिल आहे. उदा. या दोन्ही राजवटींना राजकीय विरोध अजिबात खपत नाही. परंतु एकाधिकारशाहीला राजकीय विरोधाचे जरी वावडे असले तरी राजकीय स्वरूपाच्या चळवळींपासून दूर राहाणाऱ्या सामाजिक व अन्य संस्थांना आणि सामाजिक क्षेत्राला स्वतंत्रपणे काम करू देणास या राजवटींचा नकार नसतो. राजकीय चळवळींपासून दूर रहाणाऱ्या संस्थांना सरकारी नियंत्रणास तेथे तोंड द्यावे लागत नाही. याच्या अगदी उलट परिस्थिती सर्वंकषसत्तावादी राजवटींमधे पाहावयास सापडते. सर्वंकषसत्तावादी राजवटींमधे कोठल्याच परिस्थितीत सामाजिक व अन्य संस्थांना वा क्षेत्रांना स्वतंत्रपणे काम करू दिले जात नाही. मग त्या संस्था वा ती क्षेत्रे राजकीय चळवळींमधे भाग घेत असोत वा नसोत. सर्वांना सरकारी तावेदारीला तोंड द्यावे लागते. याचे कारण असे की एकाधिकारशाहीपेक्षा सर्वंकषसत्तावादी राजवटींची राजकीय भूमिका अगदी वेगळी आहे. सर्वंकषसत्तावादी राजवटींना देशातील प्रत्येक राजकीय वा सामाजिक व्यवहार एका निश्चित व पूर्वनियोजित आराखड्याखाली आणायचा असतो. हा राजकीय आराखडा सर्वसमावेशक असल्याने देशाचे प्रत्येक अंग एका केंद्राखाली आणण्याकडे त्याची प्रवृत्ती असते. साहजिकच सर्वंकषसत्तावादी राजवटी आपल्या देशात कोणालाच कसल्याही प्रकारचे हालचालीचे स्वातंत्र्य देऊ इच्छित नाहीत. सर्वंकषसत्तावाद या शब्दाबद्दल येथे सांगण्यासारखी आणखी एक गोष्ट अशी की मूळात जेव्हा हा शब्द तयार केला गेला तेव्हा तो आताप्रमाणे निंदाव्यंजक नव्हता. हा शब्द मुसोलिनीने प्रथम शोधून काढला. फॅसिस्ट क्रांतीचे होकारात्मक प्रयोजन स्पष्ट करण्यासाठी त्याने हा शब्द काढला होता. सर्वंकषसत्तावादी व्याख्या करताना तो म्हणतो की, "शासनाच्या विरुद्ध काही असता कामा नये, शासनावाचून काहीही होता कामा नये. शासनाच्या बाहेर काहीही घडता कामा नये" ("नथिंग अगेन्स्ट द स्टेट, नथिंग विदाऊट द स्टेट, नथिंग आउटसाइड द स्टेट").

प्रस्तुत कादंबरीमधे अशा प्रकारे व्यक्तिनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ दोन्ही प्रकारचे घटक आले आहेत. कादंबरी समजून घेताना हे दोन्ही घटक वेगवेगळे ठेवावे लागतील. मात्र त्यात अडचण एकच आहे. ज्या विलक्षण कलात्मक कौशल्याने कोसलर यानी हे



अनुक्रमणिका

घटक एकजीव बनविले आहेत त्या कौशल्यावर मात करून ते वेगळे करता येणे प्रायः अशक्य आहे.

या कादंबरीमधे जी सामग्री वापरली गेली आहे तिच्यापैकी बरीचशी खुद्द कोस्सलर यांच्या स्वतःच्या अनुभवातून आली आहे, तर उरलेली त्यांच्या मित्रांच्या अनुभवातून त्यानी घेतली आहे. येथे एक गोष्ट नमूद करावी लागेल आणि ती ही की एकोणिसशे तिशीत रशियामधे जी एक शोकात्मिका घडत होती तो अपवाद नव्हता, तर तो नियम होता. पक्षातल्या कुणा एकट्यादुकट्याच्या वाट्याला आलेले ते दुर्दैव नव्हते. पक्षातील सर्वच थरांना त्या शोकात्मिकेची झळ लागली होती. रुबाशॉव्हचा खटला उघड्यावर चालला. सरकारी प्रसिद्धीत  चालला. पण अशा एका रुबाशॉव्हच्या उघड खटल्यामागे हजार गुप्त खटले तेव्हा घडून आले होते. या गुप्त खटल्यातच कोस्सलर नि त्यांच्या सहकाऱ्यांवरचे खटले होते. हे खटले अंधारात चालले नि शिक्षासुद्धा अंधारातच दिली गेली. शिवाय ज्या सरकारी खटल्याना भुसभुशीत का होईना पण काही ना काही राजकीय पुराव्याचा आधार होता, अशा एका खटल्यामागे असे हजार दुसरे खटले होते की ज्यांना असा कसलाही आधार नव्हता. कम्युनिस्ट पक्ष आणि रशियन जनता या दोहोंवर स्वतःची अघोरी महत्त्वाकांक्षा आणि एकतर्फी वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी स्टॅलिनने जी क्रूर आणि महाभयंकर यंत्रणा तयार केली त्या यंत्रणेच्या मनमानी कारभाराचेच ते सर्व प्रताप होते.

रशियन भूमीवर ही जी शोकात्मिका वठविली जात होती त्या शोकात्मिकेला दोन अंक होते. एक अंक 'ग्रेट फमिन' अथवा 'रशियातला भीषण दुष्काळ' या नावाचा आणि दुसरा 'ग्रेट पर्ज' अथवा 'स्टॅलिननिर्मित महान पक्षशुद्धीकरण यज्ञाच्या' नावाचा. या दोन अंकांपैकी दुसरा अंक ही पहिल्याची अपरिहार्य तार्किक परिणती होती. कारण पुढे पक्षशुद्धीकरण यज्ञाच्या काळात सर्वसामान्य जनतेला दडपून टाकण्याच्या ज्या युक्त्याप्रयुक्त्या पूर्णत्वाला नेऊन वापरल्या गेल्या, त्या कम्युनिस्ट पक्षाने रशियातल्या दुष्काळाच्या काळात शोधून काढल्या होत्या. दुष्काळातल्या काळात त्या अपरिपक्व होत्या. पक्षशुद्धीकरण यज्ञाच्या काळात त्या परिपक्व झाल्या. एवढा काय तो फरक. 'भर मध्यान्हीचा अंधार' मधे ग्लेटकिन हा पोलीस अधिकारी स्वतःच फुशारकीने सांगतो की काही काही कैदी अतिशय हट्टी आणि दुराग्रही असतात. चौकशी अधिकाऱ्याशी हे कैदी अजिवात सहकार्य करीत नाहीत. पण अशाही कैद्यांना वठणीवर आणता येते आणि त्यांच्याकडून खोटे कबुलीजवाब मिळविता येतात. ग्लेटकिन सांगतो की, छळ करून खोटे कबुलीजबाब मिळविण्याची ही तंत्रे केवळ योगायोगाने आणि अपघाताने त्याला सापडली होती.



अनुक्रमणिका

रुबाशॉव्हच्या अटकेपर्यंत ही तंत्रे साधी तंत्रे राहिली नव्हती. त्यांचे रूपांतर दहशत - व्यवस्थेमधे झाले होते. त्यांची व्याप्ती आणि त्यांची भयानकता एवढ्या पराकोटीला नेण्यात आली होती की असले काही युरोपने तोवर कधीही पाहिले नव्हते. अनुभविण्याचे तर नावच नको. दहशती तंत्रांच्या बाबतीत हिटलरचे नाव घेतले जाते. पण या एका बाबतीत हिटलर स्टॅलिनच्या पासंगालासुद्धा पुरला नसता. स्टॅलिनने दहशततंत्राच्या बाबतीत जे काही साध्य केले होते तसले हिटलरच्या जर्मनीतही कोणी कधी पाहिले नसेल. राजकीय हत्यार म्हणून दहशतीचा वापर वैध (लेजिटिमेट) गणला जावा काय, हा तुरुंगात रुबाशॉव्हच्या चिंतनाचा एक प्रमुख विषय आहेच. दहशत हे राजकीय हत्यार आहे असे फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळातच ठरले होते. मार्क्स, एंगल्स व खुद्द लेनिन याही सर्वांना राजकीय चळवळीतील एक हत्यार म्हणून दहशतीची वैधता मान्य होती. तथापी पक्षसफाई कार्यक्रमाच्या दिवसात आणि त्याच्याही आधीपासून टेरर वा दहशतच नव्हे, तर शरीरिक छळालासुद्धा सरकारी मान्यता प्राप्त झाली होती आणि विरोधकांचा असा छळ करणे ही पद्धती सुप्रतिष्ठित झाली होती. ही अर्थात खास रशियन सरकारची मिरासदारी होती. पुढे नॅशनल सोशॅलिस्ट जर्मन सरकारच्या रूपाने रशियन सरकारला हौशी आणि उत्साही शिष्यवर सापडला म्हणा ! पण तोवर या क्षेत्रात फक्त सोव्हिएट सरकारचीच काय ती मक्तेदारी होती !

विरोधकांचा भयानक छळ करून त्याना वठणीवर आणायच्या तंत्राचा जनक म्हणून नेहमी स्टॅलिनचे नाव घेण्यात येते. पण या तंत्राचा खरा प्रारंभ स्टॅलिनच्याही आधी लेनिननने केला होता. कारण राजकीय विरोधकांचा बंदोबस्त करण्यासाठी चेका (CHEKA = प्रारंभी सोव्हिएट सुरक्षा सेवा, मागाहून एक्स्ट्राऑर्डिनरी कमिशन इत्यादी). या पोलीस संस्थेचा पहिला प्रमुख म्हणून डिझेर्जिन्स्कीची नेमणूक खुद्द लेनिनने केली होती. विरोधकांच्या शारीरिक व मानसिक छळाला येथून सुरुवात झाली. लेनिनच्या जन्मदिवसाचा शतकमहोत्सव साजरा केला गेला. अनेक गोष्टींसाठी लेनिनची तेव्हा स्तुती करण्यात आली. लेनिनच्या नावाने अनेक मोठमोठे दावे करण्यात आले. राजकीय मतभेद निकालात काढण्यासाठी युरोपखंडात ज्याने शरीरिक छळाचा वापर पुन्हा सुरू केला तो लेनिन, असासुद्धा एक दावा लेनिनच्या नावाने करता येईल.

तुरुंगाच्या कोठडीत बसून रुबाशॉव्ह अनेक गोष्टींचे चिंतन करीत असतो. पण त्यातही राजकीय हत्यार म्हणून शारीरिक छळाचा वापर करणे स्तुत्य की निंद्य, योग्य की अयोग्य या प्रश्नाचा तर त्याने ध्यासच घेतला होता. कारण या एका प्रश्नातून अनेक उपप्रश्न निघत होते आणि क्रांतीच्या संबंधात त्याने स्वतः जी विचारसरणी आचरली होती, त्या विचारसरणीच्या चौकटीत त्यापैकी एकाही उपप्रश्नावर त्याला अंतिम उत्तर मिळत

नव्हते. उदा. पक्षसफाईच्या दिवसात क्रमांक एकने विरोधकांचा छळ करण्याचे तत्त्व फार मोठ्या प्रमाणावर वापरले होते. आता प्रश्न असा होता की हे कशामुळे घडले होते ? क्रमांक एक मानसिकदृष्ट्या विकृत आणि परपीडनातून आनंद घेणारा होता म्हणून त्याने फार मोठ्या प्रमाणावर लोकांचा छळ केला होता की, रुवाशॉव्हने जे तत्त्वज्ञान स्वीकारले होते त्या क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचाच तो अपरिहार्य परिणाम होता ? कारण ते तत्त्वज्ञान क्रांतीला अंतिम साध्य समजते. साहजिकच या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने साधनाला काहीही नैतिक महत्त्व नाही. सर्व साधने सारख्या योग्यतेची. एका शब्दात क्रांती हेच क्रांतीचे समर्थन. क्रांतीसाठी अन्य समर्थन जरुरीचे नाही. तुरुंगाच्या कोठडीतल्या रुवाशॉव्हला प्रश्न पडतो की हे बरोबर की चूक ? पण प्रश्न तेवढ्यावर संपत नव्हता. कारण तो प्रश्न बौद्धिक नव्हता. तो प्रश्न त्याच वेळी भावनिक सुद्धा होता. जर का तो प्रश्न फक्त बौद्धिक स्वरूपाचा असता तर देशाच्या भल्यासाठी सामान्य जनतेने थोडा छळ सोसला तर त्यात बिघडले कोठे असा प्रतिप्रश्न विचारून त्याला स्वतःची समजूत घालता आली असती. परंतु तो स्वतःची अशी समजूत घालू शकत नव्हता. मग त्याला वाटले की आपले हृदय कमकुवत आहे, आपण अद्यापही पांढरपेशा नैतिक दुराग्रहाने पछाडलेले आहोत. म्हणून आपणाला जनतेच्या छळाचे दुःख होत आहे. पण तरीही त्याची समजूत पटत नव्हती. क्रांतीच्या नावाखाली गरीब जनतेचा जो छळ होत होता त्याचे त्याला वाईट वाटत राहिले. त्याच्या भावना उचंबळून आल्या होत्या नि त्या भावनाच त्याला धारेवर धरत होत्या नि त्याला विचारीत होत्या की, क्रमांक एकची कृत्ये तर्कशास्त्रदृष्ट्या आणि राष्ट्रीय विचारदृष्ट्या जरी कितीही तर्कशुद्ध आणि समर्थनीय असली तरी ज्या राजवटीमधे दहशतीला नियमाचे स्वरूप येऊ शकते, जेथे माणूसच माणसाची पूर्ण बेइज्जत करतो, त्याला अमानुष अवस्थेप्रत नेऊन सोडतो, त्या राजवटीने या जगामधे काहीतरी अत्यंत पापी, दुष्ट, पूर्वी कधीही न घडलेले, घडविले की नाही ? आणि त्याच्याबद्दल विचार करायचा की नाही? रुवाशॉव्हला पडलेला पहिला प्रश्न हा होता नि त्या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर त्याला मिळत नव्हते. पण या प्रश्नाच्या नंतरचा प्रश्न तर त्याच्या दृष्टीने आणखीच निरुत्तर करणारा होता. त्यामुळे हा प्रश्न आपणाला मुळात सुचलाच कसा याचेच आश्चर्य तो करू लागतो. तो स्वतःलाच विचारतो की आजच हा प्रश्न आपणाला का सुचावा ? इतके दिवस हा प्रश्न नि या भावना कोठे दडून होत्या ?

'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीच्या शीर्षभागी कोस्लर यानी डोस्टोव्हस्कीचे एक वाक्य उधृत केले आहे. या वाक्यात सार्वत्रिक मनुष्यवर्गाला उद्देशून डोस्टोव्हस्की बोलतो की, "दया, करुणा, अनुकंपा हे गुण जर मनुष्याच्या ठिकाणी नसतील तर मनुष्याला मनुष्य असे तरी कसे म्हणायचे ? दयेवाचून मनुष्य जिवंतच राहू शकत

नाही हे ध्यानात घे." रुबाशॉव्ह हा क्रांतीकारक आहे. अशा या क्रांतीकारकासाठी वरील वाक्याचा अर्थ काय होऊ शकतो ?

'भर मध्यान्हीचा अंधार' मधे शारीरिक आणि मानसिक छळाचे चित्रण आले आहे. शारीरिक आणि मानसिक छळाच्या प्रश्नाला या कादंबरीत अनेक कारणानी महत्त्व आहे. पहिली गोष्ट ही की सोव्हिएट सरकारची नैतिक अवनती कोठल्या थराला पोहोचली होती हे त्यावरून समजून येते. दुसरी गोष्ट ही की, तुरुंगाच्या कोठडीत रुबाशॉव्हला जे अनेक प्रश्न सतावीत होते त्यात सोव्हिएट सरकारच्या नैतिक अवनतीचाही एक प्रश्न होता. ही अवनती कशामुळे घडून आली ? तिसरी गोष्ट, शारीरिक व मानसिक छळाचा जो उल्लेख कादंबरीत आला आहे, त्या उल्लेखामुळे सोव्हिएट पोलीस खटल्यातील आरोपींनी दिलेल्या स्वखुषीच्या कबुलीजबाबांना एक नवा आणि वेगळा अर्थ प्राप्त झाला होता. छळाच्या उल्लेखामुळे या कबुलीजबाबांचे संपूर्ण स्वरूपच पालटून जात होते. या पोलीस खटल्यातील आरोपींनी जे कबुलीजबाब दिले होते त्यांच्या आधारावरच रुबाशॉव्हचा कबुलीजबाब कोस्सलरनी तयार केला आहे. 'भर मध्यान्हीच्या कादंबरीमुळे' हे कबुलीजबाब का व कसे दिले गेले याचे 'मानसशास्त्रीय' स्पष्टीकरण मिळते असे रशियाबाहेरच्या अनेकजणांना वाटते. या कबुलीजबाबांचे पूर्वी त्याना गूढ वाटत होते. कारण कबुलीजबाब देऊन आरोपी स्वतःच्या प्राणावरच पाणी सोडत होते असे नसून, प्राणापेक्षासुद्धा प्रिय असे जे नाव, स्वतःची प्रतिष्ठा ते नाव व ती प्रतिष्ठा, स्वतःबद्दलचा रास्त अभिमान या सर्वांवर बोळा फिरवित होते. 'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी वाचकाच्या ध्यानात आणून देते की हे सर्व आरोपी सच्चे कम्युनिस्ट होते. पक्षाला त्यांनी वाहून घेतले होते, आणि तसे असल्याने पक्षाचा अधिकार ते नाकारू शकत नव्हते. मग भले पक्षाची मागणी त्यांचे सर्वस्व हिरावून घेणारी का असेना ! एका दृष्टीने आरोपींनी स्वखुशीने दिलेल्या कबुलीजबाबांमागील "मानसशास्त्र" ही कादंबरी उलगडून दाखविते ही गोष्ट खरी आहे. परंतु फक्त तेवढेच खरे नाही.

कादंबरी संपता संपता ग्लेटकिनचे म्हणणे रुबाशॉव्ह मान्य करतो आणि त्याला सही असलेला कबुलीजबाब लिहून देतो. रुबाशॉव्हने दिलेल्या कबुलीजबाबामागे आपल्या बलिदानाने राष्ट्राचे अखेरीस भले व्हावे हे उद्दिष्ट आहे यात शंका नाही. परंतु केवळ एवढ्याच उद्दिष्टामुळे हा कबुलीजबाब दिला गेलेला नाही हे ध्यानात घ्यावयास हवे. रुबाशॉव्हचा जो शारीरिक आणि मानसिक छळ ग्लेटकिनने केला तो जर का त्याने केला नसता तर हा कबुलीजबाब दिला गेला नसता, ही गोष्ट कोस्सलर यानी अगदी स्पष्टपणे मांडली आहे. हा छळ कशा प्रकारचा होता ? तर रुबाशॉव्हला दिवसाचे दिवस झोपू दिले जात नव्हते. इव्हानॉव्ह या आधीच्या चौकशी अधिकाऱ्याने सोयीसवलती दिल्या होत्या

त्या काढून घेण्यात आल्या होत्या व अशा प्रकारे त्याला सतावले जाऊ लागले होते. चौकशी चालू असताना त्याच्या डोळ्यावर प्रखर शक्तीच्या विद्युत दिव्यांचा झोत पाडला जात होता. या सर्वांचा एकत्रित परिणाम होऊन रुबाशॉव्ह मोडतो आणि कबुलीजबाब देतो. किंबहुना असा शारीरिक व मानसिक छळ जर का केला नाही तर रुबाशॉव्हसारखे कडवे लोक कबुलीजबाब कधी देणारच नाहीत, असे ग्लेटकिनला खात्रीपूर्वक वाटते. नव्हे ग्लेटकिन आणि त्याच्याच विचाराचे त्याचे भाईवंद या सर्वांचे ते मुळी तत्त्वज्ञानच आहे. रुबाशॉव्ह या सर्वांना 'नवे निआंदरथल' म्हणतो. नवे निआंदरथल म्हणजे 'नवे आदिमानव'. नव्या निआंदरथलना खात्रीपूर्वक वाटते की रुबाशॉव्हसारख्या व्यक्तींना शरण आणायचे तर त्यांचा छळ करून त्याना जेरीस आणले पाहिजे. असे जेरीस आणले तरच ते वठणीवर येतील.' ग्लेटकिनच्या शस्त्रसंभारात याच्यासाठी अनेक हत्यारे अहेत, आणि समोरची व्यक्ती व परिस्थिती पाहून तो ती वापरीत असतो. ग्लेटकिनजवळची हत्यारे अनेक असली तरी उद्दिष्ट मात्र केवळ एक आहे. पक्षाचे हित पाहून ती हत्यारे वापरत राहाणे. ग्लेटकिनच्या हिशेबी मनुष्यप्राण्याचे उपयोग दोन. एक शास्त्रीय प्रयोगाकरिता वापरायची सामग्री; आणि दोन पक्षाच्या उपयोगी पडणे. ग्लेटकिनच्या तत्त्वज्ञानात मानवी आयुष्याला तिसरा अर्थ नाही.

'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीत राजकीय सत्तेने केलेला व्यक्तीचा छळ दाखविण्यात आला आहे. या छळाला तेथे विशिष्ट कार्य आहे नि अर्थही आहे. रुबाशॉव्हचा राजकीय कारणासाठी जो छळ करण्यात येतो त्या छळाच्या स्वरूपात कादंबरीतला मूलभूत तात्त्विक प्रश्नच कोस्सलर यानी अधोरेखित केला आहे. माणसासाठी माणूस साध्य आहे की साधन आहे ? कल्पनेतल्या मनुष्यजातीसाठी प्रत्यक्षातल्या मनुष्यप्राण्याचा उपयोग निर्जीव वस्तूसारखा केला जावा काय ? हा तो प्रश्न होय.

माणसाच्या हिशेबी माणूस साधन असावा की साध्य हा प्रश्न फक्त सोव्हिएट रशियापुरता मर्यादित नाही. तो अखिल मानवजातीशी संबंधित प्रश्न आहे. 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीत हा प्रश्न चर्चिला गेला असल्यानेच ही कादंबरी विशिष्ट देश आणि विशिष्ट ऐतिहासिक कालखंड ओलांडून सार्वत्रिकाच्या प्रदेशात प्रवेश करते नि कालातीत बनते. या कादंबरीची कथा एका विशिष्ट देशाशी संबंधित आहे. तिचा कालखंड हा सुद्धा विशिष्ट ऐतिहासिक कालखंडाशी संबंधित आहे आणि तरीही या कादंबरीला चिरंतनत्वाची मिती प्राप्त झाली आहे. याचे एकमेव कारण हे की या कादंबरीने उपस्थित केला गेलेला तात्त्विक प्रश्न महत्त्वाचा आहे. जगाच्या व्यवहारात माणूस साधनरूप आहे की साध्यरूप हा निव्वळ प्रश्न विचारणे म्हणजेच मानवी नीतीची किंमत तिच्या उपयुक्ततेवर ठरवावी असे सांगणे होय. माणूस साधनरूप आहे साध्यरूप नाही



अनुक्रमणिका

असे जेव्हा म्हटले जाते, तेव्हा त्याचा साधा अर्थ हा होतो की साध्य आणि साधन यांचे मूल्य ठरविता येते नि ते मूल्य घेऊन साध्य व साधनाची किंमत काढता येते आणि जगाच्या व्यवहारात साधन म्हणून माणसाची किंमत शून्य आहे. किंवा अगदी तुटपुंजी आहे. तात्त्विक विचाराने रुबाशॉव्ह मार्क्सवादी, कम्युनिस्ट आहे. त्यामुळे जागतिक व्यवहारात संपूर्ण मानवजात हिशेबात घेऊन एकट्या दुकट्या मनुष्यप्राण्याची साधन म्हणून किंमत काढली तर ती शून्य आहे या तात्पर्यापासून त्याची सुटका नाही. मार्क्सवादी कम्युनिस्ट भूमिकेप्रमाणे जागतिक इतिहासाच्या प्रक्रियेत माणसाला माणूस म्हणून, एक साधन म्हणून किंमत शून्य. खरे महत्त्व साध्याला, साधनाला नाही. एक सच्चा कम्युनिस्ट म्हणून रुबाशॉव्हला ते तात्पर्य मान्यच करावे लागणार असते आणि या तात्पर्याशी ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिन दोघेही सहमत असल्याने, या तात्पर्याशी सुसंगत असा युक्तीवाद जेव्हा ते करतात तेव्हा त्याना उत्तर द्यावयास रुबाशॉव्हपाशी शब्द नसतात. जे त्यांचे तात्पर्य तेच त्याचेही तात्पर्य आहे. ही कादंबरी काळजीपूर्वक वाचली तर असे ध्यानात येईल की कादंबरीच्या रंगभूमीवर ग्लेटकिन या हृदयशून्य पात्राचा प्रवेश होण्यापूर्वीच रुबाशॉव्हने ऐव्हानॉव्हच्या 'व्हिव्हिसेक्शन मॉरॅलिटीपुढे' शरणागती पत्करलेली आहे. 'व्हिव्हिसेक्शन मॉरॅलिटी' म्हणजे खूपजणांच्या फायद्यासाठी एकट्या दुकट्याचा बळी द्यावयास काहीच हरकत नाही असे शिकविणारी मॉरॅलिटी. अखिल मानवजातीच्या फायद्याचे काही सापडेल म्हणून आम्ही मुक्या प्राण्यांवर नाना प्रकारचे प्रयोग करतो. तेच तर्कशास्त्र ऐव्हानॉव्ह येथेही वापरू पहातो. त्याचे म्हणणे असे की कोट्यावधी मनुष्यांच्या हितासाठी चारदोन फुटकळ माणसे मेली काय वा मारली गेली काय त्यांच्याबद्दल हळहळत बसणे चुकीचे आहे. हे दुःख तात्पुरते आहे. पुढे येणाऱ्या कायम सुखासाठी इतके दुःख मनुष्यप्राण्यानी भोगलेच पाहिजे. त्याला इलाज नाही.

ऐव्हानॉव्ह जे तर्कशास्त्र वापरीत होता तेच तर्कशास्त्र आजवर रुबाशॉव्हनेसुद्धा वापरले असल्याने ऐव्हानॉव्हच्या तात्पर्यापासून त्याला स्वतःची सुटका करून घेता येत नव्हती. ऐव्हानॉव्हने काढलेले तात्पर्य बिनतोड आणि अपरिहार्य होते. सहाजिकच रुबाशॉव्ह ऐव्हानॉव्हचे तात्पर्य मान्य करतो. ऐव्हानॉव्ह–रुबाशॉव्हमधला संवाद वाचताक्षणी आपल्या हे ध्यानात येते.

(ऐव्हानॉव्ह) : ' .......... तुला बौद्धिक धक्के देण्यात मला यत्किंचितही रस नाही. कारण त्याचा परिणाम उलटसुलट होऊ शकतो. कोणी सांगावे, मी तुला बौद्धिक धक्का दिला तर माणुसकीचा आणि नीतीचा याच्याही पेक्षा मोठा पुळका तुला यावयाचा! मला ते नको आहे. या क्षणी तुझे चित्त जितके अधिक शांत व स्थिर राहील तितके मला हवे आहे. माझ्या दृष्टीने तर्काच्या अंतिम टोकाला जाऊन तू विचार करणे आवश्यक

आहे. जेव्हा तू तसा विचार करशील तेव्हा तुला माझे म्हणणे शंभर टक्के पटेल. शेवटी तू माझ्याच निष्कर्षाला येणार याच्याबद्दल मला पूर्ण खात्री आहे. तसे झाले की आताचे तुझे मत तू मागे घेशील नि आम्हाला शरण येशील."

"काही झाले तरी आपण शरणागती पत्करणारच नाही असे तुला वाटत आहे हे मी ओळखतो. पण तुला एकच प्रश्न मला विचारू दे. मात्र भावनेच्या आहारी न जाता माझ्या प्रश्नाचे उत्तर तू दे. समज पूर्ण विचार केल्यानंतर आणि संपूर्ण वस्तुस्थितीची ओळख पटल्यानंतर जर तुला पटले की शरण येणे हेच येथे योग्य आहे तर तू तसे करशील की नाही ?"

" ..... मला वाटते माझी तुला आता भीती वाटू लागली आहे. कारण तुला हे कळून चुकले आहे की जो युक्तिवाद आता मी करीत आहे तो तू स्वतःच आमच्याशी बोलताना केलेला आहेस आणि त्यामुळे त्या युक्तिवादाचे पडसाद आता तुझ्या मेंदूत उमटू लागले आहेत नि त्याला तू घाबरत आहेस."

गोष्ट खरी होती. ऐव्हानॉव्हचा प्रत्येक शब्द प्रतिध्वनीसारखा रुबाशॉव्हच्या डोक्यात उमटत होता......

ऐव्हानॉव्ह पुढे सुरू करतो.... "प्राचीन काळी माणसाला भूल घालण्यासाठी सैतान वैयक्तिक सुखांची लालूच पुढे करीत असे. परंतु तो काळ मागे गेला आहे. अलिकडे हाच सैतान तार्किक युक्तिवादाची लालूच दाखवितो. मानवी मूल्ये नेहमी बदलत असतात. पूर्वीच्या काळी क्रूसावर चढविल्या जाणाऱ्या ख्रिस्ताच्या यातना आणि दुःख दाखविणारी 'पॅशन-प्ले' नावाची नाटके दाखविली जात. माझ्या हातात असते तर संतशिरोमणी रुबाशॉव्हमहाराज यांच्या आत्म्यासाठी परमेश्वर आणि सैतान या दोघात जो प्रखर झगडा सुरू आहे त्याच्यावर आधारीत रुबाशॉव्ह महाराजांच्या यातना आणि दुःखे सांगणारी नाटके मी दाखविली असती. इतकी वर्षे पापकर्दमात घालविल्यावर रुबाशॉव्ह महाराज आता भक्तीमार्गाने वळत आहेत. औद्योगिक उदारमतवाद आणि सॅल्वेशन आर्मीच्या कनवाळूपणाच्या दुहेरी हनुवटीने शोभणारा लठ्ठंभारती श्रीपरमेश्वर त्यांच्या एका बाजूला आहे तर कृश, सडसडीत बांध्याचा, विरक्त आणि तर्कशास्त्राचा एकनिष्ठ कैवारी श्रीसैतान त्यांच्या दुसऱ्या बाजूला उभा आहे. श्रीसैतान कायम माकियावेली, इग्नेशियस लायोला, मार्क्स, हेगेल अशा पंडितांचे ग्रंथ वाचीत असतो. नव्हे त्या ग्रंथांची पारायणांवर पारायणे करीत असतो. तो विकाररहित आहे. परंतु ह्याचे कारण त्याला अखिल मानवजातीबद्दल जिव्हाळ्याचे प्रेम आहे आणि त्या प्रेमाच्या परिणामापोटी तो कठोर आणि निष्ठुर बनला आहे. अगदी आखून आखून तो निष्ठुर बनला आहे. दुर्दैवाने ज्या गोष्टींचा तो तिरस्कार



अनुक्रमणिका

करतो त्याच त्याला आता कराव्या लागत आहेत. परंतु नाइलाज आहे. त्या केल्यावाचून त्याला गत्यंतर नाही. उद्याच्या मानवजातीची कत्तल पूर्णपणे थांबावी म्हणून आज त्याला काहींची मुंडकी छाटावी लागत आहेत. उद्या सगळ्या मेंढरांचा बळी जाऊ नये म्हणून आज त्याला काही मेंढरे मारून टाकावी लागत आहेत. अंगावर जर का कोणी चाबूक उगारला तर त्याचा प्रतिकार करावा अशी हिंमत लोकांच्या अंगी यावी म्हणून आज त्याला जनतेला चाबकाच्या फटक्यांनी अर्धमेले करावे लागत आहे. एका सर्वोच्च नीतीची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी आज त्याला सगळी नीती गुंडाळून ठेवावी लागत आहे. या जगातील अखिल मानवजातीविषयी त्याच्या हृदयात जो अथांग प्रेमाचा सागर वास करीत आहे त्या प्रेमापोटीच त्याला मानवजातीचा रोष स्वतःवर ओढवून घ्यावा लागत आहे. अमूर्त आणि भूमितीमधल्या रेषांगत सरळ रेषेत प्रवास करणाऱ्या प्रेमापोटी त्याला हे सर्व करावे लागत आहे. पण दा सैताना ! क्षमा कर. तुझे पाऊल तू आता मागे घे. आमचे संतशीरोमणी रुदाशॉव्ह महाराज आज तुझे भक्त उरलेले नाहीत. त्याना आता हुतात्मा बनण्याची तहान लागली आहे. भांडवलशाही जगातील जे तथाकथित प्रागतिक पत्रकार कालपर्यंत त्यांच्यावर आगपाखड करीत होते तेच उद्या त्याना महात्मापद वहाल करणार आहेत. कारण संत रुदाशॉव्हमहाराज याना त्यांची हरवलेली सद्सद्विवेकबुद्धी पुन्हा सापडली आहे. नव्हे मोठ्या प्रयासाने ती त्यानी धुंडून काढली आहे. दुर्दैवाने सद्सद्विवेकबुद्धी आणि दुहेरी मनुवटी अथवा ढेरपोट दोन्हीही क्रान्तीसाठी पूर्णपणे निरुपयोगी असतात. कॅन्सरप्रमाणेच सद्सद्विवेकबुद्धी ही सुद्धा मेंदूला लागणारी कीड आहे. ही कीड एकदा मेंदूला लागली की मेंदू नष्ट केल्याशिवाय ती थांबत नाही. एकदा का मेंदू खलास झाला की त्या मनुष्यावर सैतानाच्या शब्दांचा प्रभाव चालत नाही. अशा वेळी मग सैतानाला माघार घ्यावी लागते नि मागे वळावे लागते. तथापी हा सैतान नव्या जमान्यातला आहे. तो जुन्या सैतानाप्रमाणे दातओठ खात नाही. रागाने फुत्कार टाकीत नाही. यापैकी काहीही हा नवा सैतान करीत नाही. तो फक्त खांदे झटकतो. नि पुढे चालू लागतो. तो अंगाने रोड आहे नि वृत्तीनं तापसी आहे. या ना त्या सबबीखाली आजवर अनेकजण त्याला सोडून गेले आहेत. मधेच हातपाय गाळणारे आणि खांद्यावरचा ध्वज खाली टाकणारे आणि उच्च नैतिक मूल्यांच्या गोष्टी करणारे अनेकजण त्याने आजवर पाहिले आहेत. ही गोष्ट त्याला नवी नाही......''

''मी दारू घेतो. काही दिवस मी अफूसुद्धा घेत असे. परंतु दयेचे व्यसन मी स्वतःला लावून घेतलेले नाही. या एका व्यसनापासून मी स्वतःला कटाक्षाने दूर ठेवले आहे. दया हा एक आजार आहे. भयंकर स्वरूपाचा आजार. हा आजार झाला की माणसे अखिल मानवजातीच्या दुःखाच्या नावाने कढ काढून रडावयास सुरुवात करतात. स्वतःच्या दुःखावरही कढ काढून रडतात. आमच्या मनुष्यजातीची ही रोगट होरा तुला नवीन नाही.



अनुक्रमणिका

आमचे सगळे मोठमोठे कवी याच रोगाला बळी पडून हे जग सोडून गेले आहेत. वयाच्या चाळीशी, पन्नाशीपर्यंत ते चांगले भक्कम क्रान्तीकारक होते. परंतु पुढे पुढे मात्र त्याना दयेच्या आजाराची लागण झाली नि त्याना अखिल जगाने संतपद दहाल केले. मला वाटते की तुझी स्वतःची महत्त्वाकांक्षासुद्धा संत बनावे अशीच असावी. आणि हा काहीतरी तुझ्या एकट्याचा पराक्रम आहे, तुझा एक महान सद्‌गुण आहे अशी एक कल्पना तू करून घेतलेली दिसते. मला वाटते की ही आध्यात्मिक झिंग तू दूर ठेवावीस. तसे पाहिले तर दारूच्या प्रत्येक बाटलीमधे झिंग आणणारे द्रव्य असते. दुर्दैवाने आमच्या देशातील लोकाना हे कळत नाही की दारूने जशी झिंग येते, तशीच अतिनम्रता आणि परदुःखमुळे वाटणारे दुःख याही दोन गोष्टींमुळे झिंग येऊ शकते आणि रासायनिक झिंग आणि ही झिंग या दोन प्रकारच्या झिंगेत तत्त्वतः यत्किंचितही फरक नाही. भूल देऊन गुडघ्याखालचा माझा पाय कापून काढण्यात आला नि मी जेव्हा शुद्धीवर आलो तेव्हा मला एकीकडे दुःख होत होते नि दुसरीकडे त्या दुःखाचीच एक वेगळी झिंग येत होती. मी जेव्हा तुझ्याशी त्याबद्दल बोललो तेव्हा तू मला जे सांगितलेस ते तुला आज आठवते काय ?''

''माझा मुद्दा असा की हे जग म्हणजे आध्यात्मिक भावनांचा चंडोलखाना नाही की कुणीही यावे आणि भावनांचा कढ काढून रडून घ्यावे. येथे असे करता येत नाही. हे जग ही कर्मभूमी आहे. येथला आमचा पहिला दंडक हा की येथे येताच दया, सहानुभूती, सद्‌सद्‌विवेकबुद्धी, तिरस्कार, केल्या कर्माचा पश्चात्ताप आणि खंत, चुकीची दुरुस्ती करण्याची इच्छा या गोष्टी दूर ठेवणे. आमच्या मते हे सगळे प्रकार बौद्धिक उनाडकीत मोडतात. नि आम्हाला ते निंद्य वाटतात..... आकाशकडे दृष्टी लावून ग्लेटकिनच्या रिव्हॉल्वरमधल्या गोळीसाठी आपले कपाळ ग्लेटकिनच्या स्वाधीन करणे - मला वाटते की याच्याइतकी दुसरी सोपी गोष्ट जगात दुसरी कोणतीच नसेल. आमच्या सारख्यांसाठी सगळ्यात मोठा मोह म्हणजे हिंसेचा त्याग, केल्या कर्माबद्दल पश्चात्ताप आणि तसे करून मिळवलेली मनःशांती. कितीतरी मोठमोठे क्रांतीकारक या मोहाला बळी पडलेले दिसून येतील. स्पार्टाकस, दान्ता (फ्रेंच राज्यक्रांती), डोस्टोव्हस्की हे सगळे थोर क्रांतीकारक या एका मोहाला बळी पडले होते नि त्यानी आपल्या जीवितकार्याशी द्रोह केला होता. सैतानाच्या मोहापेक्षा (पृथ्वीचे राज्य, सुंदर स्त्रियांचा हात इत्यादी), परमेश्वराचे मोह (दया, करुणा, सद्‌सद्‌विवेकबुद्धी, पापाचा तिटकारा, पश्चाताप इत्यादी) हे मानवजातीसाठी जास्त धोक्याचे आहेत. या जगामधे जोवर कार्यक्षम व्यवथा आणि शिस्त आलेली नाही तोवर परमेश्वराच्या कल्पनेला येथे थारा नाही. तसेच स्वतःच्या सद्‌सद्‌विवेकबुद्धीबर-ोवरची तडजोड हा स्वतःच केलेला स्वतःचा विश्वासघात आहे. म्हणून तुला माझा सल्ला हा की, जर का तुझा 'आतला आवाज' जागा होऊन तुझ्याशी बोलू लागला तर तू कानात

बोटे घालून कान बंद करून घे..."

"जगातले खरे गुन्हेगार नीरो किंवा फुशे हे नसून गांधी आणि टॉलस्टॉय यांच्यासारखे महात्मे आहेत. ब्रिटिशांच्या शस्त्रांपेक्षा गांधींच्या 'आतल्या आवाजानेच' हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा मार्ग अडवून ठेवला आहे..... (ज्यूडासप्रमाणे) तीस रुपड्यांसाठी स्वतःला विकून घेणे हा मी एक प्रामाणिक व्यवहार समजतो. परंतु स्वतःच स्वतःच्या सद्‌सद्‌विवेकबुद्धीला विकत जाणे याच अर्थ अखिल मानवाजातीला वाऱ्यावर सोडून देणे असा मी करतो. इतिहास हा तत्त्वतःच नीतिअनीतीच्या कल्पनांच्या पलीकडे राहतो. पाठशाळेतल्या भिंतीवर लटकावलेल्या नीतिवचनांवरहुकूम इतिहास घडवायचा असे कोणी म्हटले तर त्याच्या हातून काहीही घडणार नाही. परिस्थिती "त्याला जैसे थे" सोडायला भाग पाडील. माझ्या इतकेच हे सर्व तुला माहीत आहे. डावावर काय लावले आहे हे तुला माहीत आहे......"

* * *

कादंबरीत रुबाशॉव्हची केस ऐव्हानॉव्हकडून काढून घेऊन ग्लेटकिनकडे सुपूर्द करण्यात येते आणि आपला कबुलीजबाब रुबाशॉव्ह ग्लेटकिनला देतो असे आहे. पण वरील संवाद (खरे तर एकोक्तीच्या स्वरूपातला संवाद) वाचल्यावर असे ध्यानात येते की रुबाशॉव्ह ग्लेटकिनला शरण जात नाही. तो ऐव्हॅनॉव्हला शरण जातो. कारण ऐव्हानॉव्हचे तर्कशास्त्र, ऐव्हानॉव्हने केलेला युक्तिवाद हे सर्व खुद्द रुबाशॉव्हच्या परंपरेतले आहे नि म्हणूनच रुबाशॉव्ह 'माणसाच्या हितासाठी मुक्या प्राण्यांवर प्रयोग केले तरी चालतात नि मुक्या प्राण्यांची शरीरे जिवंतपणी फाडली तरी हरकत नाही' असे म्हणणाऱ्या ऐव्हानॉव्हच्या नीतिशास्त्रापुढे मान तुकवतो. कारण असलेच युक्तिवाद खुद्द त्याने स्वतःच केले होते. मात्र ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिन या दोघात एक मोठा फरक आहे. ऐव्हानॉव्हला रुबाशॉव्हबद्दल प्रेम आहे नि त्याच्याशी त्याची जुनी मैत्रीही आहे. प्रेम आणि मैत्रीपोटी तो त्याला वाचवू पाहतो.

ऐव्हानॉव्हच्या भावनिक दौर्बल्यामुळे त्याच्या डोक्यात गोळी घातली जाऊन त्याचा वध केला जाणे आणि रुबाशॉव्हची केस त्याच्याकडून काढून घेतली जाऊन ग्लेटकिनच्या हाती सोपविली जाणे दोन्हीही कादंबरीच्या अंतर्गत तर्कशास्त्राला धरून आहेत.

* * *

'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीचा एक ठळक विशेष येथेच सांगता येईल.

ही कादंबरी अतिशय गुंतागुंतीच्या सामग्रीतून उभी केली गेली आहे. सामग्री गुंतागुंतीची व कॉम्लेक्स या अर्थाने की ही सामग्री राजकीय स्वरूपाची आहे, ती ऐतिहासिक, मानसिक अशा विविध स्वरूपाची आहे. तथापी इतके असूनसुद्धा कोठेही ही कादंबरी विस्कळीत वाटत नाही. उलट ती चांगलीच बंदिस्त झाली आहे. अगदी हाच विशेष अभिजात ग्रीक नाट्यवाङमयामधे पाहावयास सापडतो. अभिजात वाङमय एकसंध असते. त्यात वापरलेले घटक एकजीव बनलेले असतात. हे अभिजात कलाकृतींबद्दलचे दंडक ॲरिस्टॉटल या ग्रीक तत्त्ववेत्त्याने प्रथम सुचविले होतो आणि ते ग्रीक नाट्यकृतींच्या संदर्भात आहेत. नाट्यकृतीत काही ना काही कथानक असते किंवा प्रत्येक नाट्यकृतीमधे प्रसंगाची एक मालिका असते. या प्रसंगमालिकेला ॲरिस्टॉटल ॲक्शन असा शब्द वापरतो. ॲरिस्टॉटल म्हणतो की नाट्यकृतीतले कथानक किंवा ॲक्शन आंतरिक तर्कशास्त्राने घट्ट बांधलेले हवे. ते विस्कळित अथवा एकदा हा भाग, मग तो भाग असे तुटक तुटक वाटता कामा नये. ते एकजीव वाटले पाहिजे. ॲक्शनला प्रारंभ हवा, प्रारंभाला साजेसा मध्य हवा आणि मध्याशी जुळणारा शेवट हवा. एका शब्दात, कोठलीही नाट्यकृती पूर्णाकृती Whole वाटावयास हवी. या ॲक्शनला मॅग्निट्यूड हवा. कथानकाला लांबीरुंदी हवी. ते एकाच प्रसंगात आटोपता कामा नये. तसेच ही ॲक्शन अपरिहार्य - इनएव्हिटेबल वाटावयास हवी. ती आहे तशीच ती असावयास हवी आहे. ती अन्य एखाद्या प्रकारे असती तर तिला उणेपणा आला असता असे तिच्याबद्दल वाटावयास हवे. एका शब्दात कथानकाची वीण उत्तम हवी. ती विसविशित असता नये. ॲरिस्टॉटलच्या शब्दात ॲक्शन कन्सनट्रेटेड हवी. ॲरिस्टॉटल म्हणतो की युनिटी ऑफ ॲक्शन साधली की त्याच्यातून मॅग्निट्यूट आणि इनूइव्हिटेबिलिटी हे दोन गुणधर्म आपोआप साध्य होतात. ते कथानक एकजीव असले की आपोआपच त्याला भव्यता येतो आणि ते अपरिहार्यही बनते. ॲरिस्टॉटलने सांगितलेला अभिजात नाट्याकृतीचा दुसरा महत्त्वाचा विशेष नाट्याकृतीत ग्रंथित होणाऱ्या काळाच्या संदर्भातला आहे. उत्कृष्ट नाट्याकृतीसाठी ॲक्शनची युनिटी लागते. तशाच प्रकारे कालावधीवाचक युनिटीसुद्धा लागते असे ॲरिस्टॉटल पुढे सांगतो. कोठल्याही उत्तम नाट्याकृतीमधे एकूण तीन 'युनिटी' पाहावयास सापडतात. त्या तीनपैकी ही दुसरी युनिटी कालावधीवाचक युनिटी या शब्दाचा अर्थ नाट्याकृतीमधे जो कालावधी ग्रथित करण्यात येतो तो वाजवीपेक्षा जास्त दीर्घ नसावा. तो साधारण बारा ते चोवीस घंट्यांचा असावा. थोडक्यात म्हणजे एकूण कथानक बारा ते चोवीस घंट्यात घडणारे असावे. अर्थात कालावधीच्या अटीबाबत ॲरिस्टॉटल फारसा आग्रही नाही. ॲरिस्टॉटलचे म्हणणे फक्त एवढेच आहे की कथानकात कालावधी जर हाताबाहेर गेला तर कथानक एकसंध न राहाता ते विस्कळीत होते आणि विस्कळीत कथानक हा नाट्याकृतीचा दोष आहे. ॲरिस्टॉलने सूचित केलेली तिसरी युनिटी स्थलवाचक होय. तो



अनुक्रमणिका

म्हणतो की कथानक कोठेतरी एकाच ठिकाणी घडलेले दाखवावे. ते पंचवीस ठिकाणी म्हणजे बाजवीपेक्षा जास्त ठिकाणी घडलेले दाखवू नये. कथानक पंचवीस ठिकाणी घडते असे दाखविले की प्रेक्षकांच्या मनाची एकाग्रता मोडते आणि नाट्याकृतीचा परिणाम दुर्बल होतो. असो. तर उत्तम नाट्याकृतीची लक्षणे म्हणून ॲरिस्टॉटलने ही तीन लक्षणे सांगितली आहेत. कोस्सलर यांच्या 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीत अभिजात ग्रीक नाट्याकृतीतले हे तीनही विशेष पाहावयास सापडतात. 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीची वीण अतिशय घट्ट आहे. अगदी मोजक्या शब्दात कोस्सलरनी कथानक रचले आहे. शब्दांची काटकसर तर वाखाणण्यासारखी आहे. एकही जादा शब्द तुम्ही कथानकात घालू शकत नाही वा घातलेला कमीही करू शकत नाही. कादंबरीचे कथानक एकूण काही आठवड्यांमध्ये घडते. त्यामुळे कालावधी अल्प हवा, ही अट सुद्धा कोस्सलर यानी पाळली आहे. तिसरी अट स्थळाबद्दल. कथानक कुठेतरी एकाच जागी घडलेले दाखविले तरच प्रेक्षकांच्या मनाची एकाग्रता शेवटपर्यंत टिकून राहाते असे ॲरिस्टॉटल सांगतो. 'भर मध्यान्हीचा अंधार' चे संपूर्ण कथानक तुरुंगाच्या इमारतीत आणि एका विशिष्ट कोठडीत घडते. म्हणजे ही सुद्धा अट कोस्सलर यानी पूर्ण केली आहे. कोस्सलर यांची ही कादंबरी अशा प्रकारे अभिजात ग्रीक वाङ्मयाच्या कसोटीत चपखल बसते असे आपण म्हणू शकतो. परंतु अभिजात ग्रीक वाङ्मयाबरोबरची या कादंबरीची तुलना येथेच संपत नाही. अभिजात ग्रीक वाङ्मयाचे दंडक काही विशिष्ट कल्पनाबंधाचीही स्तुती करतात. हे कल्पनाबंध ज्या कलाकृतीमध्ये प्रतिबिंबित होतात ती कलाकृती श्रेष्ठ असे हे दंडक सांगतात. फेट किंवा नियतीची अटळता हा अशा कल्पनाबंधांपैकी एक कल्पनाबंध होय. दुसरा कल्पनाबंध Hubris अथवा Hybris. हुब्रिस म्हणजे अतिअहंकार. ग्रीक शोकनाट्याचे नायक अत्यंत अहंकारी दाखविले जातात आणि अत्यंत अहंकारामुळे त्यांचे पतन घडते. ईडिपसची आई-पत्नी त्याला सांगते की, 'आधीच्या राजाचा वध कोणी केला याची जी चौकशी तू सुरू केली आहेस ती आता तू बंद कर. तिच्यातून चांगले बाहेर येईल असे मला वाटत नाही. राजाचे सल्लागारसुद्धा त्याला तसाच सल्ला देतात. सर्वजण राजाला एकच सल्ला देतात की ही चौकशी तू थांबव. परंतु इडिपस कुणाचेही ऐकत नाही. तो चौकशी जारी ठेवतो नि शेवटी तोच खरा गुन्हेगार ठरतो. इडिपसला जणू त्याचे प्रारब्धच शेवटपर्यंत ओढत नेते. मानवी शक्तीबाहेरच्या संघर्ष प्रसंगात इडिपस अडकलेला असतो नि त्याचे प्रारब्ध त्याला त्या संघर्षात अडकविते. आणि त्या प्रारब्धावर त्याच्यापाशी कोणताही इलाज नसतो. नेमकी अशीच स्थिती 'भर मध्यान्हीचा अंधार' च्या नायकाची - रुबाशोव्हची आहे. त्याचे जणू प्रारब्धच त्याला प्रथम विशिष्ट मतप्रणालीच्या प्रेमात पाडते. मतप्रणालीच्या प्रेमाने मतप्रणालीचा झेंडा खांद्यावर घेऊन पक्षाच्या कार्यक्रमात झुंजते, आणि पुढे त्याच मतप्रणालीचे अटळ गर्भित परिणाम प्रकट होऊन त्याला त्याच्याच

पक्षाच्या हातून आणि मतप्रणालीच्या नावाने फाशीच्या तख्तावरही चढवते. ग्रीक नाटकातील नायकांप्रमाणेच रुबाशॉव्हसुद्धा धीरोदात्त नायक आहे. आपण काय करत आहोत नि त्याचे परिणाम शेवटी काय व्हावयास हवेत याचा पूर्ण विचार करून आपले प्रारब्ध तो स्वीकारतो. रुबाशॉव्हचे पतन घडते, परंतु ग्रीक नायकांच्या पतनाप्रमाणेच हेसुद्धा सुदैवी पतन आहे. (पॅरडॉक्स ऑफ द फॉर्च्युनेट फॉल). पतन झाल्यामुळेच रुबाशॉव्ह मुळात होता त्याच्याहीपेक्षा कितीतरी अधिक पटींनी मोठा बनतो. मानवी शक्तीबाहेरच्या संघर्षात सापडलेल्या व्यक्तीचे शेवटी जे होते तेच येथे रुबाशॉव्हच्या आयुष्याचे झाले आहे. तथापी ज्या संघर्षात रुबाशॉव्ह सापडला होता. तो संघर्ष जरी मानवी शक्तीबाहेरचा होता, तरी ज्या प्रकारे त्या संघर्षाशी तो मुकावला करतो ते मात्र माणसाची शान वाढवणारे होते. नि येथेच 'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी ग्रीक अभिजात शोकनाट्याची उंची गाठते.

या कादंबरीतले महत्त्वाचे निवेदन पहिल्या तीन विभागांमधे आले आहे. हे तीन विभाग हा कादंबरीचा मुख्य भाग होय. हे तीन विभाग एखाद्या तीन अंकी नाटकाप्रमाणे एकामागे एक उलगडतात. नेमक्या जागी पडदा पडतो नि पडदा वर जातो. या नाटकाचा शेवट रुबाशॉव्हवरचा छोटा सरकारी खटला नि रुबाशॉव्हचे अल्पाक्षरी आत्मनिवेदन किंवा कबुलीजबाब. हे शेवटचे छोटे दृश्य म्हणजे ग्रीक शोकनाट्यातील अखेरचा उपसंहारच होय. परंतु हा उपसंहार पहिल्या तीन अंकातच दाखवून झाला आहे. कारण शेवट कुठे चालला आहे याचा अंदाज पहिल्या दोन विभागापासून येऊ लगतो नि तिसऱ्या विभागावरोबर त्याची खात्रीच पटते. या कादंबरीची रचना अतिशय काटेकोरपणे आणि काळजीपूर्वक केली गेली आहे. शेवटचे संपूर्ण निवेदन या काटेकोर आखणीत चपखल बसविण्यात आले आहे. कधी हे वस्तुनिष्ठ अंगाने घडल्याचे दिसते तर कधी व्यक्तिनिष्ठ अंगाने; आणि वस्तुनिष्ठ आणि व्यक्तिनिष्ठ अशा दोन समान पातळींवर संपूर्ण निवेदन चालविणे हेच कोस्सलर यांचे कौशल्य. कारण एकाच वेळी दोन वेगवेगळ्या पातळींवर जरी कथानक पुढे सरकते तरी आकलनामधे कोठेसुद्धा व्यत्यय आल्यासारखे वाटत नाही. उलट कथा–निवेदनाला इतकी प्रचंड गती आहे की कथानक वाचता वाचता खुद्द वाचकाच्या मनात सुद्धा जुन्या घटना, स्मृती, भावभावना आणि बौद्धिक कल्पना यांचे प्रचंड वादळ जागे होते. शेवटी जेव्हा रुबाशॉव्हला गोळी घालून ठार करण्यात येते तेव्हाच कोठे हे वादळ शमते.

'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीचे कथानक अतिशय वेगवान आहे. कादंवरीत फारसे प्रसंग घडत नाहीत. परंतु जे काही प्रसंग पूर्वी घडून गेले आहेत त्यातून जो भावनांचा आणि विचारांचा आवेग उत्पन्न होतो त्याला पुढे पुढे प्रचंड गती येते. ही

गती शेवटी इतका वेग धारण करते आणि वाचकाच्या चित्तवृत्ती इतक्या उत्तेजित करते, की त्या उत्तेजित अवस्थेत कादंबरीत ग्रथित झालेल्या राजकीय प्रश्नावरोबरच याच कादंबरीत दुसरा जो एक महत्त्वाचा घटक अंतर्भूत आहे नि ज्या घटकामुळे कादंबरीच्या खऱ्या अर्थावर आणि महत्त्वावर प्रकाश पडू शकतो त्याच्याकडचे दुर्लक्ष होण्याची शक्यता आहे. निदानपक्षी कादंबरीतल्या राजकीय प्रश्नाइतकेच याही घटकाला जे महत्त्व आहे ते महत्त्व त्यामुळे कमी लेखले जाऊ शकते. वरवर पाहाता कोणाही वाचकाला असे वाटेल की कादंबरीचे संपूर्ण नाट्य आरोपी रुबाशॉव्ह आणि त्याची चौकशी करणारे सरकारी अधिकारी ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिन या दोघांमधल्या संवादांमधे बंदिस्त आहे. इनमिन तीन मुलाखतीत हा संवाद आटोपलेला आहे. दोन मुलाखतींमधे जो रिकामा कालावधी असतो त्या कालावधीत रुबाशॉव्हचे कधी प्रकट तर कधी अप्रकट चिंतन सुरू असते. सध्याच्या दारुण अवस्थेला आपण कसे येऊन पोहोचलो या प्रश्नाचे उत्तर रुबाशॉव्हला हवे असते नि त्यासाठी तो आपल्या गतजीवनाची चिरफाड करीत असतो.

बाह्यत्कारी तरी रुबाशॉव्ह, ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिन एवढी तीनच पात्रे या कादंबरीत प्रत्यक्ष वावरताना आपल्या नजरेस पडतात. परंतु या तीन पात्रांबरोबरच आणखी देखील एक पात्र कादंबरीभर वावरत आहे असे वाचकांना जाणवते. हे तिसरे पात्र म्हणजे रुबाशॉव्ह या पात्राचा 'आतला आवाज'. रुबाशॉव्ह, ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिन या तीन पात्रांप्रमाणेच किंबहुना या तिन्ही पात्रांपेक्षा जास्त महत्त्व रुबाशॉव्हच्या 'आतल्या आवाजाच्या' रूपात वावरणाऱ्या या पात्राला आहे. या पात्राला स्वतःचा देह नाही. स्वतःचे वेगळे नाव नाही. तरी संपूर्ण कादंबरीवर प्रभाव मात्र याच अदृश्य आणि निनावी पात्राचा आहे. हे पात्र जर कादंबरीत नसते तर कादंबरी पुढे सरकलीच नसती इतके महत्त्व या निनावी पात्राला आहे व त्यामुळे कादंबरीचा खरा नायक रुबाशॉव्ह नसून हा अशरीरी 'आतला आवाज' आहे असे म्हटले तर ते अगदीच वावगे ठरू नये. या पात्राचे महत्त्व वर्णन करून सांगण्यासाठी कोस्लर नव्या कराराकडे वळतात. त्यात जीजससंबंधी एक उल्लेख आला आहे. त्या उल्लेखाची मदत घेऊन हे 'अदृश्य' पात्र किती महत्त्वाचे आहे हे दाखवितात. जीजस ज्या दिवशी कबरीतून उठतो त्याचदिवशी त्याचे दोन शिष्य जेरुसलेमहून अम्माऊस गावाकडे निघालेले असतात. अम्माऊस हा जेरुसलेमच्या शेजारचा गाव. वाटेत ते जीजस थडग्यातून उठला त्याच्याच गोष्टी आपसात बोलत असतात. कालोंत्र पल्ला पडता नि गावात शिरता शिरता त्याना जाणवते की आपण जरी फक्त दोघेच प्रवास करीत असलो तरी आणखी कुणी तिसरासुद्धा आपल्याबरोबर प्रवास करीत होता. या तिसऱ्याचा फक्त आवाज त्याना ऐकू येतो नि त्यावरून त्याना समजते की हा तिसरा म्हणजे आजच सकाळी जो थडग्यातून फिरून उठला तो जीजस आहे नि आपण

त्याच्याच गोष्टी एवढा वेळ बोलत होतो. अदृश्य रूपात खुद्द जीजसच त्यांची संगत करीत होता. तथापी जीजस जरी अदृश्य होता तरी ज्या घटनेची चर्चा त्यानी चालविली होती. त्या घटनेतील खरे पात्र जीजसच होता. नि तीच गोष्ट 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंवरीची सुद्धा. या कादंवरीतील रुबाशॉव्ह, ऐव्हानॉव्ह आणि ग्लेटकिन या तिन्ही पात्रांना प्रत्यक्ष अस्तित्व आहे. परंतु कादंबरीची एकूण स्थिती किंवा संरचना विचारात घेता कादंवरीचे मधवर्ती पात्र रुबाशॉव्ह नसून तो अशरीरी 'आतला आवाज' आहे. कादंबरीला कलाटणी त्या अशरीरी 'आतल्या आवाजा' मुळे येते. कादंवरीला खरी सखोलतासुद्धा त्याच 'आतल्या आवाजा' मुळे आली आहे.

"तुझ्या सोवत चालणारा तो तिसरा कोण ?" हा जो कोणी तिसरा आहे तो स्वतः होऊन एक अक्षरसुद्धा उच्चरत नाही. पण रुबाशॉव्ह तुरुंगाच्या कोठडीत फिरता फिरता स्वतःशी बोलत असतो. नि नकळत त्याच्या ओठावर काही शब्द येतात. तेच या तिसऱ्याचे बोलणे. विशेषतः 'मला फेड केलीच पाहिजे' हे त्याचे शब्द. तार्किकदृष्ट्या रुबाशॉव्हच्या लेखी त्या शब्दांना काहीही अर्थ नसतो. कारण कम्युनिस्ट पक्षाच्या तत्त्वज्ञानात 'मी' या प्रथमपुरुषी एकवचनाला अजिवात स्थान नाही. कम्युनिस्ट तत्त्वज्ञान आणि पक्ष फक्त समुदायाच्या अस्तित्वाला महत्त्व देतो. समुदायाच्या अस्तित्वाच्या तुलनेत व्यक्तीचे अस्तित्व त्याना क्षुल्लक वाटते. व्यक्ती म्हणजे जगड्व्याळ यंत्राचा एक क्षुल्लक भाग अशी त्यांची धारणा असल्याने, त्याच कम्युनिस्ट पक्षाचा सच्चा अनुयायी जो रुबाशॉव्ह तोच स्वतःच्या नकळत जेव्हा 'मला फेड केलीच पाहिजे, मला फेड केलीच पाहिजे' हे शब्द उच्चारतो नि ते शब्द उच्चारताच त्याच्या मनावरचे दडपण एकाएकी कमी झालेले जेव्हा त्याला दिसून येते तेव्हा त्याच्या आश्चर्याला पारावार उरत नाही. कारण ते शब्द उच्चारताच मनावरच भार कमी होणे याचा अर्थ त्या शब्दांना काहीतरी निश्चित अर्थ आहे हे सिद्ध होणे होय. नुसता अर्थ असणे एवढेच सिद्ध होणे नव्हे तर त्या शब्दांना निदान रुबाशॉव्हच्या (आणि पर्यायाने अखिल मानवजातीच्याच) आयुष्यात महत्त्व आहे हे सुद्धा सिद्ध होणे होय. 'मला फेड केलीच पाहिजे' हे शब्द जणू जादूचे होते. यातना मुक्त करण्याची शक्ती त्यांच्या ठायी होती. ते चार शब्द हे जणू काही रुबाशॉव्हच्या दृष्टीने एक प्रकारचे आश्वासन होते. हे शब्द कोठून येत आहेत हे त्याला कळत नाही. परंतु त्या शब्दांचा परिणाम खात्रीने घडून येत होता. हे शब्द उच्चारताच त्याची दाढदुखीसुद्धा थोडावेळ बंद होते. आपल्याशी बोलणारा कोण याचा उलगडा रुबाशॉव्हला होत नाही, तरी आजवर जो एकट्याचा एकट्याशी संवाद सुरू होता त्यात आता एक भागीदार उत्पन्न झाला नि पूर्वीचा निव्वळ एकपात्री संवाद संपून आता दोघातला नवा एकपात्री संवाद सुरू झाला असे त्याला जाणवते.



अनुक्रमणिका

दोघातला नवा एकपात्री संवाद सुरू होताना रुबाशॉव्हला आणखी हे जाणवते की आपल्या अज्ञात जोडीदाराचे तर्कशास्त्र आपल्या तर्कशास्त्रापेक्षा सर्वस्वी भिन्न आहे. रुबाशॉव्हने संपूर्ण आयुष्यभर ज्या तर्कशास्त्राचे पालन केले त्या तर्कशास्त्रापैकी एकही गोष्ट या अज्ञात जोडीदाराला अवगत नव्हती. विशेषतः रुबाशॉव्हच्या आयुष्यातील विशेष महत्त्वाच्या प्रसंगांच्या बाबतीत तर हे अधिकच प्रकर्षाने खरे दिसत होते. त्यातील एकएका प्रसंगाचा रुबाशॉव्हने लावलेला अर्थ आणि या अज्ञात जोडीदाराने लावलेला अर्थ याच्यात काहीच सारखे नव्हते. त्या प्रसंगातील जो भाग रुबाशॉव्हला महत्त्वाचा वाटला होता तो भाग याने पाहिलेलाच नव्हता. उलट त्या प्रसंगातील जे तपशील रुबाशॉव्हला अजिबात महत्त्वाचे वाटले नव्हते. तेच तपशिल याला अत्यंत महत्त्वाचे वाटत होते. उदा. अन्नाची थाळी पकडण्यासाठी कैदखान्याच्या खिडकीबाहेर काढले गेलेले कैद्याचे शुष्क, निर्जीव हात पाहून त्याला आठवण होते ती म्युनिच कलादालनातील बाहू पसरलेल्या मेरी मातेच्या चित्राची. वस्तुतः रुबाशॉव्ह हे चित्र पाहाण्यासाठी तेथे गेलाच नव्हता. तो गेला होता. रिचर्ड नावाच्या त्याच्या सहकाऱ्याला पक्षाने दिलेल्या शिक्षेचा आदेश पोहोचविण्यासाठी. पण ते सर्व तो विसरला होता नि कुमारी मातेचे ते चित्र त्याच्या ध्यानात राहिले होते. पुढे त्याला आठवते ती आर्लेवाच्या मानेवरची केसाची मऊ लव. ही आर्लेव्हा रुबाशॉव्हची खाजगी चिटणीस. स्वतःचा जीव बचविण्यासाठी रुबाशॉव्ह तिला मृत्यूच्या आणि त्याबरोबर कदाचित अमानुष शारीरिक छळाच्या हवाली करतो. केवळ क्रांतीच्या तत्त्वज्ञानापोटी. क्रांतीचे तत्त्वज्ञान सांगते की जीव बचावणे हे क्रांतीकारकाचे आद्य कर्तव्य आहे. रुबाशॉव्हने तसे केले होते नि स्वतःचा प्राण वाचविला होता. नि आज ते तत्त्वज्ञान विसरून त्याला फक्त आर्लोव्हाच्या मानेवरची केसाची लव आठवत होती. त्याला हळवे बनविणारी. नंतर त्याला गोदीतल्या धुक्याचा खास गंध आठवतो. याच गोदीत तो बुटक्या लेवीला भेटला होता. पक्षाने त्याला दिलेल्या शिक्षेची खबर देण्यासाठी. अज्ञात जोडीदाराची ही एक गंमतच होती. जे तपशील रुबाशॉव्हने ध्यानात ठेवले होते ते या जोडीदाराला अजिबात महत्त्वाचे वाटत नव्हते. आणि वेगळेच तपशील तो आठवत होता. त्याला महत्त्वाचे वाटत होते. आणखी विशेष म्हणजे रुबाशॉव्हचा हा नवा निनावी जोडीदार मधेच केव्हातरी उपटत होता. विशेषतः रुबाशॉव्हचा दात दुखू लागला की तो हमखास अवतरे.

विचार करण्याची आपली नेहमीची सवय बिघडवून टाकणाऱ्या या नव्या, अज्ञात वास्तवाला नाव काय द्यायचे हेच रुबाशॉव्हला कळत नाही. तरी तो आपल्या त्या दुसऱ्या आत्म्याला, जुळ्या भावंडाला नाव द्यायचे ठरवतो आणि "व्याकरणाच्या नियमांमुळे निर्माण होणारे कल्पित" (ग्रामॅटिकल फिक्शन) असे नाव देतो. "मी" या प्रथमपुरुषी एकवचनाला रुबाशॉव्हने ते नाव दिले होते. कम्युनिस्ट पक्षाला 'मी' चे

अस्तित्वच मान्य नसते. पक्ष फक्त सामुदायिक अस्तित्व तेवढे मान्य करतो. रुबाशॉव्ह हा पक्षाचा सच्चा अनुयायी आहे. म्हणून पक्षाला जे मान्य नाही ते तोही मान्य करू शकत नाही. या 'मी' च्या बाबतीत त्याला अनेक प्रश्न पडतात. हा 'मी' काम कसे करतो. त्याची वागण्याची पद्धती काय ? त्याची विचार करण्याची पद्धती कोणती ? हा 'मी' आहे म्हणजे कशा प्रकारे आहे ? (ऑन्टॉलॉजिकल स्टेटस.) अनेक प्रश्न रुबाशॉव्ह स्वतःला विचारतो. नि एकाही प्रश्नाचे उत्तर त्याला देता येत नाही. त्याला फक्त एवढे जाणवते की लॅटिन कवी काव्य लिहिताना ज्याचा उल्लेख साधाभोळा, निरागस 'आत्मा' या शब्दांनी करतात, तशातला काहीतरी हा प्रकार असावा. निराकार, स्वच्छंदी, फोटोग्राफीच्या प्लेटसारखा काहीतरी. फोटोग्राफीच्या प्लेटवर समोरच्या दृश्याचे ठसे उमटतात. आत्म्याच्या प्लेटवर अनुभवाच्या चित्रांचे ठसे उमटतात. एवढाच काय तो या दोघातला फरक. पहिल्या पहिल्याने 'मी' नावाच्या या नव्या पाहुण्याकडे रुबाशॉव्ह बिलकुल लक्षच देत नाही. पण पुढे पुढे त्यालाच असे जाणवू लागते की हे बरोबर नाही. त्यामुळे आपण स्वतःशीच प्रतारणा करीत आहोत. स्वतःशीच नव्हे तर इतरांशीही प्रतारणा करीत आहोत. प्रतारणेची कल्पना रुबाशॉव्हच्या डोक्यात येते न येते तोच त्याला रिचर्ड, बुटका लोवी, आर्लोव्हा या सगळ्या सहकाऱ्यांचीही आठवण येते. 'या सर्वांशी आपण प्रतारणा केली होती, पण त्या प्रतारणेचे मूळ आत्मप्रतारणेत होते' हे मग त्याच्या ध्यानात येते. 'आपण प्रथम स्वतःला फसविले नि मग इतरांना फसविले' या आत्मवंचनेची किंमत चुकती केली पाहिजे. याही पापाची फेड केली पाहिजे हे त्याला पटते आणि तो त्याच्यावर करण्यात आलेल्या आरोपाची कबुली देतो. हे आरोप अतिशय लांछनास्पद असतात. हे आरोप कबूल करताच तो राष्ट्रद्रोही, पक्षद्रोही ठरणार होता. ज्या देशासाठी, ज्या पक्षासाठी तो कणाकणाने झिजला होता त्याच देशाचा, पक्षाचा त्याने द्रोह केला आहे असे त्याच्याकडून लिहून घेतले जात होते. तो ते मुकाट्याने लिहून देत होता. नंतर एक आणि कंपनीने त्याचे जे घृणास्पद सार्वजनिक चित्र रेखाटले होते ते चित्र आपणास मान्य आहे याचीच ती कबुली होती. अर्थात ग्लेटकिनच्या युक्तिवादाने खात्री पटल्याने त्याने हे केले नव्हते. तर त्या युक्तिवादाबरोबरच त्याला हे पटले की आपण आपल्या खऱ्या आत्म्याशी प्रतारणा केली आहे आणि त्यामुळे आपल्या सच्च्या मित्रांशीही प्रतारणा केली आहे. रुबाशॉव्ह कबुलीजबाबावर सही करतो नि त्याचे मन एकाएकी शांत बनते. सतत ठणकणारी त्याची दातदुखी थांबते. कबुलीजबाब दिल्यापासून डोक्यात गोळी घालून त्याचा वध करण्याचा क्षण उजाडेपर्यंत मधे जे काही तास असतात ते तास तो ''व्याकरणाच्या कल्पिताशी'' गप्पा मारण्यासाठी राखून ठेवतो.

''व्याकरणातले कल्पित'' संपूर्ण कादंबरीभर फक्त अधून मधून दर्शन देते. परंतु कादंबरीचा एकत्रित विचार करता या खंडित दर्शनांना निर्णायक महत्त्व आहे असे म्हणता

देते. हॅम्लेटच्या पात्रावाचून ज्या प्रमाणे हॅम्लेट नाटकाची कल्पनासुद्धा करता येत नाही तीच गोष्ट याही "या कल्पिताची" आहे. कादंबरीत हे "कल्पित" नसेल तर या कादंबरीचीही कल्पना करता येणार नाही. एका शब्दात या "कल्पिता"च्या पात्रावाचून 'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी म्हणजे डेन्मार्कच्या राजपुत्रावाचून हॅम्लेट नाटक होय. संदिग्धता हा एक उत्तम वाङमयीन कलाकृतीचा महत्त्वाचा गुण समजला जातो. संदिग्धतेमुळे वाचकाच्या कल्पनाशक्तीला उत्तेजन मिळते आणि तो स्वतंत्रपणे आपली कल्पनाशक्ती वापरण्याचा प्रयत्न करू लागतो असे मानले जाते. "व्याकरणात उगम पावणाऱ्या या कल्पितामुळे" या कादंबरीला मोठ्या प्रमाणावर कलात्मक संदिग्धता प्राप्त झाली आहे. संपूर्ण कादंबरीभर एका बाजूला रुबाशॉव्ह आणि दुसऱ्या बाजूला प्रारंभी ऐव्हानॉव्ह व मागाहून ग्लेटकिन या तिघांमधे जो चिवट पण प्रदीर्घ बौद्धिक लढा चालू असतो तो लढा केवळ या कल्पितामुळेच उत्तरोत्तर अधिकाधिक संदिग्ध बनत जातो. या कादंबरीच्या अर्थकारणात "कल्पिताच्या" घटकाचे स्थान खूपच महत्त्वाचे आहे. उलट ग्लेटकिनच्या शब्दकोशात आणि व्यवहारातही या घटकाला अजिबात महत्त्व नाही. नव्हे जागाच नाही. तीच गत रुबाशॉव्हची सुद्धा. त्याच्याही शब्दकोशात कल्पिताच्या घटकाला जागा नाही. रुबाशॉव्ह आणि चौकशी अधिकारी दोघांमधे अटीतटीची शाब्दिक चकमक सुरू असते. पण त्यातही 'कल्पिताला' जागा असू शकत नाही. कारण रुबाशॉव्ह या "कल्पिताच्या" उपस्थितीचा उल्लेख करू शकत नाही, आणि समजा त्याने तसा उल्लेख केला असता तरी ग्लेटकिनला त्याचे बोलणे कळले नसते. शिवाय रुबाशॉव्ह व ग्लेटकिन यांची जी शाब्दिक चकमक सुरू होती त्या चकमकीत "व्याकरणातून उत्पन्न झालेले कल्पित" घुसवायचे तर ते कसे हा एक प्रश्न होताच. असो. पण महत्त्वाचा मुद्दा असा की जर का कादंबरीमधे ही 'कल्पिता' ची कल्पना नसती तर संपूर्ण कादंबरी सपाट बनली असती. आज तिच्या ठिकाणी जो आकर्षकपणा आपणाला दिसत आहे तो कधीच दिसला नसता. पण कल्पिताच्या अस्तित्वामुळे संपूर्ण कादंबरीलाच उठाव प्राप्त झाला. वाचक कल्पिताशी परिचित आहे. खुद्द रुबाशॉव्हही कल्पिताशी परिचित आहे. परंतु ग्लेटकिन आणि मंडळी किंवा रुबाशॉव्हच्या विरोधकांना कल्पिताच्या अस्तित्वाची गंधवार्ताही नाही. त्यामुळे रुबाशॉव्ह एका कारणासाठी कबुलीजबाब लिहून देतो, तर ग्लेटकिन तो दुसऱ्याच कारणासाठी लिहून देण्यात आला आहे असे समजतो. त्याला ती रुबाशॉव्हची शरणागती वाटते. रुबाशॉव्हची जबानी घेत असताना त्याने त्याला जे निवांत झोपेपासून दूर ठेवले होते नि प्रत्यक्ष जबानी चालू असताना प्रखर प्रकाशाचा जो मारा त्याच्या डोळ्यावर सतत केला होता त्याचा तो अंतिम परिणाम आहे असे ग्लेटकिनला वाटते. डोळे दिपविणारा प्रकाश आणि बौद्धिक गोंधळ यांच्यामुळे आधीच घायाळ झालेल्या रुबाशॉव्हला जेव्हा ग्लेटकिन सांगतो की, तुझ्यावर करण्यात आलेल्या आरोपांचा जर तू कबुलीजबाब दिलास

तर तुझ्या हातून पक्षाची व देशाची अखेरची सेवा होणार आहे. तुझे उदाहरण दाखवून जनतेला शिकविता येणार आहे की पक्षासाठी व देशासाठी प्रचंड त्याग करणारी माणसेसुद्धा कधी कधी पक्षद्रोह आणि देशद्रोह करावयास उद्युक्त होतात, तेव्हा जनतेने सावध राहावे, तेव्हा त्या मोहाला रुबाशॉव्ह बळी जातो आणि कबुलीजबाबावर सही करतो. हा मोह तो टाळूच शकत नाही. कारण त्याच्या अंगात तितके त्राणच उरलेले नसते. वस्तुतः रुबाशॉव्हने खरी निष्ठा स्वतःच्या आत्म्याशी दाखवावयास हवी होती. ज्याचा उल्लेख तो 'मी' या प्रथमपुरुषी एकवचनाने करतो त्या 'मी' शी असावयास हवी होती. परंतु अखेरपर्यंत या 'मी' चे खरे स्वरूप त्याला ओळखता येत नाही. 'मी' चे खरे स्वरूप शोधून काढण्याइतका अवधीसुद्धा त्याच्यापाशी नसतो. रुबाशॉव्हला 'मी' ची खरी ओळख होत नाही. आणि ''मी'' च्या निष्ठेसाठी पक्षाबरोबरची निष्ठा तोडून टाकण्याचे धैर्य तो दाखवू शकत नाही. ''मी'' काय आहे हे जर का रुबाशॉव्हला आधी कळले असते तर ''पक्षाच्या अखेरच्या सेवेच्या'' युक्तिवादाला तो इतक्या सहजासहजी बळी पडला नसता. मोहाचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न तरी त्याने केला असता. पण रुबाशॉव्ह त्या मोहाला बळी पडतो. याचाच अर्थ रुबाशॉव्ह पूर्वीचा राहिलेला नाही. तो वृद्ध झाला आहे. त्याच्या शक्ती खच्ची झाल्या आहेत. त्याला शारीरिक व मानसिक थकवा आला आहे. एका शब्दात तो पराभूत, नव्हे आत्मपराभूत झाला आहे. वाचकाला ज्या क्षणी हे जाणवते त्या क्षणी रुबाशॉव्हबद्दल वाचकाच्या मनात अथांग प्रेम, अथांग करुणा उत्पन्न होते.

* * *

''व्याकरणातील कल्पिताच्या'' क्लुप्तीचा एक परिणाम आताच आपण वर पाहिला. परंतु कल्पिताची क्लुप्ती वापरून दुसराही एक परिणाम कोस्सलर यांनी साध्य केला आहे. कल्पिताची क्लुप्ती वापरल्याने कादंबरी लिहिताना जी ऐतिहासिक कच्ची सामग्री त्यानी हाताशी घेतली तिच्यात त्याना हवा तो फेरबदल करता आला. मूळ ऐतिहासिक दस्तऐवजामधे 'कल्पिता' ची नोंद नाही. 'कल्पिता' चा घटक त्यानी मागाहून भरीस घातला आहे. परंतु ऐतिहासिक सामग्रीमधे कोस्सलर यानी जो बळेच फेरबदल केला आहे तो क्षम्यच नव्हे तर स्वागतार्ह ठरला आहे. कारण त्यामुळे कादंबरीची रंगत अनेक पटींनी वाढली आहे आणि ही कादंबरी Roman a clef न राहता खऱ्या अर्थाने कादंबरी म्हणजे कल्पनाशक्ती वापरून तयार करण्यात आलेली साहित्यकृती झाली आहे. कल्पिताचा घटक जर का वापरला गेला नसता तर खऱ्या व्यक्तींचा व खऱ्या प्रसंगांचा इतिहास सांगणारी, कादंबरीच्या नावाखाली खपविण्यात आलेली चरित्रकथा अथवा 'रोमां अ क्ले' असे तिचे स्वरूप झाले असते. मूळ ऐतिहासिक सामग्रीत फेरबदल करून कोस्सलर यांनी ही कादंबरी रचली असल्याने कादंबरी वाचण्यापूर्वी कादंबरीला चालना देणाऱ्या मूळ



अनुक्रमणिका

माहितीचा शोध घेण्याचा वा मूळ माहितीशी कादंबरीतले चित्रण ताडून पाहाण्याचा असा कसलाही मोह वाचकाला होत नाही. आपण रुबाशॉव्हचे पात्र हेतुतः बोल्शेव्हिक क्रांतीमधे भाग घेणाऱ्या सुरवातीच्या नेतेमंडळींच्या नमुन्यावर तयार केले आहे असे कोस्सलर आपणास सांगतात. त्यानुसार रुबाशॉव्हचे पात्र, त्याचा चेहरामोहरा, त्याच्या नाकावरचा 'प्रिन्स - नेझ' चष्मा, हनुवटीवरची छोटी दाढी, त्याचे भेदक आविर्भाव, त्याचे एकूण बाह्य व्यक्तिमत्व हे सर्व विशेष त्यानी ट्रॉटस्की आणि राडेक या दोन क्रांतीकारकांवरून घेतले आहेत हे सहज पाहता येते. रुबाशॉव्हची बाह्य चेहरेपट्टी जर त्यानी ट्रॉटस्की आणि राडेकवरून घेतली होती तर तात्त्विक वाद घालण्याची त्याची पद्धती त्यानी बुखारीनवरून रंगविली होती. विरोधविकासवादी तार्किक पद्धतीने तात्त्विक वाद घालण्यात बुखारीन अतिशय कुशल होता. रुबाशॉव्हदेखिल या प्रकारच्या वादविवाद पद्धतीत कुशल आहे; आणि त्याचे कारण हे वैशिष्ट्य त्यानी बुखारीनवरून उचलले आहे हे होय. कम्युनिस्ट पक्षामधे अत्यंत प्रखर बुद्धीचा सैद्धांतिक म्हणून बुखारीनला खूप मान होता. आपल्या तीक्ष्ण बुद्धिमत्तेच्या जोरावर त्याने लेनिनचे हृदय आणि मन जिंकले होते. कादंबरीच्या अर्पणपत्रिकेत कोस्सलर स्वतः लिहितात की, "मास्को खटल्यांमधे ज्यांचा बळी गेला अशा अनेकांची जीवनचरित्रे एकत्र करून त्यातून एन्. एस्. रुबाशॉव्हचे पात्र मी निर्माण केले आहे. ज्यांच्या चरित्रांचा अशा प्रकारे मी उपयोग केला त्यापैकी बहुतेकांशी माझे मैत्रीचे संबंध होते." रुबाशॉव्हचे पात्र रंगवताना कोस्सलर यानी बुखारीन आणि इतर अनेकांची चरित्रे नमुना म्हणून जरी समोर ठेवली होती, तरी त्यात बुखारीनच्या चरित्राला त्यानी सर्वात अधिक महत्त्व दिले आहे असे म्हणता येते. कारण रुबाशॉव्हच्या अखेरच्या कैफियतीच्या नावाखाली जो मजकूर त्यानी दिला आहे तो मॉस्को खटल्यात दिलेल्या कैफियतीची जशीच्या तशी नक्कल आहे. तथापी याच कादंबरीतील "व्याकरणामुळे तयार होणारे कल्पित" हा भाग मात्र त्यानी कल्पनाशक्तीने तयार केला आहे. रशियन क्रांतीचा कालखंड घ्या किंवा त्यानंतरचा पक्षसफाईचा आणि पक्षातील मातवरांची मुंडकी छाटण्याचा कालखंड घ्या, दोन्हीपैकी एकाही कालखंडात बोल्शेव्हिक पक्षातील कुणा धुरीणाने हा अनुभव घेतल्याची नोंद नाही. तेव्हा हा भाग सर्वस्वी काल्पनिक असून त्यासाठी कोस्सलर यांच्या मूर्तिक कल्पनाशक्तीचे कौतुक करावयास हवे.

* * *

ग्लेटकिन जेव्हा रुबाशॉव्हची पोलीस चौकशी करतो तेव्हा क्रांतीच्या बाजूचा युक्तिवाद करतो. तसाच युक्तिवाद खुद्द रुबाशॉव्ह सुद्धा करतो. ग्लेटकिन आणि रुबाशॉव्ह दोघेही त्या प्रकारच्या युक्तिवादात निष्णात आहेत. मात्र दोघांच्या भूमिकेत एक सूक्ष्म फरक आहे आणि हा फरक असा की रुबाशॉव्हची तत्त्वज्ञानाकडे पाहाण्याची भूमिका अतिशय

लवचिक आहे. बदलत्या परिस्थितीनुरूप तत्त्वज्ञानाला मुरड घालणे आवश्यक ठरते ही गोष्ट त्याला मान्य आहे. असे केले तरच तत्त्वज्ञान व्यवहारातः उपयुक्त ठरते असे त्याला वाटते. याच्या उलट ग्लेटकिनची भूमिका अगदी राकट आहे. तत्त्वज्ञान हे त्याच्या दृष्टीने एक निर्जीव हत्यार आहे. हे हत्यार वापरून समोरच्या व्यक्तीला बौद्धिक दृष्ट्या जेरीस आणायचे आणि आपले म्हणणे मान्य करावयास भाग पाडायचे एवढाच तर्कशास्त्राचा आणि तत्त्वज्ञानाचा उपयोग होय अशी त्याची ठाम समजूत आहे. याचा अर्थ हे तत्त्वज्ञान वापरण्यात तो रुबाशॉव्हपेक्षा कमी कुशल होता असे नाही. त्या बाबतीत तो रुबाशॉव्हच्या तोडीस तोड आहे. किंबहुना ज्या प्रकारे आपला युक्तिवाद तो तर्काच्या अंतिम टोकाला भिडवतो त्यावरून तरी अशी खात्री पटते की याने क्रांतीचे तत्त्वज्ञान व्यवस्थितपणे पाठ केलेले आहे. रुबाशॉव्ह–ग्लेटकिन झगड्यात रुबाशॉव्ह चारी मुंड्या चीत झाला असून रुबाशॉव्हचाच युक्तिवाद ग्लेटकिनने रुबाशॉव्हच्या अंगावर उलटविला आहे. या झगड्यात रुबाशॉव्हला निर्णायक हार तर खावी लागलीच, परंतु ती हार खात असताना उरली सुरली प्रतिष्ठाही त्याला गमवावी लागली. किंबहुना रुबाशॉव्हचा बौद्धिक पराभव करता करता ग्लेटकिनने त्याची सगळी प्रतिष्ठाच त्याच्यापासून काढून घेतली आहे. रुबाशॉव्हचा हा पराजय इतका परिपूर्ण आहे की या टप्प्यावर 'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी पुन्हा एकदा संदिग्ध बनते. कारण वाचकाला हे समजत नाही की नायक रुबाशॉव्ह बरोबर की खलनायक ग्लेटकिन बरोबर. जर ग्लेटकिन बरोबर असेल तर कादंबरी पुढे वाचण्याचे कारणच नाही. नायक येथे संपलाच आहे.

वस्तुतः रुबाशॉव्ह आणि ग्लेटकिन या दोघांमधे राजकीय विषयावरून जी चर्चा चालू असते त्या चर्चेमुळे एका विशिष्ट टप्प्यावर ही कादंबरी राजकीय प्रचारासारखी वाटू लागते. किंवा दोन तुल्यबळ पक्षातला तो बौद्धिक झगडा (पॉलेमिक) आहे असे वाटू लागते. परंतु इतक्यात रुबाशॉव्हचा संपूर्ण बौद्धिक पराभव होतो आणि कादंबरी नव्या उंचीला चढते. कारण एकतर कादंबरी येथे संपू शकत होती किंवा कादंबरी पुढे सुरू ठेवायची तर तिला नवी कलाटणी देणे आवश्यक होते आणि वाचकाच्या दृष्टीने या नेमक्या जागी तिला नवी कलाटणी मिळालेली असते. आताच आपण वर म्हटले की बौद्धिक दृष्ट्या बरोबर कोण ? ग्लेटकिन की रुबाशॉव्ह ? समजा ग्लेटकिन बरोबर असला तरी रुबाशॉव्ह अंतिम आणि नैतिक अर्थानेसुद्धा खरोखरच चूक आहे काय ? आणि सहृदय आणि साक्षेपी वाचकाला जाणवते की ग्लेटकिनबरोबरच्या बौद्धिक झगड्यामधे रुबाशॉव्हचा जरी दारुण पराभव झाला आहे तरी रुबाशॉव्हशी तुलना करता ग्लेटकिन कधीही मोठा ठरू शकत नाही. नैतिकदृष्ट्या आणि एक केवळ माणूस म्हणूनही रुबाशॉव्ह इतका थोर आहे की ग्लेटकिनसारखे आणखी शंभर ग्लेटकिन भरीस घातले तरी ते रुबाशॉव्हची बरोबरी करू

शकणार नाहीत. तथापी रुबाशॉव्हबरोबर वाद घालताना ग्लेटकिनने जे तार्किक मुद्दे वापरले होते ते जर का विचारात घेतले तर आपणास रुबाशॉव्हप्रमाणेच हे कबूल करावे लागते की ग्लेटकिनचे म्हणणे सयुक्तिक आहे. तर्कशास्त्र आणि बौद्धिक पुरावा ग्लेटकिनच्या बाजूचा आहे. क्रमांक एकच्या सर्वंकष सत्तावादी भूमिकेवर आणि एकूण प्रवृत्तीवर रुबाशॉव्ह टीका करू पाहातो. परंतु ही टीका करण्याचा हक्कच रुबाशॉव्हला असू शकत नाही. रुबाशॉव्ह स्वतः क्रांतीसाठी क्रांती महत्त्वाची मानत होता. अशा परिस्थितीत आता प्रागतिक आणि उदारमतवादी मानवी मूल्यांच्या नावाने तो क्रांतीला कमी ठरवू शकत नाही. उदारमतवादी मूल्ये, प्रागतिक विचारसरणी हे शब्द त्याच्या तोंडी आता केवळ अगडबंब शब्दांच्या पोपटपंचीसारखे आहेत असे ग्लेटकिन त्याला बजावतो नि ते खरेच आहे. एकदा क्रांतीसाठी क्रांती श्रेष्ठ ठरविल्यावर नि त्या प्रमाणे कृती केल्यावर मागाहून अन्य कोठल्यातरी मानवी मूल्यांच्या तुलनेत क्रांती क्षुल्लक ठरवू पाहाणे म्हणजे मूळच्या तार्किक भूमिकेशी द्रोह करणे होय अशी ग्लेटकिनची भूमिका आहे व त्या भूमिकेत आपण दोष काढू शकत नाही. दुसरी गोष्ट म्हणजे रुबाशॉव्हने पक्षावर आणि क्रमांक एकवर केलेले दोषारोप खरे मानले आणि त्याप्रमाणे पक्षात व इतर ठिकाणी बदल केले तर त्याच्यामुळे पक्षाचे नाव गेले असते. सोव्हिएट युनियनचे नुकसान झाले असते आणि कदाचित जागतिक युद्ध सुद्धा सुरू झाले असते. जागतिक युद्ध सुरू झाले असते तर संपूर्ण मानवजातीलाच त्या युद्धाच उपसर्ग पोहोचला असता. ग्लेटकिनच्या या युक्तिवादातही तथ्य आहे.

हे सगळे परिणाम जेव्हा रुबाशॉव्हच्या लक्षात येतात तेव्हा तो स्वतःच घाबरतो. आपला क्रांतीवर पूर्वी विश्वास होता. आजही क्रांतीवर आपला विश्वास आहे. तीच गोष्ट सोव्हिएट युनियनची सुद्धा. सोव्हिएट युनियनच्या भल्यावर पूर्वी आपला विश्वास होता. आजही विश्वास आहे. अशा परिस्थितीत आपण कबुलीजबाब दिला नाही तर ती क्रांतीचे तत्त्वज्ञान आणि सोव्हिएट युनियन या दोघांशीही बेइमानी होईल हेही त्याला पटते. शिवाय हेअर-लिप किंवा ओठफाटक्याला (कादंबरीतील एक पात्र. याला रुबाशॉव्हच्या विरुध्द साक्षीदार म्हणून उभे केलेले आहे.) ग्लेटकिनच्या हजेरीत एक सरकारी साक्षीदार म्हणून प्रश्न विचारत असताना रुबाशॉव्हच्या हेही ध्यानात येते की पूर्वी ओठफाटक्याच्या वडिलांशी प्रचलित राजकीय परिस्थितीबद्दल चर्चा करताना आपण जे शेरे मारले होते त्याचा विपरीत अर्थ लावून ओठफाटक्याने नंबर एकचा जीव घेण्याचा प्रयत्न केला असणे सहज शक्य आहे. त्यामुळे ओठफाटक्याला नंबर एकचा काटा काढण्यासाठी रुबाशॉव्हने फूस दिली या ग्लेटकिनच्या आरोपात तथ्य असू शकत होते. तथापी असा काटा काढावयास पक्षातीलच कोणाला तरी प्रोत्साहन देणे हे क्रांतीच्या तत्त्वज्ञानाच्या विरुद्ध होते, एवढेच

नव्हे तर क्रांतीच्या नीतीशास्त्राप्रमाणे तो दहशतवाद होता आणि नंबर एक विरुद्ध अशा प्रकारची दहशतवादी कृती करण्याचा हक्क रुबाशॉव्हला नव्हता. पक्षाच्या पदाधिकाऱ्यांच्या उतरंडीत रुबाशॉव्हचा क्रमांक नंबर एकच्या खाली असल्याने, नंबर एकच्या जीवावर घाला घालण्याचे प्रयत्न करण्याचा हक्क रुबाशॉव्हला नव्हता. क्रांतीच्या नीतीशास्त्राप्रमाणे ते अवैध होते. तथापी हेच नीतीशास्त्र स्वतःची कातडी बचाविण्यासाठी आर्लोव्हाला बळी देण्याचा अधिकार रुबाशॉव्हला देत होते. तेथे युक्तिवाद असा होता की रुबाशॉव्ह हा क्रांतीच्या लढाईत एक आघाडीचा लढवय्या असल्याने त्याचे प्राण वाचले तर तो पुढे सुद्धा क्रांतीचे कार्य करू शकत होता. म्हणून क्रांतीचे नीतिशास्त्र अन्य कुणा छोट्या व्यक्तीचा प्राण घेऊन रुबाशॉव्हने स्वतःचा प्राण वाचविला तर त्याच्यावर आक्षेप घेत नाही. क्रांतीचे नीतिशास्त्र अशा कृती क्षम्य मानते. परंतु याच तर्कशास्त्राप्रमाणे रुबाशॉव्ह नंबर एकच्या प्राणावर उठू शकत नाही. कारण नंबर एक हा सुद्धा क्रांतीकारक असल्याने तो जगला तर क्रांतीचे कार्य पुढे जाणार आहे. सारांश, जे नीतिशास्त्र नंबर एकचा खून होऊ देत नाही तेच नीतिशास्त्र आर्लोव्हाचा खून मात्र बिनदिक्कत होऊ देते. क्रांतीच्या नीतिशास्त्रातील ही अंतर्गत विसंगतीसुद्धा रुबाशॉव्हच्या नव्या मनःस्थितीत रुबाशॉव्हला विचलित करते. मात्र ग्लेटकिन रुबाशॉव्हला स्पष्टच सांगतो की, ''तुला वाटत असेल की आपण क्रांतीचे नीतिशास्त्र पाळण्यासाठी व क्रांतीकार्य पुढे नेण्यासाठी आर्लोव्हाला बळी दिले आहे. पण ते खोटे आहे. खरी वस्तुस्थिती स्वतःची कातडी बचाविण्यासाठी तू आर्लोव्हाचा जीव घेऊ दिला आहेस.'' या नव्या स्थितीत 'तू अपराधी आहेस' हे रुबाशॉव्हच्या गळी उतरविणे ग्लेटकिनला अजिबात कठीण नव्हते. किंबहुना रुबाशॉव्हचे अपराधित्व इतके परिपूर्ण होते की त्याच्यावर केल्या गेलेल्या आरोपांपैकी एखादा आरोप जरी खोटा ठरला असता तरी त्यामुळे त्याच्या अपराधित्वाला अजिबात उणेपणा येत नव्हता. ग्लेटकिन–रुबाशॉव्ह वाद-प्रतिवादात कोस्सलर यानी ग्लेटकिनच्या तोंडी जो युक्तिवाद घातला आहे तो इतका भक्कम आहे की येथे कोस्सलर सैतानाचे वकिलपत्र घेतल्यासारखे वागतात आणि खोटी बाजू खरी करून दाखवितात असे या कादंबरीच्या अनेक वाचकांना वाटते.

* * *

वाचकाला जेव्हा हे सर्व जाणवते तेव्हा तो केवळ बधिर बनतो. कारण हे सर्व वातावरण एखाद्या दुःस्वप्नासारखे आहे नि ते निर्माण करण्यात कोस्सलर पूर्णपणे यशस्वी झाले आहेत. शिवाय तात्त्विक सोडून प्रत्यक्ष घटनांशी संबंधित तपशील रंगविताना कोस्सलर यांनी ज्या काटकसरीने शब्दयोजना केली आहे त्यामुळेही सगळे तपशील सजीव होऊन उठतात आणि स्वप्नाची कल्पना अधिक तीव्र बनते. नमुना म्हणून तुरुंग आणि

त्या तुरुंगातील कैद्यांचे कोस्सलरनी केलेले वर्णन पाहाता येईल. हे वर्णन केवळ सूचक आहे. कमीत कमी शब्दात केलेले. कमीत कमी तपशील देणारे. तरीही ते अत्यंत भेदक बनले आहे. तुरुंग मधमाशांच्या पोळ्यासारखा. कैद्यांची बराक. छोट्या छोट्या कोठड्या. मधे लांबलांब व्हरांडा. कैद्यांची संख्या दोन हजारावर. प्रत्येकाला एकांतकोठडी. कोठडीला फक्त एक झरोका. तो सुद्धा खूप उंचावर. कैदी स्वतःच्या खाजगी विचारात व्यग्र. हरएकाच्या दैवात छळ किंवा मारझोड किंवा हातपायबोटे छाटणे किंवा फाशी यापैकी काही ना काही लिहिलेले. दोन्ही बाजूच्या दरकींच्या मधून जाणारा व्हरांडा. व्हरांड्यात दर दिवसरात्र जळणारे दिवे. दिवे अंधुक प्रकाशाचे. सगळीकडे भीषण शांतता. आवाज झालाच तर तो पहारेकऱ्यांच्या बुटांचा किंवा कोठडीचा कडीकोयंडा काढताना होणारा किंवा मारझोड सहन न होऊन कैद्याने मारलेल्या किंकाळीचा. हे सर्व फक्त रात्रीच्या वेळी. बाहेर सर्व शांत असताना. हा तुरुंग ही जणू भयानक अशी प्रयोगशाळा आहे नि माणसांची सालडी काढून त्यांच्या मज्जातंतूंचे निरीक्षण करण्याचा प्रयोग येथे सुरू आहे. गिनीपिगसारखी वापरली जाणारी माणसे. मोजक्या शब्दात कोस्सलर हे सर्व आपल्या डोळ्यासमोर उभे करतात.

हे सर्व अतिशय सूचकतेने साधलेले आहे. त्यात कोठेही अनावश्यक तपशील येत नाहीत. कैद्यांनी मारलेल्या किंकाळयांचे वर्णन कोस्सलर करतात. रात्रीच्या शांत वेळी त्यांनी केलेल्या रुदनाचे, त्यांच्या विव्हळण्याचे वर्णनही तेथे आले आहे. परंतु प्रत्यक्ष शारीरिक छळाचे तपशील मात्र कोठेही दिलेले नाहीत. कोस्सलर यांचा मुख्य भर, ज्या वैचारिक कल्पना अंमलात आणण्याच्या महत्त्वाकांक्षेतून हा छळ केला जात होता, त्या कल्पना या लोकांना त्यांच्या धमन्यातील रक्ताभिसरणाइतक्याच महत्त्वाच्या कशा वाटत होत्या हे दाखविण्यावर आहे. या कादंबरीचे एक महत्त्वाचे यश आणि कादंबरीच्या क्षेत्रात जे क्वचितच पाहावयास सापडते ते म्हणजे, वैचारिक अमूर्त कल्पना कमालीच्या सजीव करण्यात, जिवंत बनविण्यात, खरोखरीच्या वाटावयास लावण्यात कोस्सलर अत्यंत यशस्वी झाले आहेत हे होय. या कादंबरीतल्या कल्पनांना रक्ताचा वास आहे, रक्ताची चव आहे हासुद्धा या कादंबरीच्या भयानकतेचा एक भाग आहे. परंतु या कादंबरीचा एक मोठेपणासुद्धा येथेच आहे. ही कादंबरी कल्पनांना येणारा रक्ताचा वास नि चव जेवढ्या समर्थपणे रंगवते तेवढ्याच समर्थपणे रक्ताचा हा डाग कदाचित घालविला सुद्धा जाऊ शकतो हेही त्याचवेळी दाखवून देते.

प्रुस्त (१८७१–१९१२; 'रिमेंब्रन्स ऑफ थिंग्ज पास्ट' या कादंबरीचा कर्ता) ह्या फ्रेंच कादंबरीकाराच्या मते खऱ्या अर्थाच्या कोठल्याही अभिनव (ओरिजिनल) कलाकृतीचे मूल्य जाणले जाण्यासाठी मधे अनेक वर्षे उलटावी लागतात. कलाकृतीच्या

जन्मानंतर खूप वर्षे उलटली म्हणजेच हळूहळू तिचे महत्त्व कळू लागते. तिचे सौंदर्य पटू लागते. कोस्सलर यांच्या 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीच्या बाबतीत हे मत शब्दशः खरे ठरले आहे. या कादंबरीचे पूर्ण महत्त्व कळून येण्यासाठी बरीच वर्षे उलटावी लागली. किंबहुना एक महायुद्ध घडून गेल्यानंतर आणि त्या महायुद्धापाठोपाठ एकूण जागतिक राजकीय भूमिकेमधे आमूलाग्र बदल घडून आले तेव्हाच कोठे ह्या कादंबरीत जे काही सांगितले गेले त्याच्याकडे लोकांचे लक्ष वेधले.

अगदी प्रथम १९४० मधे इंग्लंडमधे ही कादंबरी प्रसिद्ध झाली नि तिच्यावर अनेक समीक्षालेख लिहून आले ही गोष्ट जरी खरी असली, तरीसुद्धा प्रकाशनाच्या पहिल्या वर्षी या कादंबरीच्या फक्त चार हजार प्रती काय त्या संपल्या होत्या. किंग्जले मार्टीनच्या (१८९७–१९६९ — न्यू स्टेट्समन या पत्राचा संपादक) मते "या युगात जी अनेक पुस्तके प्रसिद्ध केली गेली त्यापैकी दीर्घकाळ टिकून राहू शकेल असे हे पुस्तक आहे." मात्र कादंबरीचे राजकीय महत्त्व विचारात घेऊन किंग्जले मार्टीन यांनी हे मत दिले नव्हते. त्यांचे हे मत शुद्ध वाङ्मयीन स्वरूपाचे होते आणि हे मत केवळ वाङ्मयीन स्वरूपाचे होते, त्यात राजकीय परिस्थितीचा नाममात्रही विचार नव्हता, एका उत्तम कादंबरीबद्दल आपण बोलत आहोत या थाटाचे हे मत होते हे पाहाण्यासाठी फार दूर जाण्याची गरज नाही. किंग्जले मार्टिन हे त्या काळातील ब्रिटनमधील एक प्रागतिक आणि जहाल उदारमतवादी विचारवंत. जेव्हा ते आणि त्यांच्याचसारखे अन्य प्रागतिक आणि जहाल उदारमतवादी लोक कोस्सलर यांनी एक उत्तम कादंबरी लिहिली म्हणून कोस्सलर यांच्यावर स्तुतिसुमने उधळीत होते, त्याचवेळी सोव्हिएट युनियनमधे स्टॅलिन एकापेक्षा एक घोर कृत्ये करण्यात व्यग्र होता, आणि किंग्जले मार्टीन आणि ब्रिटनमधल्या प्रागतिकांना त्याचे काहीही वाटत नव्हते. कोस्सलर यांच्या कादंबरीचा एकूण रोख समजून घेऊन जर का त्यांनी ती कादंबरी वाचली असती तर असे निश्चित घडले नसते. कारण मग त्याना ती केवळ एक वाङ्मयीन कृती आहे असे न वाटता कम्युनिस्ट विचार आणि आचार याच्यावरचे ते सखोल भाष्य आहे हे उमजले असते आणि ते निश्चित स्वरूपाची राजकीय भूमिका घ्यावयास प्रवृत्त झाले असते. परंतु तसे घडले नाही. स्टॅलिन आणि स्टॅलिनची राजवट याच्याबद्दल त्यानी एक घाऊक भूमिका घेऊन ठेवली होती आणि ही भूमिका घेताना त्याचवेळी डोळ्यांवर झापडेसुद्धा बांधून टाकली होती. परिणामी स्टॅलिनच्या ज्या गोष्टी त्याना आवडत होत्या त्याची ते स्तुती करीत होते नि ज्या आवडत नव्हत्या त्यांच्याकडे सोयीस्करपणे दुर्लक्ष करीत होते. साहजिकच स्टॅलिनच्या राजवटीचा प्रसाद खुद्द त्याना स्वतःला मिळाला नसल्याने सोव्हिएट युनियनमधे स्टॅलिन जे अनन्वित अत्याचार करीत होता ते त्याना क्षम्य वाटत होते. क्रांतीनंतरच्या पहिल्या काही दशकात असेच घडणार अशी त्यांची सोयीस्कर समजूत

होती आणि या समजुतीच्या मागे दडून सर्वंकषसत्ताशाहीच्या बाबतीत जी ठाम भूमिका विचारवंतांकडून अपेक्षित असते ती ते टाळीत होते. थोडक्यात म्हणजे सोव्हिएट युनियनमधील स्टॅलिनची सर्वंकषसत्तासाठी हा अपघात नसून तो नियम आहे, कम्युनिस्ट विचारसरणी स्वीकारली की त्या विचारसरणीमुळे मनुष्य सर्वंकपसत्ताशाहीकडेच जाणार ही गोष्ट ते कबूल करू इच्छित नव्हते. पुढे दुसरे महायुद्ध सुरू होता होताच स्टॅलिनने हिटलरच्या नाझी जर्मनीबरोबर एक करार केला (या कराराला नाझी–सोव्हिएट पॅक्ट किंवा हिटलर स्टॅलिन पॅक्ट असे म्हणतात. २३ ऑगस्ट १९३९ या दिवशी हा करार केला गेला. पुढील दहा वर्षांत कोणी कोणावर लष्करी हल्ला करायचा नाही असे या तहाचे मुख्य कलम होते. याच तहाला एक गुप्त कलम होते. या गुप्त कलमाप्रमाणे यदाकदाचित लष्करी कारवाईचा प्रसंग आल्यास प्रत्येक देशाने कोणत्या सीमारेषा पाळाव्यात तेसुद्धा ठरवून ठेवले होते. पोलंड, फिनलंड व बाल्टिक स्टेट या सीमारेषा होत्या. १ सप्टेंबर १९३९ या दिवशी जर्मनीने पश्चिम पोलंडवर स्वारी केली आणि दुसऱ्या महायुद्धाला प्रारंभ झाला. १७ सप्टेंबरला सोव्हिएट युनियनने पूर्व पोलंडवर स्वारी केली. २८ सप्टेंबर या दिवशी जर्मनी व सोव्हिएट युनियनमधे 'जर्मन–सोव्हिएट बाऊंडरी व फ्रेंडशिप' नावाचा दुसरा तह झाला. या दुसऱ्या तहाने दोन्ही राष्ट्रांनी आपापसात पोलंडची वाटणी करून घेतली. पुढे सोव्हिएट युनियन आणि रशिया यांच्यात कोणी कोणता प्रदेश वाटून घ्यायचा यावरून मतभेद झाले आणि १८ डिसेंबर १९४० रोजी हिलटरने 'ऑपरेशन बार्बारोस्सा' ही मोहीम आखली. मोहिमेचा हेतू 'झटपट हल्ला करून सोव्हिएट रशियाला चिरडून टाकणे' हा होता.) परंतु पुढे या कराराला हरताळ फासून सोव्हिएट युनियन जर्मनीच्या विरोधात दोस्तांच्या बाजूला आली. हे सर्व तथाकथित "घोर दगलबाजीनंतर" घडून आले. हिटलरने जेव्हा सोव्हिएट युनियनला चिरडून टाकण्याचे ठरविले तेव्हा स्टॅलिनला अटलांटिक सत्तांच्या बाजूने युद्धात उतरण्यावाचून गत्यंतर राहिले नाही. (अटलांटिक सत्ता म्हणजे ब्रिटन आणि अमेरिका या सत्ता होत. ऑगस्ट १९४१ मधे अमेरिकेच्या बाजूने प्रेसिडेंट रुझवेल्ट व ब्रिटनच्या बाजूने पंतप्रधान चर्चिल यांनी त्यांच्या मध्य अटलांटिक भेटीत संयुक्त जाहीरनामा काढला. या जाहीरनाम्याला अटलांटिक सनद म्हणतात. या चार्टरची आठ मुख्य तत्त्वे होती.) सोव्हिएट युनियन अटलांटिक सत्तांच्या बाजूने दुसऱ्या महायुद्धात उतरली आणि दोस्तांच्या विजयास तिने फार मोठा हातभार लावला. सोव्हिएट युनियन दोस्तांच्या बाजूने युद्धात उतरल्याने किंग्जले मार्टिनसारख्यांना स्टॅलिनबद्दल नवी सहानुभूती उत्पन्न झाली किंवा अधिक बरोबर म्हणजे आधीपासून जी सहानुभूती होती ती दृढ झाली. थोडक्यात असे की कोस्लर यांच्या कादंबरीची खरी दखल घेतली गेली नाही. इतर कादंबऱ्यांसारखी सामान्य कथा सांगणारीच ही सुद्धा एक कादंबरी आहे. कदाचित या अन्य कादंबऱ्यांपेक्षा थोडी वरच्या दर्जाची, असे तिच्याबद्दल अनेकांना वाटे. असो.



अनुक्रमणिका

युद्धात उतरण्यामागची सोव्हिएट युनियनची उद्दिष्टे दोस्तांच्या उद्दिष्टांपेक्षा भिन्न होती. परंतु मैत्री टिकवून धरण्याच्या हेतूपोटी युद्धकाळात या गोष्टीकडे दुर्लक्ष करण्यात आले किंवा मुद्दाम लक्षच दिले गेले नाही. आणि कोस्सलर यांनी त्यांच्या कादंबरीत जो धोक्याचा गर्भित इशारा दिला होता तो विचारात घेतला गेला नाही. किंबहुना अनेकांनी तर कोस्सलरना दगलबाजच ठरविले. फॅसिझमच्या विरोधात कम्युनिझमने दोस्तांची साथ केली असल्याने आणि नाझीवादाचा पराभव करण्यास कम्युनिझमने हातभर लावला असल्याने, अनेकांच्या मताने कम्युनिझम ही जगाची नवी आशा ठरली होती. अशा वेळी कोस्सलर कम्युनिझमची साथ सोडून कम्युनिझमला विरोध करीत होते. अनेकांना हे पसंत नव्हते. यासाठी ते कोस्सलरना दोष देत होते.

युद्ध संपता संपता सोव्हिएट युनियन आणि दोस्त राष्ट्रे दोन्ही कशी दोन वेगवेगळ्या उद्दिष्टांसाठी प्रयत्न करीत होती हे स्पष्ट झाले. युद्ध संपल्यानंतर तर सोव्हिएट युनियन आणि स्वतंत्र बनलेल्या युरोपातील स्थानिक कम्युनिस्ट पक्ष या सर्वांनी आपले खायचे दात दाखवावयास सुरुवात केली. एका शब्दात कम्युनिझमची प्रकृती आणि कार्यपद्धती 'भर मध्यान्हीचा अंधार' या कोस्सलर प्रणीत कादंबरीत वर्णिल्याप्रमाणे आहे हे त्यानी आपल्या वर्तनाने सिद्ध केले. कम्युनिस्ट राजवटीत राहायचे म्हणजे काय याचे खरे चित्र लोकांना तेव्हा स्वतःच्या अनुभवावरून अगदी पहिल्याने कळून आले. आपल्या कादंबरीत कोस्सलर यांनी जे चित्र रेखाटले होते त्याच्यापेक्षा हे चित्र वेगळे नव्हते.

एव्हाना क्रमांक एक ने आपल्या सर्वंकषसत्ताशाहीची कक्षा खूपच वाढविली होती. या कक्षेच्या प्रभावाखाली जे देश आले तेथे कम्युनिझम हा कायमचा आयुष्यक्रम बनला. परंतु त्याच्या बाहेरील देशात सुद्धा कम्युनिझमचा प्रभाव वाढीस लागला. जर्मन सैन्याला विरोध करण्यासाठी ठिकठिकाणी प्रतिकारसेना स्थापन झाल्या. आणि कम्यनिस्ट पक्षांना अनेक युरोपिय देशात आयतेच पक्षसभासद मिळाले. जेथे जेथे कम्युनिस्ट पक्ष आणि त्या पक्षाला मदत करणारे रशियन लष्कर गेले तेथे तेथे कम्युनिझम आणि सर्वंकपसत्ताशाहीचे वर्चस्व प्रस्थापित झाले. सारांश अनेक देशांमधे सत्तेची मिरासदारी कम्युनिस्ट पक्षांकडे आली. नि हे पक्ष ती सत्ता राबवू लागले. मात्र ही सत्ता त्यानी अशा प्रकारे राबविली की जगातल्या सर्वच्या सर्व लोकांनी ग्लेटकिनच्या पाठीवर शाबसकीची थाप मारली. परंतु त्याच वेळी ज्याना त्या सत्तेची झळ पोहोचली होती ते कपाळावर हात मारून घेत होते आणि सत्तधाऱ्यांवर शिव्याशापांचा वर्षाव करीत होते.

हा प्रकार काय होता हे फ्रान्सच्या उदाहरणावरून स्पष्ट करता येईल. जर्मनीच्या वर्चस्वाखालून फ्रान्स स्वतंत्र झाला आणि कम्युनिस्ट पक्ष व जर्मनांचा प्रतिकार करण्यासाठी

फ्रान्समधे स्थापन झालेले पण कम्युनिस्ट पक्षाच्या नियंत्रणाखाली काम करणारे फ्रेंचांचे गट, या सर्व मंडळींना पुढील काही वर्षे फ्रान्समध्ये स्वतःचे राजकीय कार्य चालविण्याची संधी मिळाली. कम्युनिस्ट पक्षाने या संधीचा उपयोग जमेल तेथे पक्षाच्या विरोधकांचा काटा काढण्यासाठी केला. 'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी फ्रान्समधे १९४६ साली प्रसिद्ध झाली. ही कादंबरी फ्रान्समधे जेव्हा प्रसिद्ध झाली तेव्हा फ्रान्समधले राजकीय वातावरण अतिशय दिघडलेले होते. द गॉल सत्ता काबीज करण्यासाठी प्रयत्न करीत होते. परंतु त्यांचा बेत सफल होईल अथवा नाही याबद्दल कोणीही खात्रपूर्वक सांगू शकत नव्हता. तसेच द गॉल सत्ता मिळविण्यात यशस्वी झाले तरी त्यांचा कारभार कितपत यशस्वी होईल याहीबद्दल जनतेत साशंकता होती. फ्रेंच घटनेच्या बाबतीत फ्रेंचांचे सार्वमत शेवटी काय ठरवील याचीही खात्री देता येत नव्हती. असा तो काळ होता. सगळ्या दृष्टीने आणीबाणीचा. आणि अशावेळी कोस्सलर यांची ही कादंबरी बाहेर आली. पण बाहेर आली ती कादंबरी वाङमयाच्या खपाचा उच्चांक मागे टाकीतच. ही कादंबरी बाजारात येते न येते तोच तिच्या ४,००,००० वर प्रती खपल्या; आणि युद्धपूर्वकाळात पुस्तकांच्या खपाचा जो उच्चांक होता तो या कादंबरीने (अर्थात अनुवादित) मोडला. ही कादंबरी इतक्या जोरात खपली त्याला कारण तत्कालिन फ्रान्समधली राजकीय वातावरण. हे वातावरण कम्युनिस्टांच्या विरुध्द पेटलेले होते. 'भर मध्यान्हीचा अंधार' जेव्हा प्रसिद्ध झाली त्या काळात जर कम्युनिस्टविरोधी वातावरण नसते तर या कादंबरीला इतके मोठे आणि इतके शीघ्र यश मिळाले नसते. असे म्हणतात की फ्रान्समधील सार्वमतामधे कम्युनिसट पक्षाला जो पराभव पत्करावा लागला त्यात या कादंदरीची कामगिरी फार मोठी होती.

गंमत म्हणजे या कादंबरीच्या खपाला व यशाला खुद्द कम्युनिस्ट पक्षानेच हातभार लावला होता. कम्युनिस्ट पक्षाला अशी भीती वाटली की ही कादंबरी जर का लोकांच्या हातात पडली तर आपली अडचण होईल. 'आम्ही लोकशाहीच्या व प्रगतीच्या बाजूने स्वतःचा प्रचार करतो. ही कादंबरी लोकांनी वाचली तर आमच्या त्या प्रचाराचा बट्याबोळ होईल. ही कादंबरी हा आमच्या पक्षाच्या दृष्टीने एक भयंकर टाइमबाँबच आहे. तेव्हा तिच्या प्रसारात व्यत्यय आणावयास हवा' असे ठरवून कम्युनिस्ट पक्षाने डार्कनेस ॲट नूनच्या मिळतील तितक्या प्रती जाळून टाकण्याचा सपाटा चालविला. आणि त्याचवेळी स्वतःच्या प्रचारयंत्रणेच्या द्वारा कोस्सलरना बदनाम करण्याचीही मोहीम पक्षाने उघडली. परंतु त्याचा परिणाम अगदी उलटा होऊन बदनामीमुळे अधिक लोकांचे लक्ष कादंबरीकडे वेधले नि तिचा खप वाढला. काही दिवसांपर्यंत तर अश्लील कादंबऱ्या जशा दुर्लभ असल्याने अधिक किंमत देऊन वाचल्या जातात तसे या कादंबरीचे झाले.

तेव्हापासून तर आजतागायतपर्यंत 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीला

राजकीय प्रश्नावरची एक उत्तम कादंबरी आणि श्रेष्ठ वास्तवदर्शी दस्तऐवज म्हणून मान मिळत आहे. ज्या कालखंडाबद्दल ही कादंबरी आहे त्या कालखंडाबद्दलचे आमचे ज्ञान या घटकेला पूर्वीच्या मानाने कितीतरी पटीने सुधारले आहे. तरीही किंवा बहुदा कदाचित त्याच्याहीमुळे असावे, या कादंवरीने वाङमय क्षेत्रात एकदा मिळविलेले नाव आजदेखिल पूर्वीसारखेच टिकून आहे. अलिकडे प्रसिद्ध झालेले रॉबर्ट क्वान्क्वेस्ट या लेखकाचे 'द ग्रेट पर्ज' हे पुस्तक घ्या. कोस्सलर यांच्या कादंबरीप्रमाणेच हे पुस्तकसुद्धा स्टॅलिनकालिन रशियाबद्दल माहिती सांगते. या दोन पुस्तकांमधे फरक असलाच तर तो एवढाच आहे की, 'द ग्रेट पर्ज' मधले तपशील अधिक विस्ताराने आहेत. कादंबरीत ते तितक्या विस्ताराने नाहीत. तसेच 'द ग्रेट पर्ज' मधील तपशील जास्त साधार आहेत; कादंबरीत असे आधार दिलेले नाहीत. एवढ्या दोन बाबी सोडल्यास कोस्सलर यांची कादंवरी आणि 'द ग्रेट पर्ज' या दोन पुस्तकांमधे फरक नाही. 'द ग्रेट पर्ज' हे पुस्तक कादंबरीत सांगितलेल्या सत्याला फक्त दुजोरा देते. नि हीच गोष्ट या विषयावरच्या अन्य पुस्तकांची सुद्धा आहे. ही पुस्तके देखिल कोस्सलरनी सांगितलेल्या हकीकतिला फक्त दुजोरा देतात.

तथापी वरील विधानामुळे जर का कोणी असे म्हणेल की 'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी फक्त भूतकाळाबद्दलच सांगू इच्छिते तर ते खरे नाही. ही कादंबरी स्टॅलिनच्या काळातील रशिया नि कम्युनिस्ट पक्ष यांच्याबद्दलच केवळ माहिती सांगत नाही, वा भूतकाळाबद्दल केवळ भाष्य करते असे नसून ती आगामी काळाबद्दलही भाष्य करते. नुसते भाष्य करते असे नव्हे तर पुढील काळाबद्दलचे भाकितही करते; आणि पुढील काळावर परिणामही करते. या कादंबरीचे हे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य असून या एका वैशिष्ट्यामुळे अशाच प्रकारच्या राजकीय विषयावरील कादंवऱ्यांपेक्षा ती वेगळी ठरली आहे. आपण म्हटले की या कादंबरीने भावी काळाबद्दल भाष्य केले आहे नि भावी काळावर परिणामही केला आहे. यावर कोणी असे विचारील की हे खरे कशावरून ? तर त्याला उत्तर हे की जगात जेथे जेथे कम्युनिस्ट राजवटी आहेत तेथे तेथे परत परत 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीची उजळणी होताना दिसून येते याचा अर्थ काय ? याचा अर्थ हाच नाही काय की 'भर मध्यान्हीचा अंधार' या कादंबरीने भविष्यकाळात कम्युनिस्ट राजवटींमधे काय होऊ शकेल याची पूर्वसूचना जगाला दिली होती ? आणि या कादंबरीने जगाला पूर्वसूचना दिली होती हे जर का आपण मान्य केले तर त्याचा अर्थ कादंबरीने जगाला शहाणे करायचा प्रयत्न केला होता असाच नाही का करावा लागणार ?

'महान पक्षसफाईचा कार्यक्रम' या नावाखाली एकोणिसशेतिशीत एक भीषण नाटक मॉस्कोमधे केले गेले होते. बरोबर पंधरा वर्षांनी प्रागमधे याच नाटकाची नवी आवृत्ती केली गेली आणि या नव्या आवृत्तीमधे मास्कोतील मूळ नाटक आणि त्या नाटकावर

आधारीत 'भर मध्यान्हीचा अंधार' ही कादंबरी, या दोन्ही संहितांची बारीक सारीक तपशिलांसह घृणा येईल इतक्या प्रमाणात नक्कल करण्यात आली होती. यात सुद्धा चमत्कार असा की क्रांतीचा संदेश जणू पुन्हा एकदा नव्याने देण्यासाठी, खुद्द रुवाशॉव्हने थडग्यातून उठून बाहेर यावे तसे त्या खटल्यांच्या वेळी एका टप्प्यावर घडून आले आणि कलेने निसर्गाची नक्कल करण्याऐवजी निसर्गच कलेची नक्कल करू लागला.

प्राग ही झेकोस्लोव्हाकियाची राजधानी. सोव्हिएट युनियनच्या पावलावर पाऊल टाकून झेकोस्लोव्हाकियाच्या कम्युनिस्ट पक्षानेसुद्धा पक्षसफाईचा कार्यक्रम हाती घेतला. सोव्हियत युनियनच्या कार्यक्रमाबरोबर नव्हे, थोड्या उशीरा. साधारण पंधरा एक वर्षानंतर. १९५० च्या दरम्यान. पक्षसदस्यांवर हे जे पोलीस खटले दाखल होत होते त्यांची सांगता १९५२ मधे झाली. रुडॉल्फ स्लॅन्स्कीवरील खटल्याने. रुडॉल्फ स्लॅन्स्की हा कम्युनिस्ट पक्षाचा एक खंदा कार्यकर्ता होता. स्लॅन्स्कीबरोबरच व्लाडो क्लेमेन्टीस यालासुद्धा त्याच खटल्यात अडकविण्यात आले होते. व्लाडो क्लेमेन्टीस हा झेकोस्लोव्हाकियाचा परराष्ट्र सचिव. आणखीसुद्धा बारा आरोपी त्याच खटल्यामधे होते. खटला सुरू असताना या सर्वांनी आपल्या गुन्ह्याची कबुली लिहून दिली. खरे तर या लोकांवर करण्यात आलेले आरोप बनावट आणि खोटे होते. कारण खटलेच बनावट होते आणि तरीसुद्धा या सर्व लोकांनी आपल्यावरचे आरोप मान्य केले होते. हा त्यातील चमत्कार. गुन्ह्याची कबुली दिल्यावर गुन्हेगारांपैकी काहींना फासावर चढविण्यात आले, तर उरलेल्यांना जन्मठेपेची शिक्षा दिली गेली. गुन्हेगार आरोपींमधे 'ऑटो काल्झ' उर्फ 'आंद्रे सीमाँ' हाही एक होता. आंद्रे सीमाँ हा कोस्लरचा एकेकाळचा सहकारी मित्र आणि म्युन्झेनबर्ग मंडळाचा सभासद. या आंद्रे सीमाँने त्याच्या पापाची, म्हणजे पक्षद्रोह, देशद्रोह इत्यादी जे आरोप त्याच्यावर करण्यात आले होते त्या सर्व आरोपांची जाहीर कबुली दिली. ही कबुली देताना त्याने जे भाषण केले. ते भाषण उपरोधिक शैलीचा एक उत्कृष्ट नमुना होता. कबुली देताना त्याने रुवाशॉव्हच्या शेवटच्या भाषणाची विनोदी नक्कल केली होती आणि रुवाशॉव्हचे ते भाषण अफगाणिस्तानच्या बुखारीनच्या भाषणाची नक्कल होती. आपल्या जबाबात सीमाँ म्हणतो की, "मी जो गुन्हा केला आहे त्या गुन्ह्यासाठी मरेपर्यंत फाशी हीच खरी शिक्षा होय. माझ्या गुन्ह्याला हेच बक्षीस खरोखर शोभून दिसेल; आणि तीच माझी खरी लायकी आहे. माझ्या जातीचे इतर जे कुणी आपल्या जन्मजात स्वभावामुळे अथवा निव्वळ जन्मामुळेही ज्या मार्गाने मी गेलो त्याच मार्गाने जाण्याचा संभव आहे. त्यांच्यासाठी माझे आयुष्य हा एक धोक्याचा इशारा ठरू शकेल असे मला वाटते. माझ्या हातून पक्षाची घडू शकेल अशी ही अखेरचीच सेवा. म्हणून माझी अशी विनंती आहे की मला जितकी जास्तीत जास्त कडक शिक्षा ......" येथे सीमाँ घुटमळला नि त्याचा आवाज ऐकू येईनासा झाला.

कोस्सलर सांगतात की सीमाँची ती जबानी ही रुवाशॉव्हच्या अखेरच्या निवेदनाची मुद्दाम केलेली चेष्टा होती. अशी चेष्टा करून ज्याना समजण्यासारखे होते त्याना त्याला हे सांगायचे होते की 'माझी जबानी गंभीरपणे घेऊ नका. ती खरी नाही. मी चेष्टा करीत आहे.' ही जबानी देऊन झेकोस्लोव्हाकियाबाहेरच्या त्याच्या मित्रांना त्याला आणखी असे सुचवायचे होते की, स्पेनमधे कोस्सलर जेव्हा अशाच संकटात सापडला होता तेव्हा त्याने (म्ह. सीमाँने) आणि म्युअझेनबर्ग या दोघांनी खटपटी लटपटी करून कोस्सलरचा जीव वाचविला. आता त्यानीही तसेच काही प्रयत्न करावेत व सीमाँचा जीव वाचवावा.

तथापी 'भर मध्यान्हीचा अंधार' ची आठवण होण्यासाठी सीमाँच्या अखेरच्या जबानीची आठवण जागी झाली पाहिजे असेच काही नाही. सीमाँची जबानी जरी आठवली नाही तरी सुद्धा कोस्सलरी यांची कादंबरी आठवू शकते. याच घडामोडींबद्दल आणखी दुसरे अनेक दस्तऐवज आता उपलब्ध आहेत. १९६० च्या उन्हाळ्यात गेलेले स्वातंत्र्य परत मिळविण्याचे प्रयत्न झेकोस्लोव्हाकियामधे केले गेले होते. या प्रयत्नाना यश आले नाही, ते फसले. परंतु त्या निमित्ताने स्लान्स्की खटल्याबद्दल बरेच लिहून आले होते. सीमाँचा खटला हा स्लान्स्की खटल्याचा एक भाग असल्याने त्याही खटल्याचा त्यावेळी परामर्ष घेतला गेला; नि सीमाँच्या खटल्याबद्दल अनेक प्रकारचे तपशील बाहेर आले. त्यापैकी काही माहिती साररूपाने एका लेखात आली आहे. या लेखाचे शीर्षकच मुळी 'कोस्सलर - रिव्हिजिटेड' – 'कोस्सलर यांची पुन्हा भेट' असे होते. लेखाच्या सुरवातीला यारोस्लाव्ह ओरपाट ह्या झेक इतिहासकाराचे अवतरण होते. ते अवतरण असे : 'संपूर्ण जगाला परिचित असणारी परंतु फक्त आमच्याच देशात कुणाला ज्ञात नाही अशी एक विलक्षण कादंबरी जगात अस्तित्त्वात आहे. या कादंबरीचे नाव 'भर मध्यान्हीचा अंधार'. एकोणिसशे तिशीच्या उत्तरार्धात सोव्हिएट युनियनमधे पोलीस खटले उभे राहिले होते. ही कादंबरी त्या खटल्यांबद्दल आहे. हे खटले कसे रचण्यात आले, त्यांचे एकूण तंत्र काय प्रकारचे होते, हे खटले ज्यांनी चालविले ते चौकशी अधिकारी व न्यायाधीश आणि गुन्हा न करताच गुन्हा केल्याचा कबुलीजबाब देऊन त्याना उपकृत करावयास निघालेले खुद्द आरोपी या सर्वांचे मानसशास्त्र आणि तर्कशास्त्र त्या कादंबरीत उत्तम प्रकारे आले आहे...... परंतु दुःखाची बाब ही की रशियातील हे खटले होऊन गेल्यानंतर बरोबर एका दशकाने निसर्गाच्या कायद्याने घडावे तसे पुन्हा एकदा तशाच खटल्यांचे पीक आले आहे.''

ओरपाट यानी वापरलेला निसर्गाचा कायदा - नॅचरल लॉ हा शब्दप्रयोगच असे सांगतो की 'भर दुपारचा अंधार' ही कादंबरी हा फक्त एकट्या सोव्हिएट युनियनच्या विकासक्रमातील एक अपवादात्मक टप्पा नव्हता, तर ही कादंबरी हे कम्युनिझमच्या काही महत्त्वाच्या लक्षणांवरचे भाष्यसुद्धा होती किंवा कम्युनिझमच्या महत्त्वाच्या लक्षणाचे हे



अनुक्रमणिका

विश्लेषणच होते. कारण ही कादंबरी असे दाखविते की जेथे जेथे कम्युनिस्ट राजवट अधिकारावर येईल तेथे तेथे असेच घडणार आहे. कारण हे कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाचेच वैशिष्ट्य आहे. सारांश 'भर मध्यान्हीचा अंधार' ही भूतकाळाची कथा आहे. परंतु तितकीच ती वर्तमानकाळाची व भविष्यकाळाचीही कथा आहे. कारण या कादंबरीत जे चित्र रंगविण्यात आले आहे ते जसे काल रशियात वा झेकोस्लोव्हाकियात खरे हो, ते तसे ते आज वा उद्या आणि भूतलावरील कोठल्याही देशात खरे होऊ शकते. फक्त कम्युनिस्ट पक्षाला व पक्षाच्या तत्त्वज्ञानाला सत्तेवर येण्याची संधी मिळण्याचाच काय तो अवकाश. ही सत्ता एकदा मिळाली की बनावट पोलीस खटल्यांचे नाटकसुद्धा मागील अंकावरून पुढे चालू व्हावे तसे चालू होईल.

"कोस्सलर यांना पुन्हा भेट" या लेखाचा लेखक झेकोस्लोव्हाकियातील पोलीस खटल्यांबद्दल लिहूनच फक्त थांबत नाही, तर त्याच्याही पुढे जाऊन आणि खूप तपशील मांडून आणखी असेही दाखवून देतो की कैद्यांचा छळ करून त्यांच्या मनात दहशत उत्पन्न करण्याचे जे तंत्र रशियामधे वापरले गेले ते फक्त "रशियापुरते" मर्यादित राहात नाही तर कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाला आणि व्यवहाराला जेव्हा जेव्हा त्याची गरज भासते तेव्हा तेव्हा ते जागे करता येते आणि जितक्या क्रूरतेने ते रशियात वापरले गेले, तितक्याच क्रूरतेने इतरत्रसुद्धा वापरले जाऊ शकते. "कोस्सलर याना पुन्हा भेट" या लेखकाचे शब्द मानायचे तर असे म्हणावे लागेल की कोस्सलर यानी कम्युनिझमची अमानुषता वाढवून सांगण्याऐवजी कमी करून सांगितली आहे. ग्लेटकिन आणि मंडळींच्या शस्त्रसंभारातील प्रत्येक शस्त्र स्लान्स्की खटल्यातील कैद्यांच्या विरुद्ध वापरण्यात आले होते. कैद्यांची चौकशी न करता त्याना महिनोनमहिने एकांत कोठड्यांतून बंद करून ठेवण्यात आले होते. कैदी माराने बेशुद्ध पडेस्तवर त्याना मारहाण केली गेली होती. भ्रमिष्ट होऊन त्यांचे स्थळकाळाचे भान नष्ट होईल अशा प्रकारच्या चमत्कारिक शिक्षा त्याना दिल्या गेल्या होत्या. दिवसचे दिवस त्याना उपाशी ठेवले गेले होते. अतिशीत आणि अतिऊष्ण, दोन्ही प्रकारच्या उष्णतामानाचा प्रयोग त्यांच्यावर केला गेला. चितभ्रम उत्पन्न करणारी औषधीद्रव्ये त्याना पाजली गेली. त्यामुळे त्यांची व्यक्तित्वे मोडून पडली. पशुतल्या पशूलासुद्धा घृणा वाटेल, लाज उत्पन्न होईल अशा क्रिया त्यांच्याकडून करून घेण्यात आल्या. त्याना भ्रम व्हावेत, वास्तवाबद्दलचे त्यांचे भान नष्ट व्हावे, चमत्कारिक भास व्हावेत, त्यांचे अनुभवविश्व ॲब्सर्ड बनावे अशा प्रकारचे केवळ फ्रान्झ काफकाच्या कथाकादंबरीतच शोभावेत असे कृत्रिम अनुभव बुद्धिपुरस्सर निर्माण करण्यात आले.

भरीस ग्लेटकिनप्रणीत प्राणीव्यवच्छेदन तर्कशास्त्र (व्हिव्हिसेक्शन लॉजिक) हाताशी होतेच. कैद्यांपैकी शिक्षा भोगून परत आलेल्या एका कैद्याने आपले अनुभव लिहून

ठेवले आहेत. आरोपींनी कबुलीजबाब द्यावा म्हणून त्यांचे जे हाल केले जात त्याच्याबद्दल बोलताना या इसमाने लिहून ठेवले आहे की, "लेनिनच्या जुन्या सहकाऱ्यांना आणि सोफाया आणि बुडापेस्ट खटल्यातील आरोपींना जसा गुन्हा कबूल करावा लागला तसेच येथेही घडले. कारण गुन्हा कबूल करण्यावाचून इलाजच नव्हता." मात्र गुन्हा कबूल करण्यापूर्वी प्रत्येक आरोपीने प्रतिकाराची पराकाष्ठा केली होती. परंतु अनन्वित छळ सहन केल्यानंतर शरण जाण्यावाचून इलाज उरला नाही तेव्हाच त्या कैद्यांनी कबुलीजबाब लिहून दिला होता. चौकशी अधिकाऱ्याच्या "तर्कशास्त्राला" त्यानी होकार दिला होता. 'भर मध्यान्हीचा अंधार' मधे हे आणि याच जातीचे दुसरे अनुभव जेव्हा आपण वाचतो तेव्हा जोझेफ कॉनराड या दुसऱ्या एका ब्रिटिश कादंबरीकाराच्या 'हार्ट ऑफ डार्कनेस' या दीर्घकथेतील कुर्झ नावाच्या पात्राप्रमाणे आपल्या तोंडून आपोआप शब्द बाहेर पडतात की, "अरेरे, केवढे हे भीषण कृत्य ......" ही कादंबरी वाचता वाचता शेवटी असे वाटू लागते की आपण साक्षात दुष्ट शक्तीच्या वेढ्यात सापडलो आहोत आणि त्या वेढ्यातून आपली आता सुटका नाही. येथेसुद्धा लेखक म्हणून कोस्सलर यांचे कौशल्य असे की कोठल्याही प्रकारच्या छळाच्या शारीरिक तपशिलाचा नामनिर्देश न करता, केवळ सूचक संदर्भ देऊन नैतिक क्रूरता व त्या क्रूरतेचा भयानकपणा वाचकाच्या डोळ्यापुढे उभा करून त्यानी हे साध्य केले आहे. ही कादंबरी वाचत असताना वाचकाचे मन तडफडते. त्याचे हृदय पिळवटून निघते. त्याच्या मनाचा भीतीने थरकाप होतो. त्याला किळस वाटू लागते. शिसारी येते. तिरस्कार वाटू लागतो. इतक्या विविध प्रकारच्या भावना वाचकाच्या मनात एकाचवेळी जाग्या होतात. कसल्याही प्रकारचे शारीरिक तपशील न देता इतक्या विविध भावभावना जाग्या करणे हे असामान्य कौशल्याचे लक्षण म्हणता येईल. कोस्सलर यांच्या लेखणीत हे कौशल्य आहे. कोस्सलर यांचा सारा भर सूचकतेवर आहे. सूचक वर्णनांतून ते कैद्यांची शारीरिक व मानसिक अवस्था आपल्या डोळ्यासमोर उभी करतात आणि आपल्या नैतिक भावनांना हात घालतात. ज्या कोठडीत रुबाशॉव्हला बंद करून ठेवण्यात आले होते त्या कोठडीपासून बाकीच्या कोठड्या जरा दूर आहेत. कैदखाना म्हणजे मधमाशांच्या पोळ्यातील छोटे छोटे कप्पेच जणू. एका कप्प्यात एक कैदी. दोन बाजूंना हे कप्पे. नि मधे लंबचलांब रिकामा कॉरिडॉर. स्वतःच्या डोळ्यानी रुबाशॉव्हला यातील काहीच पाहाता येत नाही. रात्रीच्या भयाण वेळी कैद्यांचा छळ केला जातो. ते गुदमरलेल्या आवाजात किंकाळ्या फोडतात. किंकाळ्या, मारहाण केल्याचा आवाज. कैद्यांचे रडणे, भेकणे, विव्हळणे. एक ललित लेखक म्हणून कोस्सलर यांचे यश हे की कैद्यांच्या ज्या दबक्या किंकाळयांचा आवाज चार पावलावरच्या रुबाशॉव्हच्या एकांत कोठडीपर्यंत पोहोचू शकत नाही तोच आवाज तुरुंगांच्या भिंतींच्या पलीकडे बाहेरच्या मोकळ्या जगापर्यंत ते पोहोचवितात.



अनुक्रमणिका

आपल्या तारुण्यातील पहिली अनेक वर्षे कोस्सलर कम्युनिस्ट पक्षात काम करीत होते. कम्युनिस्ट पक्ष क्रांतीचे तत्त्वज्ञान शिकवतो. पक्षात काम करताना कोस्सलर यांनी क्रांतीच्या तत्त्वाचा आणि त्या तत्त्वाच्या प्रत्यक्ष वापराचा जवळून अनुभव घेतला होता नि त्या तत्त्वज्ञानाच्या योग्यायोग्यतेबद्दल त्यांच्या मनात पुढे काही शंका उपस्थित झाल्या. या शंकांना वाट देण्यासाठी आणि क्रांतीच्या नीतिशास्त्राचा विषय डोक्यातून कायमचा काढून टाकण्यासाठी ते शेवटी कादंबरी लेखनाकडे वळले. क्रांतीचे नीतिशास्त्र योग्य किती अयोग्य किती, संयुक्तिक किती आणि असयुक्तिक किती या प्रश्नाचा एकदा कायमचा सोक्षमोक्ष लावून टाकावा या हेतूने या एकाच विषयावर एकूण तीन कादंबऱ्या आणि एक वैचारिक लेखसंग्रह अशी चार पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. 'द ग्लॅडिएटर्स' ही त्यातील पहिली कादंबरी. दुसरी 'डार्कनेस ॲट नून' आणि तिसरी 'अरायव्हल् अँड डिपार्चर'. लेखसंग्रहाचे नाव 'द योगी अँड द कमिसार'. ही चार पुस्तके लिहून त्यानी पुस्तकाचे एक वर्तुळ पूर्ण केले नि वर्तुळ पूर्ण होताच क्रांती आणि क्रांतीच्या नीतिशास्त्राची सुक्तासुक्तता हा विषयही त्यानी आपल्या डोक्यातून काढून टाकला. परत त्यानी या विषयावर कादंबरी लिहिली नाही. राजकारण आणि नीती हा त्यांच्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकचतुष्टयाचा मध्यवर्ती विषय असून त्यानी ज्या कादंबऱ्या लिहिल्या त्या मागची ती एक प्रमुख प्रेरणासुद्धा आहे. त्यानी घेतलेला राजकीय नीतीचा अनुभव अतिशय भेदक होता. त्याच विषयावर त्यानी ही चार पुस्तके लिहिली नि त्या विषयातला त्यांचा संपूर्ण रस जणू कायमचा आटून गेला. या विषयावर जसे पुन्हा त्यानी कादंबरीलेखन केले नाही तशाचप्रकारे कम्युनिझमकडेही त्यानी पुन्हा मागे वळून पाहिले नाही. एक बौद्धिक विचार आणि व्यवहार या दोन्ही बाबतीत त्यानी कम्युनिझकडे पाठ फिरवली. पुढील आयुष्यात त्याना मुख्यत्वे शास्त्रीय विषयांमधे स्वारस्य राहिले. याही विषयावर त्यानी पुस्तकांच्या मालिका लिहिल्या आहेत. उदा. 'द स्लीपवॉकर्स' -- 'इनसाइट अँड आऊटलुक' -- 'द ॲक्ट ऑफ क्रिएशन' -- 'द घोस्ट इन द मशिन' -- 'जेनस' -- 'द रुटस् ऑफ कोइन्सिडन्स' वगैरे वगैरे. पैकी 'द स्लीपवॉकर्स' सारखी काही पुस्तके ऐतिहासिक दृष्टीकोनातून शास्त्रीय विषयाचा परामर्ष घेतात, तर 'इनसाइट अँड आऊटलुक', 'द ॲक्ट ऑफ क्रिएशन' सारखी पुस्तके मनुष्यप्राण्यातील निर्मितीक्षमतेचा नि प्रक्रियेचा परामर्ष घेतात. ही पुस्तके मुख्यतः विश्लेषणात्मक आहेत.

आपण चर्चेला घेतलेला विषय कोस्सलर आणि कोस्सलर यांची 'डार्कनेस ॲट नून' ही कादंबरी एवढाच असल्याने कोस्सलर यांच्या आत्मचरित्राचे पहिले दोन खंड वगळता त्यांच्या इतर पुस्तकांशी वस्तुतः आपणाला कर्तव्य नाही. त्यांच्या आत्मचरित्राचे पहिले दोन खंड म्हणजे 'ॲरो इन द ब्ल्यु' आणि इन्व्हिजिबल रायटिंग'. या दोन्ही खंडांची

दखल प्रस्तुत चर्चेत आपण घेतली आहे. राजकीय विषयाला सोडचिठ्ठी दिल्यावर कोस्सलररनी आपला मोहरा शास्त्रीय विषयांकडे वळविला. 'जेनस' हे निर्मितीक्षमतेचे जैविक स्वरूप या विषयावरचे पुस्तक लिहून लिखाणाचे दुसरे वर्तुळही त्यानी नंतर पुरे केले. कोस्सलर यांच्या आस्थेचा पहिला विषय राजकीय तत्त्वज्ञान आणि त्या तत्त्वज्ञानाचा प्रत्यक्ष व्यवहार हा होता. तर दुसरा विषय शास्त्र आणि विज्ञान हा होता. कोस्सलर यांनी राजकीय विषयावरचे कादंबरीलेखन थांबविले आणि ते शास्त्रीय विषयावरच्या लेखनाकडे वळले हे पाहून कोणाला कदाचित असे वाटले की कोस्सलर यांच्या बौद्धिक आयुष्याला ही एक फार मोठी कलाटणीच मिळाली होती. दुसऱ्या शब्दात त्यांच्या आयुष्यक्रमातील हा एक तुटका भाग आहे. परंतु कोस्सलर यांच्या बालपणाचा आणि बालपणातील त्यांच्या बौध्दिक आवडीचा थोडा जास्त विचार केला तर तसे नसून, उलट त्यांचे पहिले आयुष्य आणि नंतरचे आयुष्य या दोन्ही आयुष्यामधे सलगता आहे असेच दिसून येते. त्यांचे बालपण आणि त्या दिवसातील त्यांच्या आवडीचे विषय जर वाचकांच्या ध्यानात असतील तर त्याना हे आठवेल की शाळेत शिकत असताना आणि नंतरसुद्धा कोस्सलर यांच्या खऱ्या आवडीचा विषय शास्त्र, विशेपतः खगोलशास्त्र आणि गणित हाच होता. कादंबरीलेखन बंद केल्यावर त्यानी जे लिखाण केले होते त्या लिखाणाचे विषय शास्त्र आणि विज्ञान हेच आहेत. म्हणून आपण असे ठामपूर्वक म्हणू शकतो की राजकारणातून कोस्सलर जेव्हा बाहेर पडले तेव्हा त्यांचे पहिले प्रेम पुन्हा एकदा सजीव बनले होते.

येथे एक विलक्ष योगायोग दाखविता येईल. कोस्सलर कम्युनिस्ट पक्षामधे काम करीत होते. त्यांच्या मनावर कम्युनिझमच्या तत्त्वज्ञानाचा फार मोठा पगडा होता. कम्युनिझमचे तत्त्वज्ञान अपरिहार्यपणे सर्वंकषसत्तावादी विचारसरणीचा पुरस्कार करते किंवा त्या विचारसरणीकडे घेऊन जाते. सर्वंकपसत्तावादी विचारसरणी मानवी जीवनात फक्त समष्टीला, महत्त्व देते. ही विचारसरणी व्यक्तीला अजिबात महत्त्व देत नाही. समष्टी आहे म्हणून व्यक्ती असते हे या विचरसरणीचे मूलभूत प्रमेय आहे. साहजिकच या विचारसरणीला प्रथमपुरुषी एकवचनी 'मी' या संबोधनाचे तीव्र वावडे आहे. किंबहुना 'मी' च्या नामोच्चाराचा आत्यंतिक तिटकारा आहे असेही हवे तर म्हणा. सर्वंकषसत्तावादी विचारसरणीना 'मी' च्या नामोच्चाराचा नुसता तिटकाराच आहे असे नव्हे तर 'मी' ही त्याना कृत्रिम बौद्धिक रचना वाटते. प्रत्यक्षात 'मी' नावाचे काहीही भौतिक अस्तित्वात नाही अशी त्यांची ठाम समजूत आहे. माणसे आपापसात बोलताना 'मी' चा उल्लेख करून बोलतात. परंतु व्याकरणाची एक सोय म्हणून ती तसे करतात. व्याकरणाने जर का त्याना तसे करायची सवय लावली नसती तर त्यानी स्वतःचा संदर्भ देताना तसा उल्लेखही केला नसता असे त्यांचे मत आहे. सारांश, व्यावहारिक सोय म्हणून ज्या 'मी' चा उल्लेख करून

माणसे बोलतात तो 'मी' ही व्याकरणातील एक कल्पित वस्तू आहे – एक ग्रॅमॅटिकल – फिक्शन आहे असे या विचारसरणी शिकवतात. याचा अर्थ हरएक व्यक्तीला तिचा स्वतःचा आत्मा आहे, नि त्या आत्म्याला साक्षी ठेऊन आपले जीवन ती जगते. या आत्म्याला त्याच्या स्वतःच्या अशा मानसिक, भावनिक, वैचारिक गरजा असू शकतात. या गरजा कदाचित समष्टीच्या गरजांपेक्षा वेगळ्या असू शकतात, नि याही गरजा विचारात घेणे आवश्यक आहे ही सर्व भूमिकाच सर्वंकषसत्तावादी विचारसरणींना अमान्य आहे. एकेकाळी फक्त सर्वंकषसत्तावादी तत्त्वज्ञानांपुरत्या मर्यादित असणाऱ्या या भूमिकेचा फैलाव आज भिन्नभिन्न शास्त्रीय विचारसरणींमधेही झाल्याचे दिसून येत आहे. या शास्त्रीय विचारसरणी वजन आणि मापे यांचाच पुरावा फक्त मान्य करू पाहातात. व्यक्तीच्या 'मी' चे वजन आणि माप घेता येत नाही. शास्त्रीय प्रयोगशाळेत 'मी' च्या अस्तित्वाचा पुरावा मिळविता येत नाही. शास्त्रीय प्रयोगाची निरीक्षण - निष्कर्ष ही पद्धती तेथे निरुपयोगी ठरते. म्हणून कित्येक शास्त्रीय विचारसरणी, विशेषतः प्रायोगिक मानसशास्त्र पद्धतीसारख्या पद्धती, मानवी व्यवहारातून 'मी' वाचक संबोधनाची हकालपट्टी करू पाहतात. शास्त्रीय प्रयोगाने आणि निरीक्षणातून जे सिद्ध केले जाऊ शकत नाही अथवा शास्त्रीय पद्धती वापरून ज्याच्यामधे बदल घडवून आणता येत ते खऱ्या अर्थाने अस्तित्वातच नसते ही त्यांची शास्त्रीय श्रद्धा आहे. 'मन' नावाची वस्तू वरीलपैकी कोठल्याच कसोटीला उतरत नाही. 'मन' तागडीत घालून तोलता येत नाही. ते फूटपट्टीने मापता येत नाही. प्रयोगशाळेत प्रयोग करून मनाचे वेगळे अस्तित्व बाजूला काढून सिद्ध करता येत नाही. साहजिकच ज्या शास्त्रीय विचारसरणींचा सगळा भरवसा वजन, मापे, लांबी, रूंदी, उंची व प्रयोग यांच्यावरच फक्त आहे, त्या विचारसरणी 'मन' आणि 'मी' या गोष्टींना संपूर्ण नकार देतात.

थोडक्यात असे की 'प्राणीव्यवच्छेदन नैतिक आचारशास्त्रा' कडून प्रेरणा घेऊन काम करणारी भाई ग्लेटकिन आणि त्यांची आदिमानव नातेवाईक मंडळी तुरुंगातल्या फक्त छलकमऱ्यांच्या भिंतीआडच आहेत असे नाही. ती आधुनिक शास्त्रीय प्रयोगशाळांतूनही आहेत. या सगळ्या आदिमानवांचा 'मी' च्या खरेपणावर विश्वास नसतो. 'मी' चा उच्चार हे त्याना एक कल्पित वाटते. सोयीस्कर कल्पित, पण कल्पित हे कल्पितच ! राजकारणाला सोडचिट्ठी दिल्यानंतरची पहिली काही वर्षे कोस्लर खगोलशास्त्रीय विषयांमधे रममाण झाले होते. परंतु पुढे त्यानी जे कुणी व्याकरणातील कल्पिताच्या विरोधात लिहित होते त्यांच्याशी झुंज घेण्याचे ठरविले व त्यांची पुढील पुस्तके मानवी जाणीवशक्तीचे आणि 'मी' चे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी लिहिली गेली आहेत. 'द रुट्स ऑफ कोइन्सिडन्स', 'द चॅलेंज ऑफ चान्स', 'द घोस्ट इन् द मशिन' ही त्यापैकी काहींची नावे. पैकी 'द चॅलेंज

ऑफ चान्स' हे पुस्तक कोस्सलर, सर आलिस्टर हार्डी आणि रॉबर्ट हार्वी अश तिघानी मिळून लिहिले आहे. बाकीची सर्व पुस्तके एकट्या कोस्सलर यांची आहेत.

तत्त्वतः जो प्रश्न कोस्सलरना पडला होता तोच प्रश्न तुरुंगाच्या कोठडीत रुबाशॉव्हला पडला होता. 'व्याकरणातील कल्पित वस्तूचे' प्रमेय खरे मानायचे की खोटे, नि खोटे मानले तर त्याचे परिणाम काय होतील ? ह्या प्रश्नाशी रुबाशॉव्ह झगडत होता आणि ज्या क्षणी हे प्रमेय खोटे मानले तर मानवी जीवनाला काही अर्थ असू शकतो व काही नैतिक मूल्ये आहेत हे सिद्ध करणे कठीण होईल हे त्याच्या ध्यानात येते, नव्हे त्याला त्याचा साक्षात्कार होतो, बहुदा त्याच्या स्वतःच्या कदाचित मर्जीविरुद्धच, त्याचक्षणी ही कादंबरी अकस्मात कलाटणी घेते. हे उत्तर पुढे येईस्तवर 'डार्कनेस ॲट नून' हे साक्षात सैतानशाहीचे, इव्हिलचे, इव्हिलच्या विजयाचे चित्र वाटत होते. ही नवी कलाटणी मिळताच हे जुने चित्र पुसले जाऊन त्या ऐवजी सैतानशाहीला विरोध करू शकणाऱ्या शक्तींचे चित्र उमटते. एकाच वेळी या कादंबरीत वाचकाला दोन व्हिजन्स मिळतातः इव्हिलचे आणि इव्हिलला विरोध करणाऱ्या शक्तींच्या स्त्रोताचे.

'डार्कनेस ॲट नून' कादंबरीबद्दल लिहिताना अनेकांनी विसाव्या शतकातील एक नवी मिथ् असे तिच्याबद्दल म्हटले आहे. ही कादंबरी मिथ् नक्कीच आहे. कारण या कादंबरीमधे कोस्सलरने मानवजातीचा एक आदिम आणि सार्वत्रिक अनुभव गुंफला आहे. अंधार आणि प्रकाशाशी संबंधित अनुभव. अंधाराला माणसे घाबरतात. प्रकाशाल' सामोरी जातात. पण कधी कधी माणसांना अंधार हवासाही वाटतो. अंधार म्हणजे निद्र| अंधार म्हणजे जबबदारीपासून सुटका, विश्रांती असेही माणसाला वाटते. प्रकाश आणि अंधाराकडे पाहाण्याची माणसाची वृत्ती अशी द्वर्थी - ॲम्बिव्हॅलंट आहे. हाच माणसाच्या वृत्तीतला द्वर्थीपणा वापरून कोस्सलर यानी ही कादंबरी रंगविली आहे.

'डार्कनेस ॲट नून' ही एक ऐतिहासिक कादंबरी आहे, तसेच ती राजकीय स्वरूपाची कादंबरी आहे. या गोष्टी तर सर्वानाच ठाऊक आहेत. ही एक उत्तम प्रतीची गुप्तहेर कथा आहे हेही आपण पाहू शकतो. पण ती एक नवी मिथ् आहे हे आपल्या चटकन ध्यानात येत नाही. 'डार्कनेस ॲट नून' मधे दोन तुल्यबळ शक्तींचे युद्ध दाखविले आहे. पैकी एक शक्ती अंधाराची आहे, तर दुसरी प्रकाशाची. अंधार आणि प्रकाशच्या निर्णायक लढाईची ही मिथ खूप प्राचीन आहे. ही मिथ इतक्या स्पष्ट शब्दात प्रथम झोराष्ट्रियन धर्माचा संस्थापक झरथुष्ट्र याने प्रस्तृत केली. झरथुष्ट्र हा प्रेषित होता आणि त्याचा धर्म प्रेषिती धर्म आहे. देवाशी जो समोरासमोर बोलतो, देवाच्या आज्ञा घेतो, त्याला प्रेषित म्हणतात आणि त्याच्या धर्माला प्रेषिती धर्म म्हणतात. झरथुष्ट्राच्या धर्माप्रमाणेच

ज्यू - ख्रिस्ती - इस्लाम हे आणखी तीन धर्मसुद्धा प्रेषिती धर्म आहेत. परंतु हे तीन धर्म आणि झरथुष्ट्राचा धर्म या दोघात एक मूलभूत फरक आहे आणि हा फरक देव आणि भक्त यांच्यातल्या संबंधाबद्दल आहे. झरथुष्ट्राच्या धर्माप्रमाणे देव आणि माणसातले नाते सक्तीचे नाही. ते खुशीचे आहे. माणूस ठरवतो की परमेश्वराच्या आज्ञा ऐकायच्या नि तो परमेश्वराच्या आज्ञा ऐकतो. परमेश्वराच्या बाजूने लढाईत उतरतो. परमेश्वराची बाजू प्रकाशाच्या बाजूने लढाईत उतरायचे की अंधाराच्या याचे स्वातंत्र्य माणसाला आहे असे झरथुष्ट्राचा धर्म मानतो. ज्यू – ख्रिस्ती – इस्लाम हे तीन धर्म या प्रकारचे स्वातंत्र्य माणसाला देत नाहीत. या धर्माच्या मताप्रमाणे देव सर्वसमर्थ आहे आणि त्यानेच माणसाला निर्माण केलेले असल्याने त्याची आज्ञा पाळल्यावाचून त्याला गत्यंतर नाही. हे धर्म मनुष्याला निवडीचे स्वातंत्र्य देत नाहीत. झरथुष्ट्राच्या धर्माची भूमिका यापेक्षा भिन्न आहे. झरथुष्ट्राचा धर्म मनुष्याला निवडीचे स्वातंत्र्य देतो. बऱ्यावाईटाची निवड खुद्द ज्याने स्वतः करायची आहे असे हा धर्म मानतो. कोस्लर यांनी हे निवडीच्या स्वातंत्र्याचे सूत्र वापरून 'डार्कनेस ॲट नून' नावाची ही नवी मिथ रचली आहे.

स्वातंत्र्य म्हणजे निवडीचे स्वातंत्र्य. निवड नेहमी वैयक्तिक असते. माझी निवड मी करतो. तुमची तुम्ही करता. याचा अर्थ निवड शक्य होण्यासाठी प्रथम निवड करणारा कर्ता असावयास हवा. या निवड करणारालाच 'डार्कनेस ॲट नून' मधे 'व्याकरणातील कल्पित वस्तू' असे म्हटले आहे. म्हणजेच स्वतःचा उल्लेख करताना ज्या प्रथमपुरुषी एकवचनी 'मी' या सर्वनामाचा वापर आपण करतो ते 'मी' हे सर्वनाम होय. 'मी' या नावाने जेव्हा कोठलेही कृत्य केले जाते तेव्हा त्या कृत्याच्या बऱ्यावाईटपणाची जबाबदारी त्या 'मी' ने स्वतःच्या शीरावर घेतलेली असते. सर्वंकषसत्तावादी राजवटींमधे 'मी' च्या नावाने बोलावयास बंदी असते. लोक 'आम्ही' च्या नावाने बोलतात आणि हा 'आम्ही' नंबर एकच्या तालावर बोलतो. थोडक्यात प्रत्येक बऱ्यावाईट कृत्याला नंबर एक जबाबदार असतो, वैयक्तिक नागरिक नाही असे ही भूमिका सांगते. येथे व्यक्तीला पूर्णपणे समुदायिकाच्या अधीन करण्यात येते. वस्तुतः स्वतःच्या आयुष्याला मनुष्य स्वतः जबाबदार हवा. परंतु सर्वंकषसत्तावादी राजवटींमधे ही जबाबदारी नागरिकांकडून काढून घेण्यात येते आणि नागरिकांना केवळ कळसूत्री बाहुल्यांप्रमाणे वागण्याचे शिक्षण दिले जाते. याचा परिणाम म्हणजे नागरिकांच्या जीवनातील सगळा आनंद आणि अर्थच नष्ट केला जातो. कारण नागरिक स्वतःची भूमिका जगण्याऐवजी सरकारने त्याना दिलेली पर्यायी भूमिका जगत असतात. नागरिक स्वतःला फसवतात, स्वतःची वंचना करतात. निवडीच्या स्वातंत्र्याचे प्रमेय घेऊन 'डार्कनेस ॲट नून' लिहिली गेली आहे असेही त्यामुळे आपण म्हणू शकतो. कादंबरीच्या शेवटी कोस्लर असे दाखवून देतात की स्वतःचे आयुष्य

स्वतः जगण्यातच, आत्मज जवाबदारी शीरावर घेऊन जगण्यातच आयुष्याची सगळी शान आहे. जे कुणी असे जगत नाहीत त्यांचे जगणे खोटे असते. तसेच स्वतःचे आयुष्य स्वतः जगण्यासाठी 'व्याकरणातील कल्पित वस्तू' ला कल्पित न मानता, ती सत्य आहे असे मानून जगले पाहिजे तरच त्या आयुष्याला किंमत येते, त्या आयुष्याला अर्थ आणि नैतिक मूल्य लाभते असेही शेवटी ते दाखवितात. या कादंबरीत आलेल्या निवडीच्या स्वातंत्र्याच्या प्रमेयावर जर का आपण लक्ष केंद्रित केले तर या कादंबरीला अस्तित्ववादी परंपरेतील ललितवाङ्मयात बसविता येईल. कारण कादंबरीच्या अखेरीस कादंबरीचा नायक रुबाशॉव्ह कबूल करतो की पक्षाच्या आदेशावरून आणि पक्षाचे तत्त्वज्ञान म्हणून आजवर आपण जी काही बरेवाईट कृत्ये केली ती जरी पक्षाच्या आदेशाने वगैरे केली गेली असली तरी त्या कृत्यांची खरी जबाबदारी माझ्या म्हणजे रुबाशॉव्हच्याच डोक्यावर आहे.

'डार्कनेस ॲट नून' मध्ये कोस्सलरनी आपल्या पुढे दोन 'व्हिजन्स' ठेवली आहेत. ही 'व्हिजन्स' एकाला लागून दुसरे अशी त्यानी ठेवली आहेत. वर वर पाहाता असे वाटेल की दोन व्हिजनपैकी दुसरे व्हिजन कादंबरीच्या शेवटी आले आहे. पण ते खरे नाही. कादंबरीचा बराचसा भाग ऐव्हानॉव्ह आणि रुबाशॉव्ह किंवा ग्लेटकिन आणि रुबाशॉव्ह किंवा रुबाशॉव्ह आणि त्याचा अंतरात्मा यांच्यातील संवादांचा आहे. हे संवाद वादाच्या स्वरूपाचे आहते. राजकीय तत्त्वज्ञानाच्या बाबतीत ऐव्हानॉव्ह अथवा ग्लेटकिन जी भूमिका घेतात त्याच्यापेक्षा भिन्न भूमिका घेऊन रुबाशॉव्ह आपली बाजू मांडतो. त्यामुळे जेंव्हा जेव्हा एक व्हिजन वाचकाच्या डोळयापुढे उभे केले जाते त्याचवेळी आपोआपच दुसरेही व्हिजन त्याच्या डोळ्यापुढे येऊ लागते.

'व्हिजन' हा शब्द मी विशिष्ट अर्थाने वापरीत आहे. 'व्हिजन' शब्दाला अनेक अर्थ आहेत. साधूसंताना परमेश्वराचा साक्षात्कार होतो त्या साक्षात्काराला 'व्हिजन' हाच शब्द वापरतात किंवा भावी यशाची वगैरे जी स्वप्ने पाहिली जातात त्यानासुद्धा 'व्हिजन' हा शब्द वापरतात. मला वरील दोहोपैकी एकही अर्थ अभिप्रेत नाही. तर 'जगाचा व्यवहार कसा चालतो' – 'How the world works' – हे चित्रित करणारी जी चित्रे काढली जातात त्या चित्रांना उद्देशून 'व्हिजन' हा शब्द मी येथे वापरला आहे. मला असे म्हणायचे आहे की 'डार्कनेस ॲट नून' मधे कोस्सलर यांनी राजकीय व्यवहाराबद्दलची दोन व्हिजन्स आपल्यापुढे मांडली आहेत.

व्हिजन हा शब्द येथे काहीसा तांत्रिक अर्थाने वापरलेला असल्याने तो थोडा अधिक स्पष्ट करावा लागेल. जगाचा व्यवहार कसा चालतो हे चित्रित करणारी चित्रे म्हणजे व्हिजन अशी व्हिजन शब्दाची व्याख्या आपण केली आहे. झाडाची पाने सळसळतात.

रानटी अवस्थेतील मनुष्याला वाटते की कोणी अदृश्य शक्ती ती पाने हालवीत आहे. हे पाने कशी हालतात (जगाचा व्यवहार कसा चालतो) याबद्दलचे एक व्हिजन. हे व्हिजन अतिशय प्राथमिक आहे. अशीच दुसरीसुद्धा व्हिजन्स असू शकतात. उदा. न्यूटनचे व्हिजन, आइन्स्टीनचे व्हिजन वगैरे. व्हिजन जशी विज्ञानविषयक व्यवहाराबद्दल असतात तशीच ती सामाजिक व्यवहाराबद्दलही असतात. उदा. समाजाचा व्यवहार कसा चालतो याबद्दलचे गांधीजींचे व्हिजन, रुसोचे व्हिजन, वगैरे.

एकाच विषयाबद्दल भिन्नभिन्न व्यक्तींची व्हिजन्स भिन्नभिन्न असू शकतात. कारण व्हिजन्स नेहमी त्या व्हिजनच्या पाठी जी गृहीतकृत्ये वापरली जातात त्यांच्यावर अवलंबून असतात. व्हिजनमागचे गृहीतकृत्य बदलताच व्हिजन बदलते. मुख्य म्हणजे ही गृहीतकृत्ये नेहमी प्रच्छन्न, अध्याहृत असतात, ती कधीही स्पष्ट, उघड. नसतात. व्हिजन्सच्या बाबतीत सांगण्यासारखी तिसरी गोष्ट ही की प्रत्येक व्हिजनचे जसे काही परिणाम अपेक्षित असतात तसेच काही न अपेक्षिलेल परिणामही त्याच व्हिजनचे असू शकतात. व्हिजनचे मूल्यमापन करताना हे न अपेक्षिलेले परिणामच अपेक्षिलेल्या परिणामांपेक्षा अनेकदा अधिक महत्त्वाचे ठरतात.

व्हिजन्सना ओळखीची उपमा द्यायची तर ती नकाशाची वा आलेखांची देता येईल. व्हिजन्स ही नकाशासारखी असतात आणि नकाशाप्रमाणेच ती वाट शोधावयास मदत करतात. परंतु जे दोष नकाशांचे तेच व्हिजन्सचेही आहेत. व्हिजन्स म्हणजे प्रत्यक्ष वास्तवता रिॲलिटी नाही. प्रत्यक्ष वास्तवतेमधील सगळेच्या सगळे तपशील व्हिजनमधे अंतर्भूत होऊ शकत नाहीत. व्हिजन हा वास्तवतेचा साधा व सोपा नकाशा असतो. म्हणजेच वास्तवतेमधील वाजवीपेक्षा जास्त गुंतागुंतीचे तपशील व्हिजनमधून वगळण्यात आलेले असतात. व्हिजन आणि ज्या वास्तवतेबद्दलचे ते व्हिजन असते ती वास्तवता या दोहोत नेहमीच अंतर असते.

मनुष्याच्या दृष्टीने व्हिजन ही एक अति उपयुक्त वस्तू आहे. व्हिजन नसेल तर जगात वावरताना मनुष्यप्राणी गोंधळून जाईल. समोरच्या वास्तवतेवर अंमल कस आणायचा हेच तेव्हा मनुष्यप्राण्याला कळणार नाही. परंतु नेमक्या याच कारणाने व्हिजन्स धोकादायक ठरू शकतात. चुकीच्या व्हिजनच्या तडाख्यात सापडलेला मनुष्य त्या व्हिजनच्या प्रभावामुळे स्वतःचे आणि इतरांचे अत्यंत नुकसान करू शकतो. कारण व्हिजन्स वस्तुस्थितीचा विपर्यास करू शकतात. वस्तुस्थिती विकृत करू शकतात. म्हणून कोठल्याही व्हिजनची किंमत ठरविताना व्हिजन आणि ज्या वस्तुस्थितीबद्दल ते व्हिजन असेल वस्तुस्थिती या दोघांची तुलना करावी लागते. असो.



अनुक्रमणिका

'डार्कनेस ॲट नून' मधे कोस्सलर यांनी वाचकाच्या समोर दोन व्हिजन्स ठेवली आहेत. राज्य कसे करावे या प्रश्नाशी ती संबंधित आहे. किंवा मनुष्यप्राण्याला राजकीय आणि अन्य बाबतीत कसे वागवावे या प्रश्नाशी ती संबंधित आहेत असेही हवे तर म्हणा. कोस्सलर यानी मांडलेल्या या दोन व्हिजन्सपैकी एक व्हिजन्स सर्वंकषसत्तावादी राजकीय व्यवहाराशी संबंधित आहे, तर दुसरे लोकशाहीवादी व्यवहाराशी संबंधित आहे. किंबहुना दुसरे व्हिजन लोकशाही राज्यव्यवहाराशी संबंधित आहे असे म्हणण्याऐवजी जर का आपण असे म्हटले, की ते सर्वंकषसत्तावादी जुलुमाला उत्तर द्यायचे झाल्यास कसे देता येईल, कोठल्या आंतरिक शक्तीच्या आधारे देता येईल या प्रश्नाशी संबंधित आहे, तर ते अधिक बरोबर ठरेल. कारण 'डार्कनेस ॲट नून' या संपूर्ण कादंबरीत कोस्सलर एकदा सुद्धा लोकशाहीचा प्रत्यक्ष उल्लेख करीत नाहीत. तर सर्वंकषसत्तावादी राजवटी जेव्हा व्यक्तीवर जुलूम करतात तेव्हा ती व्यक्ती कशाच्या जोरावर त्याना विरोध करू शकते याची केवळ ते वाच्यता करतात.

'डार्कनेस ॲट नून' मधे अशी दोन व्हिजन्स कोस्सलर यांनी मांडली आहेत. पैकी सर्वंकषसत्तावादी राजवट आणि त्या राजवटीकडून होणारा जुलूम हे व्हिजन प्रकट आणि स्पष्ट आहे. दुसरे व्हिजन पहिल्याच्या प्रतिक्रियेतून साकार होते. या दोन व्हिजनपैकी पहिले दुष्टपणा, इव्हिल चित्रित करते, तर दुसरे सुष्टपणा, गुड सूचित करते. पहिले व्हिजन खुद्द कोस्सलर निंद्य आणि त्याज्य ठरवतात. तर दुसरे स्तुत्य आणि स्वीकारार्ह ठरवतात. पण जरी असे असले तरी स्वतः कोस्सलर या दोनापैकी एकाही व्हिजनच्या बाजूने बोलत नाहीत, वा एकाचीही स्वतः तरफदारी करीत नाहीत. ते फक्त परिस्थितीचे वस्तुनिष्ठ चित्रण करतात. चित्रण करताना एकाच प्रश्नाच्या दोन्ही बाजू मांडून दाखवितात. अतिशय प्रभावीपणे मांडून दाखवितात आणि पवित्रा घेण्याचे काम वाचकावर सोपवितात. कादंबरीकार म्हणून असणारे कोस्सलर यांचे सगळे कौशल्य आणि मोठेपण यातच आहे. ते वाचकाला तयार तात्पर्य देत नाहीत. तात्पर्य काढावयास त्याला ते उद्युक्त करतात.



अनुक्रमणिका

## "ज्याचा कुणाचा संबंध असेल त्याला"

जादा झोपेच्या गोळ्या घेऊन मी आत्महत्या करणार आहे. ह्या गोळ्या मी वैध मार्गाने पैदा केल्या आहेत. गेले कैक दिवस मी त्या जमा करीत आहे. ही आत्महत्या मी कोणाचीही मदत न घेता करीत आहे. मी आत्महत्त्येसाठी मोठ्या प्रमाणात झोपेच्या गोळ्या घेत आहे हे कुणालाही ठाऊक नाही. प्रस्तुत चिटी मी आत्महत्या करणार आहे हे स्पष्ट करण्यासाठीच लिहून ठेवीत आहे.

आत्महत्येचा प्रयत्न हा एक प्रकारचा जुगार असतो. प्रयत्न फसला तरच प्रयत्नाचा परिणाम कुणाल्याला कळू शकतो. प्रयत्न यशस्वी झाला तर त्याला काहीच कळू शकत नाही. यदाकदाचित माझा हा प्रयत्न फसला नि शरीर आणि मनाने विकलांग बनून मी जिवंत राहिलो आणि त्या अवस्थेत माझ्या इच्छा मला इतराना कळविता येत नसल्याने किंवा माझ्याकरिता ज्या खटपटी सुरू असतील त्याच्या बाबतीत मी स्वतः काही करू शकणार नाही तर मग त्यावेळी काय करावे यासंबंधात सूचना देण्यासाठी ही चिटी मी लिहून ठेवीत आहे. माझी अशी विनंती आहे की मला माझ्या स्वतःच्या घरातच मरू द्यावे, माझा जीव वाचविण्याचा प्रयत्न कोणीही करू नये, किंवा कृत्रिम मार्गानी मला जिवंत ठेवण्याची खटपट करण्यात येऊ नये. माझी आणखी अशी विनंती आहे की त्यावेळी जर का दुर्दैवाने मला माझ्या घरातून हॉस्पिटलमध्ये नेण्याचा कोणीही प्रयत्न केला तरी माझी पत्नी, माझे डॉक्टर वा माझे मित्र यांच्यापैकी जे कुणी तेथे हजर असतील त्यानी हेबिअस कॉपर्सची मदत घेऊन (म्हणजे इच्छेविरुध्द आणि गुन्ह्याचा आरोप न करताच कुणालाही डांबून ठेवता येत नाही. तसे केल्यास तो कोर्टाकडे संरक्षण मागू शकतो.) मला सोडवावे.

माझ्या आयुष्याचा शेवट करण्याचे मी ठरविले त्याची कारणे अगदी साधी सोपी पण भक्कम आहेत. मला पार्किन्सनचा आजार झाला आहे. तसेच सूक्ष्म गतीने जीवन संपविणारा रक्तक्षयसुध्दा मला झाला आहे. मला रक्तक्षय आहे हे मी माझ्या जवळच्या मित्रांपासूनही चोरून ठेवले आहे. त्यांना दुःख होऊ नये यासाठी गेली काही वर्षे क्रमाक्रमाने मी अधिकाधिक खचत चाललो होतो. परंतु आता रोगाचे स्वरूप अगदी तीव्र बनले असून अनेक प्रकारच्या गुंतागुंती त्यात शिरल्या आहेत. अशा वेळी स्वतः पुढाकार घेऊन त्यातून स्वतःची सुटका करून घेणे हे मला सर्वात जास्त शहाणपणाचे वाटते.

माझ्या मित्राना हे सांगावेसे मला वाटत आहे की अगदी शांत मनाने आणि स्वस्थ चित्ताने मी त्यांचा निरोप घेत आहे.

येथून गेल्यानंतर स्थळ, काळ व जड द्रव्याच्या पलिकडील, तसेच मानवी ज्ञानमर्यादांच्याही पलीकडे असलेल्या देहातीत मरणोत्तर जीवनात मी प्रवेश करीन, अशी अंधुकशी आशा माझ्या मनाला वाटत आहे. "मी सर्वत्र भरून राहिलो आहे अशा प्रकारच्या देहातील भावावस्थेचा" अनुभव माझ्या आयुष्यात मी अनेकवार घेतला असून या अनुभवाने मला खूप वेळा धीर दिला. याही प्रसंगी तीच भावावस्था मला धीर देत आहे.

असो. ते काहीही असले तरी आयुष्याच्या या शेवटच्या टप्प्यावर पाऊल उचलणे मात्र जड जात आहे. मी गेल्यानंतर आज हयात असणाऱ्या माझ्या मोजक्या मित्रांना, विशेषतः माझी पत्नी सिंथिया, हिला जे अतोनात दुःख होणार आहे त्याच्या कल्पनेने माझे पाऊल जड बनत आहे. आयुष्याच्या अखेरच्या पर्वात जी काही थोडीबहुत मानसिक शांती आणि सुख मी उपभोगले - आणि जे मला पूर्वी कधीही मिळाले नव्हते - त्याचे सगळे श्रेय माझ्या पत्नीकडे सिंथियाकडे जाते. तिच्यामुळेच मला ते मिळाले होते."

**लंडन, जून १९८२ (सही) आ. को.**